: प्र का श क :
स. आ. ज ग ता प
जगताप–कारले प्रकाश
३ ३ १ शु क्र वा र, पु णे २.

[ या कादंबरीच्या छाया चित्रणाचे हक्क सौ. मीनाक्षी कर्णिक यांच्याकडे आहेत.]

: मु द्र क :
मा. र. का र ले
ज न से वा मु द्र णा ल य
१९२ शु क्र वा र, पु णे २.

# अर्पणपत्रिका

ठाणें
जिल्ह्यांतील
तीन लाख उपे-
क्षित आदिवासींचें
जीवन सुधारण्यासाठीं,
ज्यांनीं गेलीं कांहीं वर्षे
अहर्निश प्रयत्न केले व ते प्रयत्न
करतांना ज्यांना खूप कष्ट व यातना
सहन कराव्या लागल्या, त्यांपैकीं कांहींना
तर प्राणार्पण करावें लागलें, ' त्या आदिवासी
सेवा मंडळाच्या कार्यकर्त्यांना ' व आदि-
वासींची सेवा करण्याचा ज्यांनीं प्रयत्न केला
त्या ' सर्व समाजसेवकांना ' ही अल्पशी कृति
भक्तिभावानें मी समर्पण करीत आहें.

—वासुदेव बळवंत कार्णिक

# परिचय

प्रिय कार्णिक,

ठाणें जिल्ह्यांतल्या अज्ञात उपेक्षित आणि अनंत अडचणींनीं भरलेल्या, जंगलाच्या छायेंत वाढलेल्या, 'वाडागिणी'ला तुम्ही प्रकाशांत आणलेंत, आणि तिच्या मार्फत मानवी जीवनांतलें एक नवीन दालन तुम्हीं उघडलेंत, ही स्पृहणीय अशी समाजसेवा तुम्हीं केली आहे. त्यामुळें मला मोठा आनंद वाटत आहे आणि या सेवेबद्दल मी तुम्हांला धन्यवाद देतों.

ठाणें जिल्ह्यांतल्या उत्तर भागांत राहणाऱ्या आदिवासी जनतेच्या सर्वांगीण विकासासाठीं गेलीं दहा वर्षे जे प्रयत्न अनेक बाजूंनीं सुरू आहेत, त्यांच्याशीं तुमचा दृढ संबंध आल्यामुळें तुम्हांला आदिवासी जनतेच्या जीवनाचें संपूर्ण दर्शन झालें आहे. हें दर्शन घडत असतांना तुम्हांला अनेक अनुभव आलेले आहेत. त्यांतले कांहीं अनुभव प्रक्षोभक असतील; कांहीं किळसवाणे असतील; कांहीं उद्बोधकही असतील. पण त्या सगळया बऱ्या-वाईट अनुभवांचा सुंदर व कौशल्यपूर्ण समवाय साधून तुम्हीं एक उदात्त रंगानें सजविलेलें चित्र बनविलें आहे. या चित्रनिर्मितींत भडक रंग भरण्याचें तुम्हीं टाळलें आहे, ही गोष्ट भूषणास्पद आहे. भडक रंग भरून अधिक आकर्षक असें चित्र बनविणें अधिक सुलभ होतें; पण तसें केलें असतें, तर छाया–प्रकाशाचे, सुख–दुःखांचे, उत्साह–उद्वेगांचे, आशा–निराशांचे विविध प्रसंग चितारतांना ज्या सूक्ष्म छटा, जे व्यक्तिदर्शनाचे विशेष तुम्हीं प्रकट केले आहेत आणि या प्रकटीकरणांत जें सौहार्द, जी सुजनता आणि जो हळुवारपणा तुम्हीं दाखविला आहे, तें तुम्हांस मुळींच साधलें नसतें. चित्रदर्शनाच्या वरील

पद्धतीमुळें तुमचें चित्र अधिक हृदयंगम आणि कुशलतेचें झालें आहे. तुमच्या वृत्ती-प्रवृत्तींशीं ज्यांचा परिचय आहे, त्यांना तुम्हीं मांडलेले विचार तुमच्या वृत्तींशीं अगदीं सुसंगत आहेत, असेंच वाटेल. प्रकटीकरणाच्या बाबतींत तुम्हीं वारली व्यक्तींच्या तोंडीं त्यांची बोली घातली आहे, ही एक कौतुकाची गोष्ट आहे. मला वाटतें, मराठी भाषेच्या समृद्ध, संपन्न आणि गौरवपूर्ण क्षेत्रांत वारली बोलीला तुम्हीं प्रवेश मिळवून दिलात, हें अनेक दृष्टींनीं महत्त्वाचें झालें आहे. तुम्ही स्वतः वारली बोली सुलभतेनें वापरूं शकतां, हें मी अनेक प्रसंगीं पाहिलें आहे. वारली बोलीच्या बाबतींत तुम्हीं तज्ज्ञ आहांत आणि ती बोली तुम्हीं वाडागिणीच्या पार्श्वभूमींत यथायोग्यपणें वापरली आहे. ती बोली किती मृदु, किती साधी, किती रसाळ आणि किती लयबद्ध ! मला तरी फार मजा वाटते, तुम्हांला आणि वारल्यांना ह्या बोलींत बोलत असतांना ऐकण्याची ! साहित्यिकांनीं आणि भाषापंडितांनीं या बोलीचा अभ्यास अवश्य करावा. अशी माझी त्यांना सूचना आहे. तुम्हीं त्या बाबतींत या पुस्तकाच्या रूपानें चांगलें काम केलें आहे.

पण हें सगळें झालें चित्राच्या बाह्य रूपाविषयीं. वाडागिणीच्या घरांतली, परसांतली, आसपासची व समाजांतली जी स्थिति आहे, त्या स्थितीचेंही सम्यग् दर्शन प्रस्तुत पुस्तकांत दिलें आहे आणि तें अत्यंत करुणाजनक आहे. आदिवासी जनतेविषयीं कुणाही सहृदय लेखकानें अथवा सेवकानें रेखाटलेलें चित्र आजच्या परिस्थितींत करुणाजनकच असणार, ही मोठी उद्वेगजनक गोष्ट आहे. ही परिस्थिति कशी बदलायची ही एक बिकट समस्या आम्हां समाजसेवकांपुढें आहे. वाडगिणीच्या आयुष्याच्या शेवटीं ती स्वतःला विचारूं लागली; " आतां आपल्या आयुष्यांत जगण्यासारखें राहिलें

आहे तरी काय ? नवरा बेपत्ता, सून पळाली, मुलीचा खून झाला, घर मोडलें, शेत गेलें !" एकट्या वाडगिणीचाच संसार वरील-प्रमाणें उध्वस्त झाला आहे, असें नाहीं. सगळ्या आदिवासी जीवनाचें हेंच सार आहे ! प्रिय कर्णिक, तुम्हांला माहीत आहे कीं, अशा लाखानें मोजतां येण्यासारख्या वाडगिणी, दऱ्याखोऱ्यांतून, रानांवनांतून इतस्ततः दुःखमय जीवनाची कधींच न संपणारी गडद अंधारी रात्र कंठीत आहेत ! आदिवासी जीवन ओसाड, भकास व रुक्ष आहे. तें समृद्ध, सुफलदायी, परममंगलकारी आणि सुंदर कसें करावें, हा प्रश्न सगळ्यांनींच विचारांत घेतला पाहिजे. आज आदिवासी जनता स्वावलंबनानें हा प्रश्न सोडविण्यास समर्थ नाहीं. दुसऱ्यांच्या साह्याची तिला कांहीं काळपर्यंत तरी आवश्यकता आहे. तें साह्य कसें द्यावें, त्याचें स्वरूप कसें असावें, या कामांतील अंतिम उद्दिष्टें काय असावींत या मुद्यांचा सगळ्या विचारवंतांनीं विचार करणें निकडीचें काम झालें आहे.

'वाडगीण' ही वारली नांवाच्या एका आदिवासी जमातींत जन्मास आली आहे. अशा जमाती अनेक आहेत. या साऱ्या जमाती जंगलांतून राहात असल्यामुळें त्यांना वन्य जमाती असें संबोधण्यांत येत असे. अलीकडे त्यांना आदिवासी हें नांव देण्यांत आलें आहे. खरोखरीच हे आदिवासी आहेत का ? हिंदुस्थानांत आणि पलीकडे राहणाऱ्या इतर अनादिवासी जमातींशीं त्यांचे मानववंशशास्त्राच्या दृष्टीनें संबंध आहेत किंवा नाहींत ? या जमातींचे कांहीं विशेष गुण-दोष आहेत का ? इतर सुधारलेल्या समाजांचे या जमातींशीं जे संबंध आले, त्यामुळें, एकमेकांवर इष्टानिष्ट असे कोणते परिणाम झाले ? 'बळी तो कान पिळी' (Survival of the fittest) या सिद्धांताप्रमाणें आणि समाजशास्त्रांतल्या दुसऱ्या सिद्धांताप्रमाणें ह्या

आदिवासी जमाती हळू हळू नष्ट होत चालल्या आहेत, का निसर्ग-निर्मित आणि मनुष्यकृत अनेक अडचणींशीं झगडत असूनही अद्यापि समर्थपणें आपलें अस्तित्व त्या टिकवून आहेत ? या सगळ्या मुद्यांची चर्चा प्रबंधांच्या, नवलिकांच्या आणि कादंबऱ्या व नाटकें यांच्या रूपानीं प्रकट झाली पाहिजे. इतर देशांत मानवी समाजाच्या विकासाचा मार्ग तेथील आदिवासी जमातींच्या स्मशान भूमींतून गेला आहे. हिंदुस्थानांत आज तरी अडीच कोटी प्रजा आदिवासी म्हणून संबोधिली जात आहे त्यांतल्या कांहीं जमातींचा व व्यक्तींचा उल्लेख भारताच्या प्राचीन व अर्वाचीन इतिहासांत गौरवास्पद रीतीनें करण्यांत आला आहे आणि भारताच्या भावी विकासक्रमात आदिवासी जमातींना अग्र हक्काचें स्थान देण्यात आलें आहे आजची भारतीय संस्कृति अनेक संस्कृतींचा सुंदर समन्वय आहे. त्यांत आदिवासींची प्रागैतिहासिक संस्कृति आहे द्राविडी म्हटली जाणारी संस्कृति आहे, आर्यन संस्कृति आहे, मंगोलियन संस्कृति आहे. आधुनिक भारतानें अनेक शतकांतील अनुभवांचा वारसा घेतला आहे, हें खरें. पण आज आदिवासी जमाती, हरिजन जमाती वगैरेंची स्थिति किती अनुकंपनीय, संतापजनक आणि भारतीय संस्कृतीला काळिमा आणणारी अशी आहे, याचा विसर पडूं देतां कामा नये. भारतीय सात्त्विकतेला आवाहन करून आमच्या सगळ्या सच्छक्तींच्या प्रभावानें ह्या सगळ्या पददलित, उपेक्षित, गांजलेल्या, पिडलेल्या बांधवांना आधुनिक भारतांत स्वाभिमानाचें स्थान मिळवून देण्याचे प्रयत्न अलीकडे सगळीकडेच सुरू झाले आहेत. त्यांतलाच, '**प्रिय कार्णिक,**' तुमचा हा वाडगिणीला प्रकट करण्याचा स्तुत्य प्रयत्न आहे. मला तो आवडला आहे. तुमच्या प्रयत्नामुळें सहृदय जनतेंत सद्भावना जागृत होवोत आणि तुमच्यासारख्या अनेक समर्थ कार्यकर्त्यांची अनेक प्रयत्न करण्याची इच्छा अधिकाधिक प्रबल होवो.

ता. १०–१२–५१ तुमचा,

शारदाश्रम, बोर्डी. **शं. रा. भिसे**

# पुरस्कार

॥ " नांगरल्याविण भुई बरी ।
असे किति तरी;
पण शेतकरी,
सनदी तेथें कोण वदा ?–
हजारांतुनी एखादा !" ॥

असें केशवसुतांनीं आपल्या एका कवितेंत म्हटलें आहे. त्यांचे हे उद्‌गार साहित्यक्षेत्रांतील मशागतीलाहि तंतोतंत लागू पडणारे आहेत. ' कविता गवता ऐशी ' वाढल्याची तक्रार अडीच तीनशें वर्षांपूर्वी रामदासांनीं केली. आजकालच्या मराठींतील अनेक साहित्य प्रकारांबद्दल तेंच म्हणण्याची पाळी आली आहे. निर्मिति उमाप होते आहे. पण संख्या आणि सौष्ठव यांचें गुणोत्तर मात्र अजून बसावें तसें बसलेलें दिसत नाहीं. ठराविक चाकोरी, ठराविक ठसे, ठराविक रंग आणि ठराविक तंत्र असाच प्रकार बहुतेक जिकडे तिकडे आढळतो.

अशा परिस्थितींत एकादी वेगळ्या प्रकारची, नवीं क्षितिजें शोधणारी, सरस आणि स्वतंत्र साहित्याकृति पहावयाला मिळाली म्हणजे ऐन उन्हाळ्यांत दुपारच्या प्रहरीं थंडगार वाऱ्याची झुळुक उघड्या अंगावरून जावी तसा आनंद झाल्यावांचून राहात नाहीं. श्री. वा. ब. कार्णिक यांची ' वाडगीण ' ही कादंबरी वाचतांना असाच अनुभव येतो.

' वाडगीण ' ही वारली जीवनावरील कथा आहे; आणि तसें पाहिलें, तर तिच्यांत कथेपेक्षां जीवनाचाच अधिक विस्तार झाला आहे. यामुळें म्हटलें तर ती कादंबरी आहे, म्हटलें तर तो एक समाजशास्त्रीय

प्रबंध आहे. पण नांव कांहींहि दिलें, तरी तें एक वाचनीय आणि उद्बोधक 'प्रकरण' आहे, याबद्दल मात्र कोणाचाच मतभेद होणें शक्य नाहीं. श्री. कार्णिकांनीं ज्याबद्दल लिहिलें आहे, तें जीवन त्यांनीं जवळून पाहिलें आहे–जाणतेपणें समजावून घेतलें आहे–सहानुभूतीनें आणि समरसतेनें आत्मसात् केलें आहे–जिव्हाळयाच्या सरस आणि संयमपूर्ण शब्दांत चित्रित केलें आहे. यामुळें कथा असो वा प्रबंध असो, वाडगिणीच्या वाचकाला वारली जीवनाचा यथार्थ आणि वास्तव साक्षात्कार पटतो. त्याच्या अंतःकरणांत त्या पददलित आदिवासींबद्दल अनुकंपा, आत्मीयता उत्पन्न होते. श्री. कर्णिक यांच्या या कथेंत लालित्य कमी असेल; पण तींत सत्य, आर्तता आणि वास्तवता हीं भरपूर आहेत. त्यांच्या भाषासरणींत विनोद आणि रम्यता हीं फारशीं नसतील; पण तींत ऋजुता आणि प्रसाद यांचा फार मोठ्या प्रमाणांत वापर आहे. कथानकाची गुंतागुंत त्यांच्या या कादंबरींत नसली, तरी स्थिति, प्रसंग, पात्रें आणि प्रमेयें यांची सुसूत्र आणि सुसंबद्ध गुंफण, त्यांच्यामधील परस्पर संबंधांचें व क्रिया–प्रक्रियांचें आविष्करण तींत सफाईदारपणें झालें आहे. श्री. कार्णिक यांनीं जितकें सांगितलें आहे, त्याच्या दसपट त्यांनीं सूचित केलें आहे. त्यांनीं वापरलेल्या मालमसाल्यावर दहापांच कथा–कादंबऱ्या सहज लिहितां येतील,इतकी समृद्धि त्यांनीं वर्णन केलेल्या तपशिलांत आहे; हा त्यांच्या या कृतीचा विशेष होय.

'वाडगिणी'ची लहानपणापासून आंधळी व्हावयाला लागलेली मुलगी चैती, ही वारली जीवनाचें प्रतीक आहे. आंधळेपणामुळें तिला पाटलाच्या लग्न झालेल्या पोराकडे 'कोरड्यावर' जाणें पत्करावें लागतें आणि अखेरीस आत्महत्त्या करून किंवा खून होऊन म्हणा, त्या कष्टमय जीवनांतून तिची सुटका होते. आपल्या मुलीचे सासरीं हाल होतात हें ऐकल्यावर तिची आई तिला माघारीं आणते; पण थोडे दिवस होतात न होतात तोंच तिचा

सासरा तिला घेऊन जावयाला येतो. तिचें परत सासरीं जाणें म्हणजे तिचें मरण, ही गोष्ट जवळजवळ ठरल्यासारखीच असते. पण याला उपाय नसतो. चैती सासरीं जायला निघते. तिची आई डोळ्यांत आसवें आणून तिला विचारते, " आतां कई इयाची ? " " देव आणील तंय." गंभीरपणें चैती उत्तर करते. या उत्तरांत, त्याच्या मागील वृत्तींत, वारली जीवनाचें, साऱ्या दलित वर्गाच्याच जीवनाचें सारसर्वस्व आलें आहे.

' मायाची ' आणि तिचा मुलगा ' जेठ्या ' या दोघांची जीवनकहाणी ' वाडगिणींत ' ग्रथित झाली आहे. मायाचीचा नवरा जंगली जिवनाला आणि तिच्या कटकटीला कंटाळून परागंदा होतो. नवऱ्याच्या गैरहजेरींत संसाराचे सारे काबाडकष्ट उपसून मायाची आपल्या मुलांना वाढवते. सावकाराकडून कर्ज काढून थोरल्या मुलाचें लग्न करून देते. कर्ज फिटलें नाहीं तर तें फिटेपर्यंत मुलाला–जेठ्याला–सावकाराकडे घरगडी म्हणून रहाण्याचा करार असतो. कर्ज फिटत नाहीं. जेठ्या घरगडी बनतो. त्याची बायको त्याचा सहवास न मिळाल्यामुळें दुसऱ्याचा हात धरून पळून जाते.

" बायकोसाठीं कर्ज काढलें, कर्ज फेडण्याकरितां नोकरी पत्करली. त्या नोकरीमुळेंच बायको गेली. बायकोपरी बायको पळाली आणि कर्जाचा डोंगर मात्र माथ्यावर राहिला. हेंच आदिवासींचें जीवन." हा लेखकाचा इत्यर्थ आहे आणि तो कुणा सहृदय माणसाला बेचैन केल्यावांचून राहील ?

वाडगीण ही कादंबरी लिहून श्री. वा. ब. कर्णिक यांनीं मराठी वाङ्मयांत मोलाची भर टाकली आहे आणि त्याबद्दल त्यांना धन्यवाद देणें, त्यांचें अभिनंदन करणें, हें माझें कर्तव्य आहे.

मनीषा, पुणें ४. —के. नारायण काळे

# कृतज्ञतेची ओंजळ

पर्ल बक्‌ची mother कादंबरी मीं वाचली व मला ती खूप आवडली. मला वाटलें, अशाच प्रकारची आदिवासी जीवन चित्रित करणारी गोष्ट आपण लिहावी. त्याप्रमाणें प्रारंभ केला. परंतु त्यानंतर आयुष्या-मध्यें मोठा फेरबदल होणारी जी घटना घडणार होती, त्यामुळें अशा लिखाणाला लागणारें मानसिक स्वास्थ्य मजजवळ नव्हतें. तथापि डहाणू सोडावें लागणार याचीं स्पष्ट चिन्हें दिसूं लागल्यामुळें घाईनें ही कादंबरी मी पुरी केली. पुण्याला आल्यावर पुनः बहुजनसमाजाचीच सेवा कर-ण्याची संधि मिळाली व त्यामुळें महाराष्ट्रांतील मागासलेल्या समाजांतील अत्यंत उपेक्षित अशा आदिवासींबद्दल पुनः पुनः विचार मनांत डोकावूं लागले व त्यामुळेंच हें लिखाण प्रसिद्ध करण्याचें ठरविलें.

प्रस्तुत कादंबरी—ह्या पुस्तकाला कादंबरी म्हणतां येईल कीं नाहीं, तें साहित्यिक ठरवतील. वाचकांपुढें ठेवितांना हें धाष्टर्य करण्यास मी कां तयार झालों, ह्याविषयीं खुलासेवजा दोन शब्द न लिहिले तर, साहि-त्याच्या राखीव क्षेत्रांत, अनधिकृतपणें, पाऊल टाकण्याचा जो उद्धटपणा मी करीत आहें, त्याबद्दल साहित्य क्षेत्रांतील मानकऱ्यांचा रोष मला पत्क-रावा लागेल! हें लिखाण वाचकांपुढें ठेवण्यांत माझा एकच उद्देश आहे, तो म्हणजे ठाणें जिल्ह्यांत जे तीन लाख उपेक्षित आदिवासी आहेत, जे वर्षांनुवर्षें, दारिद्रय, उपासमार, जुलूम, रोगराई, अज्ञान व दुःख या शत्रूंशीं निमूटपणें सामना देत आहेत, त्या आदिवासींच्या जीवनाची साधारण कल्पना मराठी वाचकांना द्यावी. मुंबईच्या अगदीं जवळ, ७०–८० मैलांवर, तीन लाख लोक कोणत्या परिस्थितींत राहातात, याची पांढरपेशा समाजाला अंशतः तरी कल्पना यावी व त्यांचें लक्ष ह्या आदिवासींकडे लागावें, हा हें लिखाण लिहिण्यांत माझा उद्देश आहे.

तसेंच ज्या आदिवासींची थोडीबहुत सेवा करण्याचें भाग्य मला लाभलें, त्यांचें चित्र जनतेपुढें मांडून त्यांच्या बाबतींत आम्हीं आजपर्यंत जी उपेक्षावृत्ति दाखविली तिचें अंशतः तरी परिमार्जन करावें हा उद्देश आहे. सबब साहित्यदृष्ट्या ह्या पुस्तकांत जीं दोषस्थळें आढळतील, त्यांबद्दल 'क्षमस्व' अशी नम्रतापूर्वक विनंति माझ्या साहित्यिक मित्रांना मी करतों.

गेलीं कांहीं वर्षें, ह्या आदिवासी विभागांत मी रहात असतांना कित्येक सुशिक्षित मित्रांनीं, ह्या लोकांच्याबद्दल इतके वेडेवाकडे प्रश्न मला विचारले कीं, ते ऐकून सर्वसाधारण मराठी वाचकांमध्यें, ह्या लोकांबद्दल जें प्रचंड अज्ञान आहे तें पाहून मला खेद झाला व हें आमचें, शिकलेल्या लोकांचें, त्यांच्या शेजारी राहाणाऱ्यांबद्दलचें अज्ञान दूर करण्याचा अंशतः तरी प्रयत्न करावा व ह्या पीडित जनतेच्या गाऱ्हाण्याकडे त्यांचें लक्ष जावें, एवढयाच हेतूनें प्रेरित होऊन मीं ही पुस्तिका लिहिली आहे. निबंधवजा पुस्तक लिहिलें असतें तर त्याचे वाचक मर्यादितच राहिले असते. गोष्टीच्या रूपानें तीच हकिकत वाचकांच्या पुढें मांडली तर ती अधिक वाचली जाईल व विशेषतः सार्वजनिक कामाची हौस असणारे, भावनाप्रधान विद्यार्थी-कार्यकर्ते अधिक आपुलकीनें ही हकिकत वाचतील व आदिवासींच्या प्रश्नाकडे अधिक आपुलकीनें पाहूं लागतील ह्या अपेक्षेनें, मी गोष्टीच्या रूपानें, हें आदिवासींचें जीवन-चित्र वाचकांपुढें ठेवीत आहें. हें चित्र मांडतांना, रंगाचा भडकपणा मुळींच वापरला नाहीं; परंतु ज्याप्रमाणें अगदीं जवळून घेतलेल्या छायाचित्रांत, प्रत्येक बारीकसारीक गोष्ट जशी स्पष्ट व ठळक दिसून येते, त्याचप्रमाणें १७ वर्षें आदिवासींचें जीवन फार जवळून पाहाण्याची संधि मला लाभल्यामुळें, त्या चित्रांत भडक रंग न ओतण्याचा मी जरी बुद्धिपुरःसर प्रयत्न केला असला, तरी, आदिवासींच्या जीवनाची सुस्पष्ट कल्पना येऊं शकेल अशा प्रकारें तें चित्र रंगविण्यांत आलें आहे. हें चित्र रंगविण्याचा

माझा हा प्रयत्न कितपत यशस्वी झाला आहे तें रसिक व सहृदय वाचकच ठरवूं शकतील.

मला जाणीव आहे कीं, साहित्याच्या निकषावर हें पुस्तक घासून पाहण्याचा जर कोणीं प्रयत्न केला, तर तो संपूर्णतः अयशस्वी होणार आहे. कारण मी कोणी साहित्यिक नाहीं. कादंबरी लेखनाच्या तंत्राचा मीं कधीं फारसा अभ्यास केला नाहीं. कॉलेजांत बी. ए. ला १९२५–२७ सालीं मराठी हा ऐच्छिक विषय घेतल्यामुळें व समकालीन श्री. अनंत काणेकर, श्री. के. नारायण काळे, श्री. वि. ह. कुलकर्णी, श्री. वा. दा. गोखले, श्री. उमाकांत भेंडे इत्यादि आजच्या नामवंत साहित्यिकांच्या सान्निध्यांत त्या काळीं, कांहीं वेळ घालविण्याचे सद्‌भाग्य मला लाभल्यामुळें, साहित्याचा थोडा बहुत परिचय मला करून घेतां आला. परंतु ह्या विद्वान् मित्रांच्या संगतींत राहूनसुद्धां नर्मदेंतील गोट्याप्रमाणें, साहित्याच्या बाबतींत मी कोरडा ठणठणीत राहिलों. अतएव प्रस्तुतचें पुस्तक वाचणाऱ्या मित्रांना माझी एवढीच विनंति आहे कीं, ह्या पुस्तकाकडे आपण चोखंदळ साहित्यिकांच्या चष्म्यांतून पाहूं नका. कारण त्या दृष्टीनें पाहण्याचा प्रयत्न केल्यास, शंभर टक्के निराशाच आपल्या पदरीं पडेल. तंत्रदृष्ट्या ह्या पुस्तकांत अनेक दोषस्थळें आढळतील. कथेंतील पात्रांचें यथार्थ चित्रण मला साधलें नसेल; पण ह्या पुस्तकांत जर एक गुण थोड्याबहुत प्रमाणांत जरी त्यांना दिसून आला आणि तो गुण म्हणजे, ज्यांचें जीवन जनतेपुढें मांडण्याचा मीं प्रयत्न केला आहे, त्या आदिवासींबद्दल थोडी तरी सहृदयता व सहानुभूति मजजवळ आहे, तर त्यांना इतर किती जरी वाङ्मयीन दोष ह्या पुस्तकांत आढळले, तरी त्यांनीं त्यांबद्दल मला क्षमा करावी.

१९३३ सालीं राजकीय कैदी म्हणून दोन महिने तुरुंगांत काढल्यावर, १७ जूनला माझी ठाणें तुरुंगांतून डहाणू येथें रवानगी झाली व त्याच

ठिकाणीं ३।। वर्षें स्थानबद्ध म्हणून राहण्याचें सद्भाग्य मला लाभलें. ही संधि मला ज्यांनीं दिली त्या ब्रिटिश राज्यकर्त्यांचे मी प्रथम आभार मानतों. कारण मुंबईच्या उपनगरांत वाढलेल्या व शहरी राहणीला चटावलेल्या माझ्या सारख्याला डहाणूला जाऊन राहण्याची व त्या ठिकाणीं इतका दीर्घकाळ काम करण्याची कल्पना कधींच मानवली नसती व 'वाडगीण' लिहिण्याची संधिही कधींच लाभली नसती.

ह्या माझ्या डहाणूच्या वास्तव्यांतच, आचार्य भिसे यांच्या-सारख्या एका निष्ठावंत कार्यकर्त्यांच्या निकट परिचयाचा लाभ मला झाला व त्यांच्या परिचयाचा परिणाम माझ्या आयुष्यावर अत्यंत मोलाचा झाला. त्यांच्यामुळेंच आदिवासी लोकांचें जीवन मला इतक्या जवळून न्याहाळतां आलें. त्या १७ वर्षांच्या काळांत आचार्य भिसे यांनीं माझ्यावर जें निर्व्याज प्रेम केलें, माझ्यामध्यें असलेल्या सेवावृत्तीचा व कर्तृत्वशक्तीचा परिपोष करण्याची जी संधि मला दिली, त्याबद्दल मी आजन्म त्यांचा ऋणी राहीन. हें माझें वाङ्मयीन अपत्य त्यांनींच जनतेपुढें ठेवण्याचें कबूल केलें व त्यामुळेंच ह्या पुस्तकाला एक प्रकारची प्रतिष्ठा लाभत आहे, याची मला सदैव जाणीव राहील. सख्ख्या भावाप्रमाणें आजपर्यंत माझ्यावर प्रेमाचा वर्षाव ज्यांनीं केला त्या आचार्यांचे शब्दानें आभार मानून त्यांच्या ऋणांतून माझी सुटका कशी होणार ? तशी सुटका करून घेण्याचा मी केव्हांच प्रयत्न करणार नाहीं.

त्या काळांत ज्या शाळेचा मुख्याध्यापक म्हणून मी काम करीत होतों, त्या शाळेचे एक चालक व आतांचे माझे एक परम स्नेही श्री. बाबूभाई पोंदा यांनीं मला वेळोवेळीं प्रोत्साहन देऊन आदिवासींमध्यें काम करण्यास जी मदत केली तिजबद्दल मी त्यांचा ऋणी आहें. 'तुमच्या ह्या उठाठेवींमुळें आमच्या शाळेचें नुकसान होतें' असें त्यांनीं जरी नुसतें सुचविलें असतें तरी कदाचित् मला ह्या कार्यापासून दूर राहावें लागलें असतें. श्री. बाबूभाई

स्वतः एक जंगल कंत्राटदार असूनसुद्धां आदिवासींमध्यें काम करण्याची जी संधि त्यांनीं मला दिली व माझ्या डहाणूच्या वास्तव्यांत मला जी मोलाची मदत केली, तिजबद्दल मी त्यांचे जाहीर आभार मानतों.

ह्या काळांत आदिवासींमध्यें जाण्याची संधि मला मिळवून देणारे आदिवासी-सेवा-मंडळाचे ठाणें जिल्ह्यांतील व इतर कार्यकर्ते, आदिवासी सेवा मंडळाचे ज्येष्ठ व श्रेष्ठ पदाधिकारी—जे आज खूप मानाच्या व मोठ्या अधिकाराच्या जागीं असल्यामुळें मी त्यांचा वैयक्तिक उल्लेख बुद्धिपुरःसर टाळीत आहें—त्यांचें मला जें साह्य व मार्गदर्शन लाभलें, त्याबद्दल त्यांचा पण मी नितांत ऋणी आहें. त्याचप्रमाणें ह्या आदिवासींमध्यें मला आग्रहानें व आपुलकीनें घेऊन जाणारे ठाणें जिल्हा कॉंग्रेस कमिटीचे माननीय अध्यक्ष श्री. शामराव पाटील व त्यांचे इतर सहकारी यांचा पण मी आभारी आहें. आदिवासी जीवनाचें सम्यक् दर्शन ज्यांच्याबरोबर हिंडल्यामुळें झालें, ते आदिवासी वेल्फेअर ऑफीसर श्री. खंडेराव सावे ( ज्यांनीं आदिवासींवर Warlis या नांवाचा एक संशोधनात्मक प्रबंध लिहिला आहे ) यांचे मी मनःपूर्वक आभार मानतों. त्याचप्रमाणें या माझ्या हांकेला आपुलकीनें ‘ ओ ’ देऊन माझ्याबरोबर आदिवासींच्यामध्यें जाऊन त्यांना लोकशिक्षण देण्याचा जो थोडा बहुत प्रयत्न मी करीत होतों, त्या माझ्या कार्यक्रमांत सहभागी होणाऱ्या माझ्या के. एल्. पोंदा हायस्कूलमधील, विद्यार्थी-विद्यार्थिनी व शिक्षक यांचा पण मी फार आभारी आहें.

माझ्या डहाणूच्या वास्तव्यांत सदर पुस्तक मला प्रसिद्ध करितां आलें नाहीं. १५ जानुआरी १९५० पासून मी महाराष्ट्र प्रादेशिक लोकशिक्षण समितीचा चिटणीस म्हणून सरकारी नोकरींत प्रवेश केला व त्यानंतर सरकारी नियमांप्रमाणें ही कादंबरी मला प्रसिद्ध करितां आली नसती. परंतु, मुंबई राज्याच्या शाळाखात्याचे शिक्षणप्रमुख माननीय डी. सी. पावटेसाहेब

(Director of Education) यांनीं मला ही कादंबरी छापण्याबद्दल जी परवानगी दिली, तिजबद्दल त्यांचा पण मी सदैव ऋणी राहीन. त्यांनीं जर ही परवानगी दिली नसती तर 'वाडगीण' प्रकाशांत आलीच नसती.

ही कादंबरी वाचून तिला जनतेपुढें मांडण्याचे कामीं हरएक प्रकारचें साह्य व सहकार्य कर्मवीर बाबूरावजी जगताप (अध्यक्ष, महाराष्ट्र लोकशिक्षण समिति) यांनीं दिलें, त्याबद्दल त्यांचा पण मी ऋणी आहे. माझ्यावरील अकृत्रिम प्रेमामुळेंच माझी ही कृति चारचौघांत दाखवायला ते स्वतः हातांत घेऊन उभे आहेत.

साहित्याच्या क्षेत्रांत अनोळखी मुशाफिराप्रमाणें प्रवेश करितांना, एक प्रकारचा संकोच मला वाटत होता; पण पूर्वींचें मैत्रीचें नातें लक्षांत घेऊन ऐनवेळीं माझ्या मदतीला धांवून येऊन, साहित्यिकांना माझा परिचय करून देण्याची जबाबदारी ज्यांनीं स्वीकारली व ह्या माझ्या पुस्तकाला पुरस्कार लिहून दिला त्या माझ्या मित्रांचे--श्री. के. नारायण काळे यांचे आभार मी किती व कसे मानूं ? केवळ मित्रप्रेमानेंच प्रेरित होऊन त्यांनीं व माझे दुसरे सहाध्यायी, प्रथितयश साहित्यिक श्री. वा. दा. गोखले यांनीं, माझ्या 'वाडगिणी'ला मोठ्या थाटामाटानें प्रकाशांत आणण्याचें ठरविलें. या मित्रद्वयांचे औपचारिक आभार मानून त्यांच्या ऋणांतून मी सुटूं शकणार नाहीं.

वार्ली समाजांतील चालीरीति मला समजावून देण्यांत माझ्या पूर्वींच्या शाळेचे आदिवासी शिपाई, लाडक्या व रामा ह्यांनीं मला खूप मदत केली. त्या दोघा आदिवासींचे मी प्रकट आभार मानतों.

हें पुस्तक आज छापलें जात आहे. त्याला सर्वस्वीं जबाबदार जगताप–कारले प्रकाशनाचे मालक श्री. भाऊसाहेब जगताप व श्री. तात्यासाहेब कारले हे आहेत. श्री. तात्यासाहेबांनीं तर अक्षरशः माझा पिच्छाच पुरविला. ह्या दोघांनीं केलेल्या बहुमोल साह्याबद्दल त्यांचे जेवढे आभार मानावे तेवढे थोडेच होतील.

मुखपृष्ठावरील सुंदर चित्र काढून देणारे श्री. देशपांडे, ब्लॉक करून देणारे बॉम्बे प्रोसेसचे मालक, पुस्तक लिहिलें जात असतांना उपयुक्त सूचना करणारे माझे मित्र श्री. बाळ सामंत, त्याचें हस्तलिखित करण्यांत मदत करणारे श्री वि. रा. टकले व त्याच्या प्रकाशनाच्या व सजावटीच्या कामांत मदत करणारे श्री. शं. वि. तुंगे, श्री. श्री. द. अवचट या सर्वांचे मी मनःपूर्वक आभार मानतों. घरच्या कार्यांत ज्या आपुलकीनें एकादा मनुष्य कार्य करतो, त्याच आपुलकीनें ह्या पुस्तकाबाबतच्या सर्व कामांत 'अथ' पासून 'इति' पर्यंत मला मदत करणारे आमच्या लोकशिक्षण मासिकाचे एक संपादक, श्री. शं. ल. थोरात ह्यांची मला खूप मदत झाली. त्यांचा पण खूप आभारी आहे.

वाङ्मयाच्या क्षेत्रांत पहिलें पाऊल टाकतांना एक प्रकारचा अस्वस्थपणा वाटत होता. आपलें लिखाण वाचनीय होतें कीं नाहीं, ह्याबद्दल मी साशंक होतों व म्हणून प्रकरणें लिहीत असतांनाच तीं मी माझी कन्या आशा, जी एक चोखंदळ वाचक आहे, व माझी पत्नी मीनाक्षी यांच्यापुढें टाकीत होतों व तीं प्रकरणें वाचलीं जात असतांनाच त्यांच्या प्रतिक्रिया न्याहाळीत होतों. ह्या दोघींनीं, मला चांगल्या उपयुक्त अशा सूचना केल्या; पण त्यांचे आभार मानणें त्यांना आवडणार नाहीं; सबब त्यांचा नुसता उल्लेखच करितों.

मराठी वाचकांनीं ह्या उपेक्षित 'वाडागिणी'चें, तिच्या ओबडधोबड स्वरूपांतच आपुलकीनें स्वागत करावें व ठाणें जिल्ह्यांत अज्ञानांधःकारांत व दारिद्र्यांत खिचपत पडणाऱ्या ह्या 'वाडगिणी'च्या इतर नातेवाइकांकडे अधिक जिव्हाळ्यानें लक्ष द्यावें अशी सर्वांना विनंती करून, ही कृतज्ञतेची ओंजळ सर्वांच्या पायीं भक्तिभावानें समर्पण करितों.

जयहिंद !!

शके १८७३, मार्ग. वा॥ १०
दि. २३-१२-५१
शांतिनिकेतन,
३१९ सोमवार, पुणें २.

—वासुदेव बळवंत कर्णिक.

# ओळख

'श्री. वासुदेव बळवंत कार्णिक हे एक तडफदार व कळकळीचे कार्यकर्ते आहेत' ही त्यांचेसंबंधींची माहिती, त्यांची नेमणूक महाराष्ट्र प्रादेशिक लोकशिक्षण समितीचे चिटणीस म्हणून सरकारनें केली, त्यावेळींच सर्वांना कळली होती. त्यांचा आमचा परिचय झाल्यावर त्यांच्या या गुणांबद्दल आमची खातरी झाली. एकदां भेटींत आम्हीं आमच्या छापखान्याची व प्रकाशनकार्याची माहिती त्यांना दिली; आणि 'आपण कांहींतरी लिहा' अशी विनंति करून तें प्रकाशित करण्याचें आश्वासनहि दिलें. ते म्हणाले, "माझ्याकडे कांहीं लिखाण तयार आहे; पण त्यावर हात फिरवायला मला वेळच मिळत नाहीं, त्याला काय करूं!"

त्यांचें तें लिखाण कोणत्या विषयावरील आहे, हें आम्हीं समजावून घेतलें. सदरचा विषय फारच महत्त्वाचा व जरुरीचा आहे, अशी आमची खातरी झाल्यावर त्यावरील त्यांचें लिखाण शक्य तितक्या लवकर पुरें करण्याची त्यांना विनंति केली व त्यासाठीं लागणारी सर्व प्रकारची मदत करण्याचें आम्हीं कबूल केलें. आणि लिहायला आनंद वाटतो कीं, त्यांनीं त्यांचें तें लिखाण म्हणजेच आदिवासी जीवनावरील 'वाडगीण' ही कादंबरी पूर्ण करून आमच्याकडे दिली.

श्री. कार्णिक ह्यांनीं ठाणें जिल्ह्यांतील डहाणू एथील हायस्कूलमध्यें अध्यापक व प्राचार्य म्हणून १७ वर्षें कार्य केलें. त्यांनीं या शाळेचे विद्यार्थी व पालक यांचा त्यावेळीं विश्वास संपादन केला व शाळेला चांगला दर्जा मिळवून दिला. ठाणें जिल्ह्यांतील बहुतेक सर्व संस्थांशीं त्यांचा निकटचा संबंध आला. मग ती संस्था विद्यार्थ्यांसाठीं असो, शिक्षकांसाठीं असो अगर इतर नागरिकांच्या हितासाठीं असो; तींत

श्री. कर्णिक हे मोठ्या उत्साहानें व कळकळीनें भाग घेत असत. ठाणें जिल्ह्यांतील माध्यमिक शिक्षकांच्या संघटनेचे ते कित्येक वर्षें अध्यक्ष होते. श्री. कर्णिक ह्यांनीं ठाणें जिल्ह्यांतील विविध क्षेत्रांतून केलेल्या कार्याचें लोकांनीं तर कौतुक केलेंच; पण सरकारनेंहि त्यांना सेकंडक्लास ऑनररी मॅजिस्ट्रेट नेमून त्यांचा गौरव केला.

आदिवासी–सेवामंडळामार्फत आदिवासींच्या उन्नतीकरितां होणाऱ्या सर्व चळवळींत ते उत्साहानें भाग घेत असत. ठाणें जिल्हा सर्वोदय सल्लागार समितीचे ते चिटणीस होते. वार्ली लोकांचें अज्ञान, त्यांचें कष्टमय जीवन व त्यांची इतर लोकांकडून होत असलेली पिळवणूक वगैरे गोष्टी असह्य होऊन या वार्ली जीवनांत सुधारणा घडवून आणण्यासाठीं आचार्य भिसे यांच्या नेतृत्वाखालीं ठाणें जिल्ह्यांत चाललेल्या सर्व चळवळींशीं श्री. कर्णिक यांचा संबंध होता. या सर्व चळवळींत हिरीरीनें भाग घेऊन, वार्ली लोकांत मिसळून त्यांच्या चालीरीतींचा व त्यांच्या जीवनाच्या सर्व प्रकारच्या अंगोपांगांचा सखोल अभ्यास त्यांनीं केला आहे.

'वाडगीण' ह्या कादंबरीवरून श्री. कर्णिकांचा आदिवासींशीं किती निकटचा परिचय झाला, हें वाचकांच्या लक्षांत येईल; आणि ही कादंबरी वाचून आदिवासी–जीवन सुधारण्याची जबाबदारी आपणांवर आहे हें सर्वांना पटेल असा भरवसा वाटतो.

गेलीं कित्येक वर्षें उपेक्षित अवस्थेंत राहाणाऱ्या वार्ली जीवनावर झगझगीत प्रकाश पाडणारी एक विचारप्रवर्तक कादंबरी श्री. कर्णिक यांनीं लिहिली, त्याबद्दल त्यांना हार्दिक धन्यवाद !

—प्रकाशक

# ‘ वा ड गी ण ’

: १ :

झोपडीच्या मागील दारीं दोन उघडीं नागडीं पोरें उभीं होतीं. पोरें मोठीं; पण हातापायांच्या काड्या. मुलगी नखें कुरतडत होती व रडत पण होती. मुलगा मोठा होता तिच्यापेक्षां. तो पण रडत होता.दोन्ही पोरांना खूप भूक लागली होती. त्यांची ‘ आया ’ शांतपणें त्यांचें रडणें ऐकत होती. रोजचेंच होतें तें. पोरांना पाजायला ती आंबील बनवीत होती. ह्या दिवसांत भाताला दाणे कुठून आणणार ? आयाची हालचाल पाहून पोरें शांत झालीं. त्यांची खात्री झाली कीं, आतां लौकरच आंबील पदरांत पडणार. पोरगा होता पांच वर्षांचा. तो ज्येष्ठांत झाला होता; म्हणून त्याचें नांव “ जेठ्या ” ठेवलें होतें. मुलगी होती तीन वर्षांची. कदाचित् महिन्या दोन महिन्यांनीं लहान असेल. ती चैत्रांत जन्मली होती; म्हणून तिचें नांव “ चैती.”

चूल पेटलेली पाहून तीं दोन्ही पोरें आंत आलीं. आघाशाप्रमाणें आंबिलीची वाट पाहात तीं दोघें चुलीजवळ येऊन उभीं राहिलीं. आतां त्यांचें रडणें अजिबात बंद झालें होतें. तीं चुलीच्या फार जवळ आलेलीं पाहून त्यांची ‘ आया ’ ओरडली; “ दूर व्हारं. धुवाडा ( धूर ) पकां झालाय्. डोळं फुटतील. ”

तिच्यापासून थोड्याच अंतरावर एक ‘ मांद्री ’ ( चटई ) टाकून तिची

सासू 'ठाकली' होती. सुनेचा आवाज ऐकून ती म्हणाली, "निकां ( खरं ) अज्‌गा जलम चुलीचा धुवाडा खाल्ला तंय आज मी आंधी झालें."

सासू बोलत होती तेव्हां सून चूप होती. ती हातानें आंबील घाटत होती. ती लहान मुलगी जोरजोरानें डोळे चोळत होती. तिचे डोळे लालबुंद झालेले होते. नेहमींच तिचे डोळे असे लाल असत. तिच्या डोळ्यांबाबत कोणीं जर त्या बाईला विचारलें तर ती म्हणे, "डोले कांहीं व्याट ( वाईट ) नाय्. पण ती धुवाडा पकी खाई, तंय डोले लाल रहत."

थोड्या वेळानें ती मुलगी पुन्हा रडूं लागली; पण तिची आई एकाद्या स्थितप्रज्ञाप्रमाणें आपलें काम करीत होती. मुलांच्या रडण्यानें ती आतां पूर्वीप्रमाणें भांबावून जात नसे; पण तिचा पहिला मुलगा जेव्हां लहान होता, तेव्हां तो जरासासुद्धां रडलेला तिला चालत नव्हता. हातांतील वाटेल तें काम टाकून ती त्याला उचलून कडेवर घेई व पदर बाजूला सारून त्याला छातीशीं धरी.

अशा वेळीं तिचा नवरा खूप रागावे. शेतावर ती त्याच्या बरोबरीनें काम करी, म्हणून काम करितांना मध्येंच ती जेव्हां पोराला घेऊन पाजत बसे तेव्हां त्याला तिचा खूप राग येई.

"एक पोरगं झालं तंय तूं असं काम टाकून बसून रहंस, अजून तर तुला पकी पोरं होती, मग तूं काम कराचीच नाय् काय? अज्‌गा जलम पोरंच घेऊन बसाची तूं! मग काम कोण कराचा? सावकाराची म्हातारी ( बायको ) पोरांना धरून बसून रहं; पण त्याशी पका पैसा रहं. तूं अशी बसून रहशी तर काम कोण कराचा?"

पण ती त्याला दाद देत नसे. तिचा आपला क्रम चालू असे. त्यानें फारच गडबड केली तर ती म्हणे, "तुला एकच काम, मला सत्रा. अथशीं ( इथून ) घरा जाऊन तूं ठाकून ( झोपून ) रहंस. मला रांधाया पडं.

पोराचं दुख तुला थोडं पड ? तें अज्ग ( सर्व ) माझ्यावरच. पोटांत भार माझ्या रहं, तूं तर सुटा. ''

पण नंतर हळू हळू तिला मुलांचें रडणें ऐकण्याची संवय झाली. वेळ झाली कीं, त्यांना असेल तें खायला द्यायचें; एरव्हीं तीं कितीही रडलीं तरी दाद द्यायची नाहीं, हा गरिबांच्या घरचा धडा ती आतां नीट शिकली होती.

इतक्यांत आंबील तयार झाली. तिनें एक मोठा वाडगाभर आंबील पहिल्यानें सासूपुढें नेऊन ठेवली. म्हातारी आंबिलाचा वाडगा पाहून उठून बसलेली होती. सर्व दिवस ती जरी नुसती घरांत बसून राहात होती तरी तिला कांहीं भूक कमी लागत नव्हती. तिच्या नातवंडाप्रमाणेंच ती सांजसकाळ आधाशाप्रमाणें जेवणाची वाट पाहात राही. म्हातारीला आंबील दिल्यावर तिनें मोठ्या मुलाला एका लहान वाडग्यांतून आंबील दिली व त्या लहान मुलीला मांडीवर घेऊन पहिल्यानें तिनें तिचे डोळे पाण्यानें धुतले; व मग तिला आंबील पाजली.

एव्हांना ती खूप थकून गेली, कारण तिला पुन्हा दिवस गेले होते. सर्व दिवसभर ती शेतांत काम करून आली होती. घरीं आल्यावर तिला चुलीजवळ जाऊन जेवण करावें लागे. सुदैवानें ( किंवा दुर्दैवानें ) घरांत शिजवायला कांहींच नसल्यामुळें जेवण करण्याचें काम बरेंच हलकें झालें होतें. तथापि दिवस गेल्यामुळें म्हणजे सातवा आठवा महिना असल्या-मुळें, ती साहजिकच खूप थकून गेली होती. इतर बायकांप्रमाणें तिला मुलांचा कंटाळा नव्हता. नवीन येणाऱ्या बाळाची ती आतुरतेनें वाट पहात होती. ज्या वेळीं तिला दिवस गेल्याचें समजे, त्या वेळेपासून ती खूप खूप आनंदांत व समाधानांत हिंडे. तिची प्रकृति चांगली सुदृढ असल्यामुळें पांढरपेशा बायकांप्रमाणें तिला

गरोदरपणाचा विशेष त्रास होत नसे. इतकेंच नव्हे, तर ह्या काळांत ती विशेष प्रसन्न राही.

'वार्ली' विभागांत लोकवस्ती विखुरलेली असते. एकाच खेड्यांत निरनिराळ्या ठिकाणीं सोयीप्रमाणें १५।२० घरें बांधून लोक रहातात. ह्या वस्तीला पाडा म्हणतात. एकेका खेड्यांत असे चार पांच पाडे असतात. ज्या पाड्यावर ती रहात असे, त्या पाड्यावर १५।२० च घरें होतीं. परंतु त्या घरांमधील बायकांच्या मानानें आपण आपल्या मुलांना अधिक चांगल्या रीतीनें वाढवितों, अशी तिला घमेंड होती. पाड्यावर एका मांगेल्याचें ( मच्छिमारीचा धंदा करणाराचें ) छोटें दुकान होतें. त्याच्याजवळ ह्या वार्ल्यांच्या मानानें दोन पैसे जास्त होते. पण आपल्यापेक्षां ती मांगेलीण मुलांकडे कांहीं जास्त लक्ष देत नाहीं अशी तिची बढाई होती.

मुलांना आंबील पाजून ती मांद्रीवर जरा स्वस्थ पडली होती, इतक्यांत, शेजारी तिची एक दूरची 'देराणी' ( जाऊ ) राहात होती, ती तिच्याजवळ आली व म्हणाली, "मायाची"–तिच्या नवऱ्याचें नांव माया होतें व म्हणून भोंवतालचे लोक तिला 'मायाची'–म्हणजे मायाची बायको या नांवानेंच ओळखत.

"तुझं तर धान रांधल होवं ! तूं तर पकी लाहां लाहां ( लवकर लवकर ) काम करंस. जबरी हुशार रहंस तूं. मी कईची ( केव्हांपासून ) नांगत ( पाहात ) आहें. पकी हाताची जलद तूं."

देराणीचे ते शब्द ऐकून ती खूप लाजली व म्हणाली, "नाहीं ग. पोरांच्या पोटांत आज पकी आग पडेल, तयं लाहां लाहां आंबील करून दिधेल." ( मुलांच्या पोटांत आज फार आग पडली म्हणून लवकर लवकर पेज करून दिली. )

"निका तूं पकी हुशार, तंय तूं लाहां लाहां काम करस." असें म्हणत ती आपल्या घरीं निघून गेली.

आपल्या शेजारणीनें पोटभर केलेली ती स्तुति ऐकून ती खूप खूष झाली. तिला स्वतःबद्दल फार अभिमान वाटला. तिला नेहमींच आपल्या नवऱ्याबद्दल, मुलांबद्दल व स्वतःच्या एकंदर परिस्थितीबद्दल बराच अभिमान वाटत असे. त्यांत शेजारणीनें तिची स्तुति केल्यावर तिची छाती अभिमानानें फुलून गेली. ती शांतपणें बसून आपल्या परिस्थितीचा विचार करण्यांत गुंग झाली. एक तऱ्हेच्या आनंदाच्या नशेंत होती ती. पण इतक्यांत तिचा मुलगा तिजपाशीं धांवत आला व त्यानें तिच्या समाधीचा भंग केला. "आया, मला बिजून (पुन्हा) आंबील देजोस ग," तो म्हणाला. ती उठली, घरांत गेली व तिनें आणखी थोडी आंबील त्याच्या वाडग्यांत टाकली. नंतर ती पुन्हा अंगणांत येऊन बसली व आपल्या नवऱ्याची वाट पाहूं लागली.

इतक्यांत दूर अंधारांतून नेहमींच्या पायरस्त्यानें येणारी ओळखीची आकृति तिच्या नजरेस पडली. त्याच्या खांद्यावर एक छोटी कुऱ्हाड होती. आज तो विशेष खुषींत होता. मोठ्या आवाजानें तो कांहींतरी गात होता. जसजसा तो घराच्या जवळ आला तसतसा त्याचा आवाज मंदावत चालला. अंगणांत पाऊल टाकल्यावर तर त्याचें गाणें बंदच झालें. त्यानें झोपडींत पाऊल टाकलें व आपल्या खांद्यावरची कुऱ्हाड कोपऱ्यांत टाकली. त्याची चाहूल ऐकून त्याची म्हातारी आया पटकन् उठून बसली. आणि तिनें आपली तोंडाची टकळी सुरू केली. "त्याला एकाद कवट ( अंडें ) देजो." ती आपल्या सुनेला म्हणाली.

मुलें आतां बाहेर अंगणांत खेळत होतीं. मायाची झटकन् आपल्या नवऱ्याच्या जेवणाची तयारी करूं लागली. एका मोठ्या वाडग्यांत आंबील तिनें ओतली. त्याच्या वाडग्यांत तिनें जाड जाड आंबील टाकली. मधून मधून ती नवऱ्याशीं खूप भांडे; तरी पण तिचें त्याच्यावर फार प्रेम होतें. त्याला अतिशय मेहनत करावी लागते, म्हणून त्याला चांगलें खायला घातलें.

पाहिजे, ह्याची तिला नेहमीं जाणीव असे; पण तिच्याजवळ जी सामुग्री होती, त्यांतूनच ती त्याला खायला घालणार. त्यांनीं दोनतीन कोंबडीं बाळगलीं होतीं. म्हणूनच मधून मधून ती त्याला एकादें अंडें देऊं शके.

सासूबाईचा आपल्या नवऱ्याला अंडें देण्याचा हुकूम तिनें ऐकला व ती म्हणाली, "हें नांग, दिघेल कवट माझ्या पोराच्या बासला." (हें पाहा दिलें अंडें मीं माझ्या मुलाच्या बापाला.) वार्लीं बायका नवऱ्याचें नांव चुकूनसुद्धां घेत नाहींत.

"देशी तर काय, अज्‌गा दिस तो काम कर. ताकद राह्या होवी ना!" ती म्हातारी म्हणाली.

तिच्या बोलण्याकडे तिच्या सुनेनें किंवा मुलानें लक्षच दिलें नाहीं. तो जेवत होता. ती त्याच्याकडे डोळे भरून पाहात होती. तो फार झपाट्यानें जेवत होता. खूप भूक लागली होती त्याला. "विजून देगो आंबील." तो म्हणाला व ती उठली आणि पुन्हा तिनें त्याच्या वाडग्यांत आंबील टाकली. आतां त्याचें जेवण लवकर संपेल ह्या कल्पनेनें तिनें दुसरा एक वाडगा घेऊन स्वतःकरितां आंबील काढून घेतली व आपलें जेवण सुरू केलें.

जेवण संपल्यावर तो पुन्हा अंगणांत आला. तिथें बसून तो पुन्हा गाणें बोलूं लागला. त्याचा आवाज ऐकून जवळपासचे 'घोले' (पुरुष) जमा झाले. त्याचा एक दूरचा भाऊ त्याच्या शेजारींच राहात असे. तो वर सांगितलेल्या देराणीचा नवरा. तो पण त्याच्याजवळ येऊन बसला. सर्वांनीं 'तुंबाख्' (तंबाखू) काढली व ते विडी करूं लागले. रोजच ते सर्वजण अशा रीतीनें एकत्र बसत व धूम्रपान करीत. दिव्याचें दर्शन जवळजवळ त्यांच्या झोपडींत होत नसे, म्हणून पावसाळ्याखेरीज इतर सर्व दिवस ते कुणाच्या तरी अंगणांत जमत. थोडा वेळ त्यांनीं इकडल्या तिकडल्या गप्पा मारल्या व जो तो आपआपल्या घरीं झोपण्यास निघून गेला.

" ठाकला रे माया ? " त्याच्या आईनें विचारलें.

घरांत अंधार खूप पडला होता आणि नेहमींप्रमाणें घरांत दिवा पण नव्हता.

" ठाकशी नाय् तर काय करशी ? बिज कराचं काय ? दिसभर काम कराचं आणि रातचं ठाकाचं. आपण कोठ पठारांतल्या (शहरांतल्या) लोकांसारखे नक्कल नांगायला जाऊं ? " ( नक्कल—सिनेमा वगैरे )

त्यांचें संभाषण एथेंच थांबलें, कारण आतां तो चांगलाच घोरायला लागला होता. तिनें आपलीं भांडीं घासलीं. बाहेर बांधलेली बकरी तिनें झोपडींत आंत आणून बांधली. कारण, जर का ती त्यांना आंत आणायला विसरती तर केव्हां ' वाघरूं ' ( वाघ ) येऊन त्यांच्यावर झडप घालील याचा नेम नव्हता.

नंतर बसल्या बसल्याच झोंपलेल्या आपल्या मुलांना तिनें उचलून एका चटईवर झोंपविलें व ती आपल्या नेहमींच्या ठिकाणीं जाऊन झोंपली. तिचीं मुलें पण तिच्याजवळच झोंपलेलीं होतीं. दिवसा जी इतकी रागीट व करारी दिसे, तीच बाई आतां अगदीं हळुवार हातानें मुलांना थोपटत होती. तिच्यामध्यें वास करणारा स्त्रीजातीचा कोमलपणा आतां जणूं काय उचंबळून आला होता.

झोंपेंतच तिची मुलगी तिला बिलगून तिच्या छातीजवळ पिण्यासाठीं धडपडत होती. आतां तिला दूध नव्हतें, पण तिनें त्या पोरीला आडकाठी केली नाहीं. थोड्या दिवसांनीं पुन्हा तिची छाती भरून येणार होती व एक लहान बाळ अशाच रीतीनें पडल्या पडल्या तिचें दूध पिणार होतें. त्याच प्रकारच्या गोड संवेदनांचा अनुभव घेत ती झोंपी गेली. आतां सर्व घर झोंपी गेलें होतें. म्हातारी मात्र मधून मधून खोकत होती. क्वचित् कोपऱ्यांत टोपल्यांत ठेवलेल्या कोंबड्या ओरडत होत्या. बाहेर कोल्हे ओरडत होते. बाकी सर्व शांत होतें.

* * *

## : २ :

दुसरा दिवस उजाडला. कालचा दिवस गेला तसा आजचा पण जाणार. गरिबांच्या आयुष्यांत असे काय प्रसंग घडणार ? तेंच तेंच रहाट-गाडग्याचें जीवन ! सकाळीं उठल्याबरोबर मायाची कामाला लागे. टोपलींतून कोंबडीं काढून बाहेर सोडायचीं. त्यानंतर आंत बांधलेलीं बकरीं चरायला सोडायचीं. मग चूल पेटवून थोडें गरम पाणी करायचें व त्यांनीं त्या पोरीचे चिकटलेले डोळे धुऊन साफ करायचे. तिला माहीत होतें कीं, ह्या पोरीचे डोळे आतां जन्मभर असेच राहाणार. जंग-लांत कसलें औषधपाणी करणार ! तिची खात्री होती कीं, ह्या आजारानें मुलगी कांहीं मरणार नाहीं. मुलीचे डोळे धुऊन झाल्यावर पुन्हा तिनें आंबील बनवायला प्रारंभ केला. रात्रीच्या आंबीलइतकी आतांची आंबील ती घट्ट बनविणार नव्हती. कारण इतकी नागली कुठून आणणार दर वेळेला ? तिची आंबील तयार झाली. इतक्यांत तिचा नवरा व म्हातारी उठून तिच्यासमोर आंबील प्यायला येऊन बसले. पेज पिऊन झाल्यावर तो कोयती घेऊन कामावर जायला निघाला, तेव्हां मायाची त्याला म्हणाली, " ऐकस काय ? तूं गवताचा भारा घेन डहागूला जायाचा ना ? पशे येती त्याचं पोयरीच्या डोल्याला दवा घेन ये."

" क्याचे (कसले) पशे आणशी दव्याला ? खाया पसा नाय्, न तूं दवा आणाया सांगस. दव्याबिगर ती मरून जायची नाय् " तो म्हणाला. " मी बारीकला होतो, तंय माझे डोले पण असेच होते; पण माझ्या बानें नाय् बा कंदीं पशाचा दवा आणला !"

त्याच्या उत्तरावरून तिनें ओळखलें कीं, हा विषय बोलण्याची ही वेळ

नव्हे. ती चूप राहिली, पण तिला त्याचा राग मात्र आला. तिनें विचार केला, ' तो म्हणतो तें खरें असेल. लहानपणीं पुष्कळांचे डोळे खराब असतात, . पण पुढें सुधारतात. नाहींतरी आपल्या पोरांना कुठें पुस्तकें वाचायला जायचें आहे.'

तो कामावर निघून गेला. नंतर तिनें म्हातारीला पेज दिली. त्यानंतर मुलें येऊन तिच्यापुढें उभीं राहिलीं. तिनें लागलीच त्यांच्यापुढें पेज ठेवली व ती आपल्या कामाला लागली. एव्हांना सूर्य चांगलाच वर आला होता.

मायाचीचें आयुष्य सारखें ठरीव ठशाचें असलें, तरी त्याचा तिला कधीं कंटाळा येत नसे. आपल्या रोजच्या कामांत ती खूप रंगून जाई. तिच्या आयुष्यक्रमांत म्हटला तर बदल होई. राब करण्याच्या वेळीं तिला निराळें काम करावें लागे. बीं टाकतांना निराळें काम, आवणीच्या वेळीं निराळाच कार्यक्रम चाले व मळणीच्या वेळेला तिसरा. ह्याखेरीज वर्षातून येणाऱ्या सणाच्या दिवशीं तिच्या आयुष्यक्रमांत फेरबदल होई तो निराळा. ह्या निरनिराळ्या सणाच्या दिवशीं थोडा जेवणांत फरक होई व सणाच्या निमित्तानें थोडी ' सूर ' ( ताडी ) आणीत. वर्षाकांठीं असे पांचसहा सण येत. जेष्ठ-आषाढ महिन्यांत कुळीची भाजी खाण्याचा सण येई. भाद्रपदांत 'नवं' ( नवीन भात ) खाण्याचा, कार्तिकांत ' चवल्या ' ( चवळी ) खाण्याचा, पौषांत ' तील ' खाण्याचा व फाल्गुनांत ' कैरी ' खाण्याचा सण ते साजरा करीत.

ह्याखेरीज तिला स्वतःला ज्या वेळीं मूल होई, त्या वेळीं तिचा आयुष्यक्रम बदले. त्याचप्रमाणें पाड्यावरच्या इतर बायकांना जेव्हां मूल होई, तेव्हां त्यांच्याकडे तिला जावें लागे. शिवाय, कोणाच्या घरीं लग्न किंवा कोठें मृत्यु झाला तर त्यामुळें सर्व पाड्यावरील लोकांच्या दैनंदिन कार्यक्रमांत बदल होई.

कधीं कधीं ती लाकडाच्या मोळ्या घेऊन डहाणूला त्या विकायला जाई व येतांना थोडा बाजार करी. पावसाळ्यांत ‘ कुळी ’ ‘ कोरळ ’ ‘ कंटोली ’ ह्या भाज्या, जर वेळ मिळाला, तर ती डहाणूला, मल्याणीला, किंवा सावस्याला विकायला घेऊन जाई. कधीं कधीं मीठ किंवा तंबाखू घ्यायला ती वरोतीच्या बाजाराला जाई. अशा वेळीं तिला कधीं न पहाण्यास मिळणारीं दृश्यें दिसत व तिला वेळ मिळाल्यास नवीन पाहिलेल्या दृश्यांबद्दल ती विचार करीत असे.

पण तिला कधींसुद्धां शहरांत जाऊन राहावें असें वाटत नसे. ती आपल्या चिमुकल्या संसारांत अगदीं खूष होती. आपलें घर, आपला नवरा आणि आपलीं मुलें या पलीकडचें जग तिला दिसत नव्हतें. घरचें पडेल तें काम करावें, आपल्या नवऱ्याची व मुलांबाळांची भरपूर काळजी घ्यावी, त्यांच्या सर्व गरजा पुऱ्या करण्यासाठीं धडपडावें, हेंच तिचें नित्याचें जीवन होतें व तें जीवन तिला पूर्णपणें आवडत होतें. ज्यावेळीं एक चिमुकलें बाळ तिचें दूध पीत असे, त्यावेळीं तर ती नितांत खूष असे.

पहांटेला ती सर्वांच्या आधीं उठून कामाला लागे. कोंबड्या बकऱ्यांची काळजी तीच घेई. घरचें भांडीं—पाणी तीच करी. जेवण करण्याचें कामसुद्धां तिच्याकडेच, असे. ह्याखेरीज शेतावर जाऊन नवऱ्याला त्याच्या कामांत मदत करावी लागे ती निराळीच. भातशेती करतांना, गवत कापतांना, लांकडें तोडून आणतांना तिला नवऱ्याच्या खांद्याला खांदा भिडवून दिवसभर काम करावें लागे व मोठ्या आनंदानें तें सर्व काम ती करीत असे.

ज्यावेळीं तीं दोघें शेतावर जात, त्यावेळीं ती म्हातारी घराच्या दारांत बसून घराचें रक्षण करी. म्हातारीवर पण तिचा फार जीव होता. एकदां तिची देराणी तिला हंसत म्हणाली, “ मायाची, वाडगिणीचा तुला पका तरास, ती टाकली ( मेली ) मगा बेस तुला. ”

" वाडगीण टाकली तर घर कोण राखल माझं. माझीं पोरं मोठीं झाल्याबगर माझी वाडगीण टाकायची नाय्. "

तिचें तिच्या म्हातारीशीं खूप पटे. नाहींतरी ती तिच्याशीं नीट पटवून घेई. दोन पोरांप्रमाणेंच म्हातारी हें तिसरें मूल समजून ती तिच्याशीं वागे. तिच्या पाड्यावर रहाणाऱ्या सास्वासुनांचीं भांडणें होत असत. तिला ह्या गोष्टी माहीत होत्या. पण ती तिच्या सासूशीं कधीं भांडत नसे.

एकदां त्या गांवांत कॉलऱ्याची सांथ आली, प्रत्येक घरांत कोणीतरी सांथीनें पछाडलें गेलें. इकडे म्हातारीला पण कॉलरा झाला. म्हातारी मरणार असें सर्वांना वाटलें. सर्वांनीं तिची आशा सोडली. खेडेगांवांत औषधापाण्याची काय सोय असणार ? आणि वाल्यांचें व औषधाचें कायमचें वाकडें. शहरांत वर्षानुवर्षं घरगडी म्हणून काम करणारे वालीं-सुद्धां आजारी पडले कीं, ' भगताई ' करण्याकरितां पुन्हा खेड्यांवर जातात किंवा ' दाणे दाखवायला ' तरी भगताकडे जातात. जंगलच्या वाल्यांना ' भगत आणि वनसया ' ( ' वनस्पति ' ) ह्यांखेरीज कोणतेंच औषध माहीत नसतें.

परंतु अशा प्रतिकूल परिस्थितींतसुद्धां इतकी आजारी असलेली ती म्हातारी जगली. म्हातारी जगलेली पाहून तिच्या सुनेला खूपच आनंद झाला. " आस ( आशा ) नाय् होती वाडगीण तुझी ह्या वख्ताला; माझं दार राखाया ' बेस ' ( चांगली ) झालीस तूं. "

" आतां पकी बेस मी. तूं जा तुझ्या कामावर. मी बसून रहन दारांत, घर राखाया."

तिला वाटलं, सासू मेली असती तर आपली किती पंचाईत झाली असती ! बरं झालं ती वांचली.

पण तिला हवी होती, म्हणून कांहीं ती म्हातारी वांचली नव्हती. तिची घटकाच अजून भरली नव्हती. जन्म, मरण हें ठरल्यावेळींच होणार ! कांहीं असो, म्हातारी वांचली हें पाहून मायाचीला खूप आनंद झाला यांत संशय नाहीं. * * *

# : ३ :

आणखी दोन महिने असेच गेले आणि एके दिवशीं दुपारपासून मायाची जरा अस्वस्थ होऊं लागली. आज ती नवऱ्याबरोबर शेतावर गेली नाहीं. तिचे दिवस पूर्ण भरले होते. तिच्या पोटांत सकाळपासूनच दुखूं लागलें होतें. पण तिनें नवऱ्याला कांहीं सांगितलें नाहीं. त्याला कामावर जाऊं नकोस असें सांगण्याची तिला जरुरी वाटली नाहीं. तिला आतांपर्यंत तीन मुलें झालीं होतीं. त्यांपैकीं एक गेलें असलें तरी दोन हयात होतीं. मूल होतांना तिला विशेष त्रास होत नसे. तिची प्रकृति निकोप होती. तिच्या शरीराची ठेवण पण चांगली होती. आज दुपारपासून तिला वाटूं लागलें होतें कीं, रात्रींपर्यंत आपण बाळंत होणार. तरी पण रोजचीं कामें ती शांतपणें करीत होती.

संध्याकाळच्या सुमारास तिच्या पोटांत खूपच दुखूं लागलें. तेव्हां ती जरासा आडोसा करून एका चटईवर पडली. तिनें देराणीला बोलवायला पाठविलें. खेडेगांवांत कुठल्या आल्या सुइणी ! एक बाई बाळंत व्हायची असली कीं, भोंवतालच्या चारपांच बाया एके ठिकाणीं जमत व तिला मदत करीत. त्यांपैकीं ज्या अनुभवी म्हाताऱ्या असत त्या तरुण बायांना वेळोवेळीं काय करायचें तें समजावून सांगत. चुकून एकादे वेळीं मूल आडवें आलें व त्या प्रसूत होणाऱ्या स्त्रीला त्रास होऊं लागला, तर ह्या म्हाताऱ्या बायांच्या सांगण्याप्रमाणें, सूचनांप्रमाणें इतर बाया धांवपळ करीत. परंतु मायाचीला बाळंत होतांना मुळींच त्रास होत नसे, म्हणून तिनें फक्त देराणीलाच बोलाविण्यास पाठाविलें.

ती हात धुऊन तावडतोब आली व तिला म्हणाली, "तुला काय जरासा

पण वखत लागत नाय्. दर वखताला आपली पाली हारी हारीच (बरोबर) येय, पण अमदा तुझी पाली पहली आली. मला अजून वखत आहे."

ती तिथेंच बसली. मायाचीच्या तोंडावरून तिनें ओळखलें कीं, तिला आतां फार वेळ लागणार नाहीं. मायाचीबद्दल देराणीला फार प्रेम वाटे. ती ज्या वेळीं बाळंत होई, त्या वेळीं देराणी अशीच तिच्याजवळ जाऊन बसे.

मायाचीकडे देराणी आलेली पाहून भोंवतालच्या बाया एकामागून एक तेथें जमा झाल्या. त्यांपैकीं कांहींनीं येऊन तिची थोडी थट्टामस्करी सुरू केली. तिला नक्की मुलगा होणार असें त्यांनीं भविष्य वर्तविलें. तें ऐकून मायाचीला खूप आनंद झाला. कांहीं न बोलतां ती नुसती हंसली व शांतपणें पडून राहिली. बाकीच्या बायका तिच्याभोंवतीं बसून गोष्टी करूं लागल्या. आपल्याला किती मुलें झालीं, बाळंत होतांना आपणाला नेहमीं किती त्रास होत असे इत्यादि अनेक प्रकारच्या अनुभवांबद्दल त्या बोलत होत्या.

आतां प्रसुतीचा वेळ अगदीं नजीक येऊन ठेपला. देराणी उठली व तिनें झोपडीचा दरवाजा आंतून बंद केला व म्हातारीला दरवाजाजवळ बसायला सांगितलें. थोड्या वेळानें मायाचीचा मोठा मुलगा आला व दिवसा दार बंद पाहून त्याला आश्चर्य वाटलें. दरवाजा बंद पाहून त्यानें दरवाजावर जोरानें धक्का द्यायला सुरुवात केली, तेव्हां देराणी आंतून ओरडून म्हणाली, " जेठ्या, जरा तथंच खेल, बेस खेलशी तंय डाले ( चणे ) खाया तुला शिवराई देन. थोड्या वखतानीं नांग, तुला तुझी आया काय दियाची ! " ( जेठ्या जरा तिथेंच खेळ; नीट खेळशील तर तुला चणे खायला पैसा देईन. थोड्या वेळानें पाहा, तुझी आई तुला काय देईल ! )

त्या मुलानें थोडा वेळ धक्के देणें बंद केलें. परंतु त्याची जेव्हां खात्री

झाली कीं, आपली आई आंत आहे व दार बंद ठेवून आपणास आंत येऊं देत नाहीं, तेव्हां तो पुन्हा जोरानें धक्के मारूं लागला व मोठ्यानें ओरडूं लागला. त्याचा तो आवाज ऐकून ती देराणी बाहेर आली व अशा कांहीं नजरेनें तिनें त्याच्याकडे पाहिलें कीं, तो मुलगा तावडतोब तिथून पळाला. पुन्हा एकदां दरवाजा बंद करून ती आंत आली.

मायाची आतां जोरानें कुंथत होती; बाकीच्या बायकांच्या गप्पा पण जोरांत चालल्या होत्या. दोनचार दिवसांपूर्वीं शेजारच्या पाड्यावरच्या लोकांनीं ताडी पिऊन थोडी दंगल केली. बायकापोरांना मारहाण केली. त्यासंबंधीं त्यांचें बोलणें चाललें होतें. प्रत्येकजण आपण ऐकलेली हकीगत सांगत होती. शेवटीं त्या पाड्यावरच्या पुरुषांपेक्षां आपले पुरुष चांगले असें जवळ जवळ सर्वांनीं सांगितलें. त्यांच्या गप्पा आणखी किती वेळ अशाच चालल्या असत्या कुणास कळे! पण इतक्यांत देराणीला मायाचीनें जोरानें हांक मारली.

ती तिथेंच बसून होती, पण डोळे मिटून घेतल्यामुळें मायाचीला ती दिसत नव्हती. पुन्हा थोडा वेळ सर्वत्र शांतता पसरली. त्या शांततेचा भंग एका नव्यानें जन्माला आलेल्या बालकाच्या रडण्यानें केला. देराणी एकदम ओरडली; ‘ या गो नांगा ( पहा ), पोरगा कसा बेस उपजला, मायाचीच करमच ( कर्म ) बेस. ”

तावडतोब सर्व बायकांची धांदल उडाली. एकजण चूल पेटवायला गेली, एकीनें मडक्यांत पाणी ओतलें, दुसरी फडकें शोधूं लागली. मुलाच्या व मायाचीच्या आंघोळीची तयारी त्यांनीं चालविली. थोड्या वेळानें देराणीनें इतर बायकांच्या मदतीनें त्या मायलेकरांस आंघोळ घातली.

पुन्हा त्यांना नीट झोंपविलें. इतक्यांत दुसऱ्या एका बाईनें आणलेली आंबील मायाचीला पाजण्यांत आली. जेमतेम ती, ती पेज प्याली व झोंपली. खूप थकली होती ती; त्यामुळें पटकन् तिचा डोळा लागला. सर्व बायका

आपापल्या घरीं निघून गेल्या. देराणी सर्वांत शेवटीं जाण्यास उठली. जातांना ती म्हातारीला सांगून गेली. " मायाचीला जाग येल तंय मला वाहराया दवड जो" ( मायाची जागी होईल तेव्हां मला बोलवायला पाठव. )

दरवाजा उघडल्यावर थोड्याच वेळानें त्या बाईचीं दोन्ही मुलें जेठ्या व चैती आंत आलीं. आईजवळ तीं जाण्यापूर्वींच म्हातारीनें त्यांना सांगितलें कीं, घरांत नवीन बाळ झालें व म्हणून आई झोंपली. पुन्हा थोडा वेळ मुलें अंगणांत जाऊन बसलीं. मायाची जागी झाल्यावर म्हातारीनें जेठ्याला देराणीला बोलाविण्यास पाठविलें. तो धांवत गेला व म्हणाला, " तुला खबर का नाय्, आमचे घरीं लहान पोरगा आणेल बिजा." ( दुसरा. )

" अरं मला नाय् खबर, तंय तुला खबर ? मी जाऊन आणेल तुझा भास ( भाऊ ). तूं काय सांगस ?"

" तो पोरगा तूं घेन जायाची ? तो आमच्या घरीं रह्याचा नाय् ?"

त्याचा तो प्रश्न ऐकून ती खूप हांसली व त्याच्याबरोबर ती त्याच्या घरीं जाण्यास निघाली. जातांना तिनें मायाचीला पिण्यासाठीं पेज व तिच्या घरच्या इतरांना देण्यासाठीं आंबील बरोबर घेतली. आतां मायाचीला बरीच हुषारी वाटली. ती देराणीला म्हणाली, " पका आज तरास झाला तुला."

ती म्हणाली " तरास क्याचा ? ( कशाचा ). माझ्यासाठीं तूं तरास घेस तो ? " असें म्हणून तिनें तिला पेज पाजली. अजून माया मात्र घरीं आला नव्हता.

* * *

## : ४ :

मुलगा झाला हें ऐकून त्या बाईला खूप आनंद झाला. पण त्या माणसाला ? त्याला या गोष्टीचा मुळींच आनंद वाटला नाहीं. आणखी एक मुलगा, म्हणजे आणखी एक पोट वाढलें. जीं माणसें होतीं, त्यांनाच पुरेसें खायला मिळत नव्हतें. मग ह्या नव्याची आणखी कुठें सोय करणार ? वाढत्या मुलांबरोबर शेताचें उत्पन्न कांहीं वाढणार नव्हतें आणि नवीन मुलगा जन्मला म्हणून त्याचें नित्याचें आयुष्य कांहीं बदलणार नव्हतें. तसाच तो रोज सकाळीं उठणार व त्याच शेतावर कामाला जाणार ! कालचा दिवस गेला तसाच आजचा; व आजच्यासारखाच उद्यांचा !

त्याच्या ह्या जीवनक्रमांत जवळजवळ कधींच बदल होत नसे. जवळची 'तुंबाखू' संपली व गांवांतील मांगेल्याकडे पण ती मिळाली नाहीं, तर तो एकाद्या वेळीं वरोतीच्या बाजाराला जाई. वर्षांतून एकदोन वेळां तो डहाणूला सावकाराकडे जाई. सावकाराकडे जातांना तो रिक्त हस्तानें जात नसे. पावसाळ्यांत गेला, तर 'कंटोली' किंवा 'मका' घेऊन जात असे व दिवाळीच्या सुमारास गेला, तर चवळ्या घेऊन जाई. त्या भागांतील सर्व सावकारांची अशी पद्धतच होती कीं, कुळांकडून कंटोली, चवळ्या इत्यादि पदार्थ वर्षाकांठीं वसूल करून घ्यायचे. असल्या कामानिमित्त माया जेव्हां डहाणूला येई, त्या-दिवशीं त्याचा जीवनक्रम बदले. एरव्हीं त्याचें आयुष्य कमालीचें ठराविक ठशाचें होतें. आपणाला येणारा कंटाळा दूर करण्याकरितां दिवाळीच्या सुमाराला तो 'तारफें' वाजवी. होळीच्या सुमाराला पांवी वाजवीत असे. (सर्वच वार्ली दिवाळीच्या सुमाराला 'तारफीं' व होळीच्या सुमाराला

'पांव्या' वाजवितात. ) ज्या दिवशीं ताडी प्यायला मिळे, त्या दिवशीं मात्र तो खूष असे. कधीं कधीं त्याला त्याच्या आयुष्यक्रमाचा खूप कंटाळा येई. त्याला वाटे, हा काय जुलूम ! आपण रोज रोज काम करायचें, आणि तरीसुद्धां कधीं आपल्या अंगावर धड कपडा नाहीं. वर्षांतून एकदां ज्या वेळीं सावकार खंड वसूल करायला येई, त्यावेळीं माया आशाळभूत-पणें त्याच्या कपड्यांकडे विशेषतः त्याच्या बुटांकडे पहात राही. त्याला बूट फार आवडत. रोज मर मर मरून तो जें काम करी, त्या कामां-तून त्याला काय मिळे ! खूप मेहनत करून शेत पिकविलें, तरी तें सर्व धान्य कांहीं त्याच्या पदरांत पडणार नव्हतें. तो जी जमीन लावी, ती त्यानें सावकाराकडून खंडानें घेतली होती. एकूण उत्पन्नापैकीं तीन भाग सावकार घेऊन जाई व चौथा भाग जो शिल्लक राही तो तरी त्याला कुठें पुरा मिळे ! अडीअडचणीला केलेली चारदोन रुपयांची उसनवार परत फेडण्यासाठीं ह्यांतूनच त्याला सोय करावी लागे. बायकोनें भरलेल्या बांगड्यांचे पैसे, आपण शिवून घेतलेल्या 'डगलीचे' ( हात नसलेलें एक कुडतें, जाकीट ) पैसे, कधींमधीं उधार प्यालेल्या ताडीचे पैसे वगैरे सर्व प्रकारची बाकी त्याला ह्या पैशांतूनच फेडावी लागे. सर्वजणांचें देणें दिल्यावर जें कांहीं राही तें त्याचें. तें इतकें थोडें राही कीं, त्याला वाटे, इतका मी खपलों; पण माझ्या हातीं कांहीं राहिलें नाहीं. कशाला उगीच काम करून मरा !

आणि असे विचार ज्या वेळीं त्याच्या मनांत येत, त्या वेळीं तो नुसता घरीं बसून राही. दोन तीन दिवस कामावरच जात नसे. साध्या कारणा-वरून बायकोवर संतापे. घरांत एक चटई टाकून पडून राही. सारखा एकामागून एक विडी ओढी. ह्या वेळीं एकादा जोडीदार जर मिळाला तर तो नजीकच्या भंडाऱ्याकडे जाऊन ताडी पिई. त्याचें हें वागणें फार तर एकदोन दिवस त्याची बायको सहन करी. आणि नंतर ती असा तोंडाचा पट्टा चालवी कीं, त्याला ताबडतोब उठून जावें लागे. तिनें एकदां

आक्काबाईचा अवतार धारण केला कीं, त्याची तिच्यापुढें कांहीं मात्रा चालत नसे. तिचा पारा चढायला लहानसें निमित्त पुरे असे. त्यानें कांहीं कारणांवरून जर लहान मुलाला एकादी थप्पड लगावली, तर लागलीच मायावी जोरानें ओरडूं लागे व दोनतीन दिवस रिकामें बसून राहिल्याबद्दल त्याची सडकून हजेरी घेई. तिची बडबड ऐकत बसण्यापेक्षां कामावर जाणें बरें, असा विचार करून कुऱ्हाड खांद्यावर टाकून तो निमूटपणें शेतावर निघून जाई.

पण त्या बाईच्या मानानें तो आळशी खराच. ( आणि वार्ली जातच आळशी. ) कधीं कधीं दुपारींच अर्धें काम टाकून, तो घरीं जायला निघे. त्या वेळीं तिनें त्याला प्रतिबंध केला, तर तो तिला म्हणे, "माझ्या वाटचें काम मी करेल ( केलें ), तुझ्या वाटचें तूं कर. "

" तुला पोरं आहां त्याची याद आहे का नाय्? त्यांचं काम कोण करणार? तुझा बास ( बाप ) का माझा? "

पण तरी तो काम टाकून जायलाच निघे. जातांना तो एवढेंच म्हणे, " निक्कां ( खरं ) पका कंटाला इघेल आज; मी तर जायचाच, तुला होवं तंय काम कर, नाय् तर तूं व घरा जा." इतकें बोलून तो काम टाकून निघून जाई. हा प्रकार नेहमींच होई.

एके दिवशीं दुपारीं असाच तो फिरायला म्हणून गेला व रात्रीं येतांना त्यानें एक आंगठी आणली. तिची किंमत त्यानें दोन रुपये सांगितली. तिनें ती आंगठी पाहिली आणि एकदम चवताळली व त्याला म्हणाली, " तुला काय अक्कल हाय का नाय्? घरांत पोरांबालांना खाया मिलत नाय् न तूं विटी ( आंगठी ) घालून कोठ जायाचा? शेठ जसा विटी घालाया? मोठा सावकार होयाचा, आतां विटी घालून?..." इत्यादि बऱ्याच कठोर शब्दांनीं तिनें त्याच्यावर खैरात केली. त्यानें शांतपणें तिचें बोलणें ऐकून घेतलें. तिच्यासमोर त्याला उत्तर देण्याची त्याची छाती

नव्हती. हातावर आंगठी आल्यामुळें तो फार खूष होता. फार दिवसांपासून एकादी आंगठी विकत घेण्याची त्याची इच्छा होती, पण त्याला तशी संधि मिळाली नव्हती. आज आंगठी मिळाल्यामुळें त्याला एक प्रकारचा विशेष आनंद झाला. त्या आनंदामध्यें तो मग्न असल्यामुळें तिच्या बोलण्याचा त्याच्यावर जवळजवळ कांहींच परिणाम झाला नाहीं. ती खूप संतापली होती. तिच्या तोंडाला येतील ते शब्द ती बोलली. पण हा आपला आंगठीकडेच पहात होता; शेवटीं ती तशीच बडबडत न जेवतां आपल्या पथारीवर जाऊन पडली. नवऱ्यानें असा वेडावाकडा खर्च केला कीं, तिचा संताप अनावर होत असे.

तिचें बोलणें जेव्हां थांबलें तेव्हां तो खाडकन् शुद्धीवर आला. तिच्याजवळ जाऊन तो उभा राहिला व म्हणाला, "एवढी तूं गाज करस तंय नांग, ही विटी मी फेकून देय; माझी विटी एवढी तुझ्या डोल्यांत खुपत आहे तंय मीं विटी घालाचा पण नाय्." (इतकी तूं ओरडतेस तर बघ, ही आंगठी मीं फेकून देतों. माझी आंगठी जर एवढी तुझ्या डोळ्यांत सलते तर मी पण ही आंगठी घालणार नाहीं कधीं.) असें बोलून त्यानें ती आंगठी कोपऱ्यांत खरोखरच फेकून दिली व तिथेंच पथारीवर पडला आणि मोठमोठ्यानें स्फुंदूं लागला. तिनें पाहिलें कीं, आतां चूप रहाण्यांतच शहाणपणा आहे व त्यामुळें ती निमूटपणें पडून राहिली. एकदां तिच्या मनांत आलें कीं, जवळ जाऊन त्याला शांत करावें; पण तो मोह तिनें आवरला.

सकाळीं तो उठला, पण अद्यापि त्याचा राग शांत झाला नव्हता. कुणाशीं एक शब्द न बोलतां त्यानें आपले रोजचे व्यवहार झटकन् उरकले व तो आपल्या कामावर निघून गेला. तो गेल्यावर तिची म्हातारी सासू तिला म्हणाली, "एवढी क्याला झगडस त्याच्याशारी. घोले माणूस असेच रह्याचे. बाईमाणसानीं नवऱ्याला खूष कराया पाह्यजे. मायाचा बास पण असाच होता. पण मी नाय् कधीं त्याच्याशीं भांडण करेल.

मायाचीनें सासूचें बोलणें निमूटपणें ऐकून घेतलें. आतां तिचा राग कमी झाला होता. रात्रीं आपण नवऱ्याला खूपच छेडलें याची तिला जाणीव होती. म्हातारीचें बोलणें ऐकून तिनें शेतावर जाऊन त्याला शांत करण्याचा निश्चय केला आणि थोडेसें काम करून ती शेतावर निघून गेली.

ते दिवस आश्विन महिन्याचे होते. गवत कापून तयार होत होतें. हळवें भात ( हलकें ) कापण्यासारखें झालें होतें. गरव्याला ( चांगल्या भाताची जात ) अजून वेळ होता. माया शेतावर आला. तो झटकन् कामाला लागला. मायाची येईपर्यंत तो कामांत गढून गेला होता. ती आली व तिनें त्याच्याकडे पाहिलें, पण त्यानें तिच्याकडे मान वर करूनसुद्धां पाहिलें नाहीं. तिला लांबून पाहिल्याबरोबर त्यानें कामांत गढून गेल्याचा आव आणला. तीसुद्धां त्याच्याशीं कांहीं न बोलतां त्याच्यापासून थोड्या अंतरावर जाऊन बसली व तिनें पण आपल्या कामाला प्रारंभ केला. दोघेंही माना खालीं घालून निःशब्दपणें काम करीत होतीं. मध्येंच ती चोरून त्याच्याकडे पहात होती. पण त्याचा पारा अद्याप न उतरल्यामुळें तो तिच्याकडे पहाण्याच्या मनःस्थितींत नव्हता. तिनें थोडा वेळ काम केलें व ती घरीं निघून गेली. तिनें जातांना मनाशीं निश्चय केला कीं, घरीं जाऊन छान जेवण तयार करीन व मायाला जेवायला घालीनच. तो खूष झालाच पाहिजे. त्याचा अबोलपणा आतां तिला जाचूं लागला. त्याला आनंदित करण्याची आतां तिला जरुरी वाटूं लागली.

ती घरीं जायला निघाली; पण वाटेंत त्या गांवच्या मांगेल्याचे दुकानीं वळली व तिथून तिनें दोन आण्यांचे सुके मासे घेतले. तिच्याजवळ त्या वेळीं पैसे नव्हते. पण तो मांगेला तिला ओळखत असल्यामुळें त्यानें तिला पटकन् मासे दिले. मायाला मासे फार आवडत. ( वाल्यांना ओले मासे कुठून मिळणार ? ओल्या माशाची भूक ते सुक्या माशानेंच भागवितात. ) मायाची मासे घेऊन घरीं आली व दारचा एक छानसा

भोपळा तिनें तोडून आणला. मायाला भोपळा पण खूपच आवडे. तिनें आज भाकरी तयार केल्या. भोपळा व सुके मासे यांचें आंबट ( कालवण ) तयार करून ती त्याची वाट पहात बसली.

तो आला, पण कांहीं न बोलतां म्हातारीजवळ बसून विडी ओढूं लागला. तिनें त्याला जेवायला बोलाविलें, पण तो जागेवरून हालला नाहीं. पुन्हा तिनें त्याला जेव्हां दोनतीन हाका मारल्या तेव्हां तो म्हणाला, "रातीं मला तूं फाडून फाडून खाल्लंस; आतां धान खाया मला जरा पण भूक नाय्"

" नाय् खायाचा होवां तंय नको खाऊं; ही नांग, मी अजून धान टाकून दियाची." असें म्हणून ती पुन्हा चुलीजवळ गेली. अन्न फेकून देण्याची तिनें त्याला धमकी दिली. पण तसें करण्याचें तिला धैर्य झालें नाहीं. ती मायापासून दूर झाल्यावर, मायाच्या म्हाताऱ्या आईनें त्याला जेवायला उठविण्याचा खूप प्रयत्न केला. पण अद्यापि त्याचा पीळ कायम होता. त्या दिवशीं पण तो न जेवतां तसाच झोंपला.

रात्रीं ज्या वेळीं ती त्याच्या बाजूला झोपली होती, त्या वेळीं पहिल्यांदां तिला जाणीव झाली कीं, आपला नवरा जरी वयानें मोठा असला, तरी तो पण एकाद्या लहान मुलासारखाच आहे आणि ज्याप्रमाणें आपण मुलाची काळजी घेतों व त्याचे लाड पुरवितों, त्याचप्रमाणें नवऱ्याचे पण लाड पुरविले पाहिजेत. आतां त्याच्यावरील तिचा राग अजिबात निघून गेला होता. तिनें त्याला दोनतीन वेळां बोलायला लावण्याचा प्रयत्न केला. पण त्यानें तिचा प्रेमानें पुढें केलेला हात झिडकारून टाकला.

रात्र तशीच गेली. सकाळ झाली. सर्वजण उठून बाहेर आले. पण माया अद्यापि पडूनच होता. त्याला दोनतीन हांका मारल्या, पण तो उठला नाहीं. शेवटीं हाताला धरून तिनें त्याला उठविलें. त्याच्याशीं गोड गोड बोलून दांतण करायला लाविलें व मग ती त्याला म्हणाली, "नांग, मी काल तुझ्यासाठीं किती बेस आंबट करेल, पण तूं खाया उट-

लास नाय्. पक्का व्याट हायस तूं! आतां चल लाहां लाहां खाऊन घे."
(काल मीं तुझ्याकरितां किती छान आमटी केली होती, पण तूं जेवायला उठलाच नाहीं. किती रे वाईट आहेस तूं! चल बघूं आतां लवकर लवकर खाऊन घे.)

तिनें त्याचा हात धरून त्याला जेवायला बसविलें; तो खूप थकला होता. आतां त्याचा राग मुळींच शिल्लक नव्हता. एकाद्या मंत्रमुग्ध नागाप्रमाणें तो आतां ती सांगेल त्याप्रमाणें करीत होता. तो जेवायला बसला व रात्रीं तिनें तयार करून झांकून ठेवलेलें जेवण त्यानें मुकाटपणें खाल्लें. जेऊन उठल्यावर तो तिला म्हणाला, " आज मला पक्का थाक (थकवा) इधेल. मी कामावर नाय् जायाचा."

" नको जाऊं. मी एकली जाईन. कामाची धास (धास्ती) नको करूं."

तो तसाच विडी ओढत पडून राहिला. थोडीं घरचीं कामें आटोपून ती कामावर निघून गेली. तो घरांतून गेल्यावर, त्याला एकलेपणाची जाणीव होऊन तो बेचैन झाला. त्याची आई त्याच्याबरोबर बोलण्याचा प्रयत्न करीत होती, पण आज तिची बडबड त्याला असह्य वाटूं लागली. म्हातारीला मात्र सारा दिवस मुलगा घरांत रहाणार या विचारानें खूपच आनंद झाला होता. थोडा वेळ त्यानें आपल्या आईची बडबड ऐकली; व मग उठून तो रस्त्याच्या बाजूनें फिरायला निघाला, पण त्याला नकळत त्याचे पाय त्याला नजिकच्या भंडाऱ्याच्या ताडीच्या दुकानाकडे नेऊं लागले. ताडीचें दुकान नेहमींच करमणूक करून घ्यायला एक चांगलें ठिकाण होतें. त्या दुकानाच्या आसपास सागाचीं मोठमोठीं लांकडें वाहून नेणाऱ्या गाड्या सोडलेल्या असत. ते गाडीवाले तेथें बसून चारदोन आण्यांची ताडी पीत. खूप निरनिराळ्या विषयांवर गप्पा मारीत. रिकाम्या माणसाचा इथें चटकन् वेळ निघून जाई. वेळ घालविण्याकरितांच माया भंडाऱ्याच्या दुकानाच्या दिशेनें चालला होता.

तो रस्त्यानें जात असतांना त्याचा तो शेजारीं रहाणारा भाऊ (देराणीचा नवरा) त्याला समोरून येतांना दिसला. जवळ आल्यावर तो मायाला पाहून म्हणाला, "काय माया, कामावर नाय् जाघेल आज ?"

"नाय् रं, पका थाक इघेल आज. जेठ्याची आई पकी गाज करं (ओरडते). अज्गा (सर्व) दिस माझ्याहारी झगडं (भांडते), दोन दिस झाले. जिवाला बेस नाय्. तंय जरा सूर (ताडी) पियाचा एकादं बाटली."

त्याचें तें उत्तर ऐकून तो त्याचा भाऊ कांहीं बोलला नाहीं. रस्त्याच्या बाजूला थुंकून तो निघून गेला. तो स्वभावतःच अबोल होता.

माया भंडाऱ्याच्या दुकानांत आला. तेथें कांहीं वंजारी लोक ताडी पीत होते. हे लोक भाड्यानें गाड्या फिरवितात. वाल्यांच्या मानानें हे खूप सुशिक्षित आहेत. हे बहुतेक पालघर तालुक्यांत रहातात. जंगलचा धंदा सुरू झाला कीं, ते आपल्या गाड्या घेऊन डहाणू तालुक्यांत येतात. ह्यांचे बैल मोठे असल्यामुळें व हे लोक मेहनती असल्यामुळें इमारती लांकडें वाहून नेण्याचें काम खूप जलद व चांगल्या रीतीनें करतात. पैसे पण चांगले मिळवितात. गाडीभाड्याचा हिशोब करतांना सावकार लोक वाल्यांना फसवूं शकतील, पण सावकाराची गाडी बरोबर ओळखून वंजारी गाडीवाले त्याच्याकडून चारदोन आणे अधिक उपटल्यावाचून रहाणार नाहींत. एरव्हीं लोक हुशार व जबरदस्त मेहनती.

माया ज्या ताडीच्या दुकानांत गेला तेथें कांहीं वंजारी गाडीवाले पीत बसले होते. त्यांच्याबरोबर गोष्टी करीत माया तिथें बसला. तो मधून मधून ताडी पीत होता. ते वंजारी त्याला पालघरच्या निरनिराळ्या गोष्टी सांगत होते. पालघराहून रोज मुंबईला जाणारे लोक असल्यामुळें, मुंबईला आलेली कोणतीही नवी चीज पालघरला त्याच दिवशीं येत असे. त्यामुळें या वंजारी लोकांना सर्व गोष्टींची जवळ जवळ अद्ययावत् माहिती होती.

त्यांच्यापैकीं कांहींजण स्वतःच मुंबईला जाऊन आल्यामुळें त्यांनीं पालघरच्या वर्णनाबरोबर मुंबईचींसुद्धां रसभरित वर्णनें करायला प्रारंभ केला.

त्यांचीं तीं भाषणें ऐकून आपल्या ठराविक ठशाच्या जीवनाला आधींच कंटाळलेल्या मायाला मोठी गंमत वाटली. तो त्यांच्या भाषणांत खूप रंगून गेला. त्यानें त्यांना विचारलें कीं, त्या गांवांत पैसे मिळविण्याची कांहीं सोय आहे का नाहीं ? हा त्याचा प्रश्न ऐकून एक वंजारी हंसला व म्हणाला, " मूर्खा, तेथें कामाला पण तोटा नाहीं व पैशाला पण नाहीं. काम थोडें, पगार फार. दिवसभर काम करावं, हॉटेलांत साहेबासारखं खुर्चीवर बसून चहा, भजीं, पुरी खावी. रात्रीं सिनेमा, नाच, तमाशा पहावा. कामावर जायचें नसलें तर दुकानांत लाविलेल्या मालाकडे पहात उभें राहिलें तरी सबंध दिवस निघून जाईल. किती गंमत आहे मुंबईमध्यें. माझी जर स्वतःची जमीन नसती तर मी मुंबईतच जन्मभर पडून राहिलों असतों. मुंबईसारखी मजा नाहीं." असें म्हणत त्यानें आणखी एक पेला ताडी आपल्या घशांत ओतली.

अशा प्रकारें बराच वेळ तो त्या कंपूमध्यें त्यांचें बोलणें ऐकत बसला. त्यांच्यांपैकीं प्रत्येकानें त्याला " तूं फार हुशार दिसतोस, मुंबईला गेलास तर तुला वाटेल तेवढे पैसे मिळतील " असें सांगितलें. आधींच तो जंगलांतील जीवनाला कंटाळला होता. त्यांत त्याचें व बायकोचें गेल्या दोनतीन दिवसांत आंगठीवरून भांडण झालें होतें. त्यामुळें त्या वंजारी लोकांचें बोलणें ऐकून तो स्वतःशीं विचार करूं लागला, " इथें रहाण्यांत काय अर्थ आहे ? रोज रोज काम करायचं आणि शेवटीं एक दिवस मरायचं ! धड खायला नाहीं, धड कपडा नाहीं. शिवाय, बायकोच्या बरोबर भांडण ! कशाला राह्यचं जंगलांत पडून ? त्याच्यापेक्षां मुंबईला गेलेलें काय वाईट ?

अलीकडे त्याला बायकोचा रागच येत असे. तिला नवीन मुलगा झाला, त्या वेळेपासून तो तिच्यावर चिडत चालला होता. तिला मुलें फार लवकर लवकर होतात असें त्याला वाटत होतें. म्हणून तो तिच्यावर चिडत चालला होता. वास्तविक वार्ली लोकांना मुलांचा तसा कंटाळा नसतो. आपली बायको वांझोटी नाहीं; याचा त्यांना अभिमान वाटतो आणि मुलांच्या लग्नांत मुलीच्या लग्नापेक्षां जरी जास्त खर्च करावा लागत असला तरी मुलगा झाला कीं, त्यांना जास्त आनंद होतो. पण मायाला मात्र नवा मुलगा झाल्याचा आनंद झाला नाहीं. त्या वेळेपासून तो जरासा खिन्न असे.

आज त्या वंजारी लोकांच्या गोष्टी ऐकून त्याचें डोकें भडकलें. तो तिथून उठला व सरळ वरोतीच्या रस्त्यानें चालू लागला. त्याच्या लक्षांत आलें कीं, आज वरोतीचा बाजार. वरोतीला आल्यावर तो बाजारांत फिरला. एक दोन फेऱ्या मारल्यावर, एका दुकानाजवळ येऊन तो थांबला. त्या दुकानवाल्याजवळ खाकी विजार व तयार शर्ट होता. त्याच्या शेजारच्या दुकानवाल्याजवळ बूट होते. त्यानें त्या दुकानदाराला त्या मालाच्या किंमती विचारल्या व मग स्वतःशीं हिशेब केल्यावर त्याला आढळून आलें कीं, जर पंधरा रुपये मिळतील तर हे सर्व कपडे आपणाला घेतां येतील. पण पंधरा रुपये आणायचे कुठून ? इतक्यांत त्याला 'दीनाबाईची' आठवण झाली.

'दीनाबाई' ह्या नांवाची एक पार्शी बाई वरोतीला रहात होती. कित्येक वर्षे ती वरोतीलाच राहून सावकारी करीत होती. त्या ठिकाणीं तिची जमीन होती व देशी दारूचें दुकान पण होतें. भोंवतालच्या भागांत रहाणाऱ्या सर्व वार्ल्यांना ती जातीनें ओळखीत असे. अडीअडचणीला वार्ल्यांना ती हात उसनवार पैसे देई व व्याजासुद्धां ती ते वसूल करी. माया मधूनमधून तिच्या दुकानावर पिण्यासाठीं जात असे. एरव्हींसुद्धां तो वरोतीला गेला तर दीनाबाईला भेटून येत असे. मधून मधून जर

त्याला चारदोन रुपये लागले तर तो ते पैसे तिच्याकडून आणी व भाताच्या रूपानें त्याची परत फेड करी. आज दीनाबाईची आठवण झाली त्यावेळीं त्याला फार आनंद झाला.

तो दीनाबाईच्या अंगणांत जाऊन उभा राहिला. बाई त्याला दारांतच भेटली. त्याला पहातांच ती म्हणाली, " काय माया, आज क्यावर इथेल ? " ( कोणत्या कामाकरितां आलास ? )

त्यावर वाल्यांच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें तो म्हणाला, " काय नाय्; एऱ्हींच " ( उगाच ).

" पण कांहीं तरी होवा ना ? एऱ्हींच क्याला ( कशाला ) कोण घर सोडून येयाचा ? "

" तसा तर काम काय नाय्. पण जराक पशे ( जरासे पैसे ) मागाचा होता. " जरा मान खालीं घालून माया म्हणाला.

" कवढे पशे ? " ( किती पैसे ) तिनें विचारलें.

" एक विसा " (वीस रुपये) तो म्हणाला.

" अब्ब ! एवढे क्याला ? " ( इतके कशाला ? )

" वीस नाय् तर धा अन् पांच देजो. तूं नाय् दियाची तंय कोण दियाचा ? काम आहे फार ! " माया म्हणाला.

ह्याप्रमाणें पांच दहा मिनिटें त्यांचा संवाद झाला. दीनाबाईंना माहीत होतें कीं, आतां मायाचें शेत चांगलें पिकायला आलें होतें. त्याला पंधरा रुपये दिले तर ते वसूल करायला वेळ नाहीं लागणार. ती आंत गेली व पैसे घेऊन बाहेर आली. तिनें मायाच्या हातांत पैसे टाकले व त्याला ती म्हणाली, " उद्यां एकादं कोंबड घेन येजो."

"सकालीच घेन येन." असें म्हणून तो तिला रामराम करून निघाला.

हातांत पैसे पडल्यावर माया फार खूष झाला. तो दीनाबाईच्या घरून निघाला व थेट वरोतीच्या बाजाराला गेला. तेथें जाऊन पहातो तों, ते कपडे

व बूट दुकानांत तसेच होते. त्यानें त्या दुकानदारांबरोबर थोडी घासाघीस केली व १२।। रुपयांला ते बूट, ती इजार व तो शर्ट खरेदी केला. लागलीच त्यानें ते कपडे अंगावर चढविले व आठ आण्यांची एक फणी विकत घेतली. त्यानें 'बाबरी' (केस) ठेवली होती. त्यामुळें त्याला फणीची फार जरुरी वाटत होती. नवे कपडे घालून तो रस्त्यानें निघाला. तो आतां खूप खूप खुषींत होता. रस्त्यानें जातांना तो गाणें गातच चालला होता. वाटेंत त्याला एकदोन ओळखीचे लोक भेटले. ते त्याला म्हणाले, "काय माया, पक्का सायब (साहेब) झाला तूं आज."

"सायब क्याचा ? (साहेब कसला) घडीभर गंमत" तो म्हणाला.

गात गात तो घरीं आला. मायाची व त्याची आई दारांत बसूनच गोष्टी करीत होत्या. जवळ येईपर्यंत त्यांचें त्याच्याकडे लक्ष नव्हतें. तो समोर येऊन उभा राहिल्यावर मायाची त्याला एकदम म्हणाली, "ह्यो र काय ? हीं नवीं सुडकीं (कपडे) कोठशी आणेल ?" तो कांहीं बोलला नाहीं. जवळ पडलेल्या चटईवर बसून तो विडी करूं लागला.

"ऐकस का नाय् ? नवीं सुडकीं क्याला आणेल ?" तिनें पुन्हा विचारलें.

"कईचा (केव्हांचा) घेयाचा होता मी सुडकीं; पण पशेच नाय् हातांत, तंय काय घेशी ?" तो म्हणाला.

"आज कोणी दिधेल तुला पशे ? (आज तुला पैसे कोणीं दिले ?) तिनें विचारलें.

"दीनाबाईशीं जाधेल (गेलों) मी. तथंशीं पशे घेतले. मग वरोतीच्या बाजारांशीं हीं सुड्कीं घेतलीं." तो शांतपणें म्हणाला.

"सावकाराचे पशे काढून अवढा खरचं (खर्च) कराया एवढी काय गरज पडेल तुला." ह्या वाक्यानें सुरुवात करून तिनें त्याची खूप हजेरी घेतली. तिचा राग अनावर झाला. दोन दिवसांपूर्वींच आंगठीसाठीं त्यानें

दोन तीन रुपये उधळले व आज पुन्हा सावकाराकडून पैसे काढून त्यानें हे कपडे आणले हें पाहून ती खूप खूप संतापली. तोंडाला येईल तें ती बोलत सुटली. तो एकाद्या गुन्हेगाराप्रमाणें चूप बसून तिचें सारें बोलणें खालीं मान घालून ऐकत होता. त्याला तसा शांत बसलेला पाहून तिचा राग अधिकच भडकला.

ती आणखी खूप बोलली असती, पण म्हातारी मध्यें पडली व म्हणाली, “क्याला एवढा गाज करस. त्याच्या जिवाला बेस नाय् अन् तूं अजूगा दिस गाज करशी. काढेल होवा पशे तर दिवालीला भरून टाका. नांग, माया सायब जसा दिसं नवीं सुडकीं भरली तंय.” ( इतका ओरडा कशाला करतेस ? त्याची प्रकृति चांगली नाहीं व तूं सबंध दिवसभर ओरडत बसतेस. पैसे काढले असले तर दिवाळीला भरून टाका. पहा, नव्या कपड्यांनीं माया कसा साहेबासारखा दिसतो. )

मायाचीनें ओळखलें कीं, आतां चूप रहाण्यांतच शहाणपणा आहे. तिनें मायाकडे नजर टाकली. खरोखरच तो तिला पुष्कळच चांगला दिसत होता. पण त्याची स्तुति करण्याच्या मनस्थितींत ती नव्हती. म्हातारीनें त्याच्या बिघडलेल्या प्रकृतीचा निर्देश केला नसता तर ती किती तरी वेळ बोलत राहिली असती. पण आतां ती चूप राहिली. कांहीं न बोलतां ती घरांत गेली व कामाला लागली. ती सबंध रात्र तिनें कोणाशींही न बोलतां काढली. तो पण कांहीं न बोलतां झोंपला. एक नवेंच वातावरण उत्पन्न झालें होतें.

* * *

: ५ :

सकाळीं माया केव्हां जागा झाला व केव्हां उठून बाहेर निघून गेला, तें मायाचीला समजलेंच नाहीं. ती जागी होऊन पहाते, तों पथारीवर तिला माया दिसला नाहीं. ती उठून आपल्या कामाला लागली. मध्येंच तिला तिच्या सासूनें विचारलें, " माया, कोठ ग, दिसं नाय् तो ? " "मला नाय् बा खबर ! कंयचा उठून जाघेल, " ती म्हणाली व पुन्हा कामाला लागली. तिनें तिचीं घरांतील कामें आटोपलीं व ती शेतावर गेली. तिला वाटलें माया शेतावर नक्की भेटेल, पण तो तेथें नव्हता. ती जाऊन काम करूं लागली. तिची खात्री झाली कीं, नवीन कपडे घालून माया कुठें तरी फिरायला गेला. शेतावरचें काम आटपून ती घरीं आली तरी माया घरीं आला नव्हता. थोडा वेळ ती झोपडीच्या बाहेर म्हातारीजवळ बोलत बसली. मायाबद्दल म्हातारीनें पुन्हा विचारतांच, " कोठ जायाचा तो ? पोटांत आग पडेल तय धान खाया येल. " तिनें उत्तर दिलें. थोडा वेळ त्या दोघी अशाच बसल्या. इतक्यांत तिचा मोठा मुलगा घराकडे येतांना तिला दिसला. तो जवळ आल्यावर तिनें त्याला विचारलें, " तुझ्या बासला नांगेल काय ?" ( तुझ्या बापाला पाहिला काय ? )

" नांगेल सा. पहला भंडाऱ्याच्या पट्ट्यांत ( ताडीच्या दुकानांत ) बशेल होता. बेस नयी डगलीं ( नवे कपडे ) भरेल. सायब जसा दिस. पका वखत तथं बसेल तो. मगां तथशीं जाघेल. " तो एवढें बोलतो इतक्यांत घरांतील लहान मूल रडूं लागलें, म्हणून मायाची उठून आंत गेली. जातांना ती सासूला म्हणाली, " वाट हेरजो त्याची, मी धान रांधत आहें. "

म्हातारी बाहेर बसली व तिचा मोठा नातू तिच्याजवळ बसून गोष्टी

करूं लागला. त्यानें त्याच्या बाबाचे कपडे पाहिले, त्या वेळीं तो खूप खूष झाला. त्याला त्याच्या बापाचा हेवा वाटूं लागला. तो म्हातारीला म्हणाला, "आया, तूं नांगेल माझ्या बासची डगलीं ? सायब जसा दिसतो. पकां बेस." (आजी तूं माझ्या बापाचे कपडे पाहिलेस ? साहेब जसा दिसत होता फार चांगला.)

"बेस तंय काय, पशे व पक्के दिघेल ते ?" (चांगले तर काय, पैसे पण फार दिले ते.)

थोडा वेळ तीं दोघें ह्याप्रमाणें बोलत बसलीं, इतक्यांत मायाचीनें जेवण तयार असल्याचें सांगितलें. "कवढी वाट हेरशी त्याची ? तो जाघेल होवा डहाणूला." (किती वाट पहाणार त्याची ? तो डहाणूला गेला असेल.) असें म्हणून म्हातारी जेवणाची तयारी करूं लागली. तिला आवडणाऱ्या भोपळ्याची भाजी तयार होती व म्हणून तिच्या तोंडाला पाणी सुटलें होतें. मायासाठीं थांबायला तिला वेळ नव्हता. मायाचीनें म्हातारीला व मुलांना जेवण वाढलें व ती लहान मुलाला पाजूं लागली. पुन्हा एकदां म्हातारीनें तिला जेवून घेण्याचा आग्रह केला. माया नक्की डहाणूला गेला असल्याचें तिला ती म्हणाली.

आतां माया न आल्यामुळें मायाचीला हुरहुर वाटूं लागली. होती. जेवणाचे वेळीं कधीं माया गैरहजर राहिल्याचें तिला माहीत नव्हतें. कुठेंही तो गेला तरी नेमका जेवणाच्या वेळीं हजर होई; पण आज तो जेवायलासुद्धां हजर नाहीं, हें पाहून तिला त्याच्याविषयीं थोडी काळजी वाटूं लागली. पण तो डहाणूला गेला असावा असें जें त्याची आई म्हणाली, तें तिला पटलें. तिची खात्री झाली कीं, चांगले कपडे घालून तो डहाणूलाच गेला असावा. कारण आतां थोड्याच दिवसांनीं 'कुपाचें काम' (जंगल तोडण्याचें) सुरू होणार होतें. माया सावकाराकडे जाऊन 'गाडी बांधून' येणार असेल. (जंगलचे व्यापारी ज्यांची गाडी आहे अशा

वाल्यांना आगाऊ पैसे देतात व मग ते वार्ली आपली गाडी त्या व्यापाऱ्याकडे माल ने आण करण्याकरितां वापरतात. एकदां अंगावर पैसे घेतले कीं, त्या वाल्यानें आपली गाडी त्याच व्यापाऱ्याकडे काम करण्यासाठीं उपयोगांत आणली पाहिजे. ह्याला ' गाडी बांधणें ' म्हणतात. )

असा विचार करून ती उठली व तिनें आपलें जेवण उरकलें. इतर कामकाज आटोपून ती म्हातारीवर घर सोपवून पुन्हा शेतावर निघून गेली. जातांना तिनें आपल्या मोठ्या मुलाला बरोबर नेलें. आतां तिचा हा मुलगा बराच मोठा झाला होता. पण अगदीं जरूर पडेल त्याच वेळीं ती त्याला शेतावर घेऊन जाई. एरव्हीं तो बकऱ्या चारायला नेई व बकऱ्या सोडून देऊन इतर मुलांच्या बरोबर खेळत राही. वास्तविक हें त्याचें वय शाळेंत जाण्याचें होतें; पण एकतर त्यांच्या गांवांत शाळा नव्हती व दुसरी गोष्ट म्हणजे शाळा जरी गांवांत असती तरी तो शाळेंत जाऊं शकला नसता. कारण शेण गोळा करणें, पळसाचीं पानें खुडून आणणें, टेंभुर्णीचीं पानें गोळा करणें, बकऱ्या चारायला नेणें इत्यादि कामें तो जर शाळेंत गेला असता तर अडून राहिलीं असतीं. या कामांमुळेंच तर वार्ली मुलें शाळेंत जात नाहींत.

ज्यांच्या घरीं मुलांची संख्या जास्ती आहे, ते गांवांत जर शाळा असेल तर आपल्या एकदोन मुलांना शाळेंत पाठवितात. परंतु ह्या खेड्यांतील शाळांत एक शिक्षक व तोसुद्धां इतका अनियमितपणें शाळेंत येई; आणि प्रसंगीं मुलांना इतकी मारहाण करी कीं, वार्ली मुलें लवकरच शाळेला कंटाळून जात. मग शाळेची सरासरी हजेरी एकदम कमी आहे असा रिपोर्ट शिक्षक पाठवी व बोर्ड नियमाप्रमाणें ती शाळा बंद करी. मग त्या शिक्षकाची आपोआप दुसऱ्या गांवीं बदली होई. अर्ज, विनंत्या करून जें काम साध्य होत नसे तें ह्या मार्गानें आपोआप होई. ह्याच प्रकारें बहुतेक खेड्यांतील शाळा चालत. मग वार्ल्यांची शैक्षणिक प्रगति होणार कुठून ?

संध्याकाळ झाली तरी मायाचा पत्ता नव्हता. संध्याकाळीं शेतावरून मायाची परत आली व झोपडीच्या दारांत बसून ती तिच्या मुलीच्या डोक्यांतील उवा पहात बसली. इतक्यांत तिच्या शेजारची देराणी तिथें आली व तिनें विचारलें, "मायाची, माया कोठे जाधेल आज ? कईशी नजरे नाय् पडे तो ! ( मायाची, माया कोठें गेला ? केव्हांपासून दिसला नाहीं तो ! )

"सावकारांशीं जाधेल होवा; गाडीवर पशे काढाचा होता." ( गाडी सावकारांकडे फिरविण्याचें नक्की करून त्यांच्याकडून अंगावर पैसे काढणार होता. )

तिचें ह्या उत्तरानें समाधान झालें व त्यानंतर ह्या बाबतींत तिनें फारसे प्रश्न विचारले नाहींत. इतर अवांतर गोष्टी बोलून ती निघून गेली. रात्रीं ज्या वेळीं मायाची पथारीवर पडली, त्या वेळीं माया जवळ नसल्यामुळें, एकलेपणाची जाणीव तिला बेचैन करूं लागली. आपणाशीं भांडण झाल्यामुळेंच माया घरांतून निघून गेला याची तिला जाणीव होती. माया कुठें गेला असेल ? कधीं परत येईल ? याविषयीं ती सारखा विचार करूं लागली. त्याच्याविषयीं आतां तिला पुष्कळच काळजी वाटूं लागली. तिचें मन खूप अस्वस्थ झालें. तिला झोंप लागेना. ती सारखी ह्या कुशी-वरून त्या कुशीवर तळमळत लोळत होती. दोनतीन वेळां तर तिला नवरा येऊन आपणांस हांका मारीत आहे असा भास झाला. त्यामुळें ती उठून येऊन पाहून गेली. कशीबशी तिनें रात्र काढली.

सकाळीं उठल्यावर तिच्या सासूनें तिच्याजवळ मायाची चौकशी केली; पण तो अद्यापि आला नसल्याचें सांगितल्यावर तो डहाणूलाच गेला असावा असें पुन्हा पुन्हा ती सुनेला सांगूं लागली. आज घरीं राहिल्यास आपल्या आधींच बेचैन मनाला खूप त्रास होईल अशी खात्री वाटल्यामुळें व ह्या दिवसांत शेतावरसुद्धां खूप काम असल्यामुळें ती शेतावर जाण्याची

तयारी करूं लागली. आज रोजच्याप्रमाणें ती दुपारीं जेवायला घरीं येणार नव्हती, त्यामुळें सासूच्या व लहान मुलीच्या दुपारच्या जेवणाची तिनें सोय केली. नंतर आपलें जेवण आणि मोठा मुलगा बरोबर घेऊन ती शेतावर निघून गेली.

शेतावर आल्यापासून ती सारखी काम करीत होती. तिचा तो मुलगा वयानें लहान असला तरी तिला पुष्कळच मदत करीत होता. मध्यंतरीं ती दोनतीन वेळां मुलाला पाजण्याकरितां उठली व दुपारीं एक तासभर जेवणासाठीं तिनें विश्रांति घेतली. दिवसभर ती एकाद्या नशेंतच होती व सारखें काम करीत होती. आतां ती थकली व त्यामुळें तिचे हातसुद्धां चालेनासे झाले. तो मुलगासुद्धां कंटाळला व घरीं जाण्याची भाषा बोलूं लागला. आतां सूर्यसुद्धां उतरणीला लागला होता. घरीं जाऊन पुन्हा जेवण करावयाचें होतेंच, त्यामुळें तिनें काम बंद केलें व मुलाला घेऊन ती घराकडे निघाली.

घराच्या रस्त्याकडे तिचे पाय वळले तसे घराबद्दलचे विचार पण तिच्या डोक्यांत थैमान घालूं लागले. तिला वाटलें, आतां माया आला असेल व दारांत बसून तो आपली वाट पहात असेल. त्याला पाहिल्यावर त्याच्याशीं कसें वागावें याचा ती विचार करूं लागली. ह्या गोड विचारांत निमग्न असतांच ती घरीं येऊन पोहोंचलीसुद्धां.

पण दारांत तिला माया दिसला नाहीं. तो अद्यापि आला नसल्याचें जेव्हां तिच्या सासूनें तिला सांगितलें, तेव्हां तिला खूप वाईट वाटलें. थोड्या वेळानें ती भानावर आली. माया अद्यापि आला नाहीं, ही गोष्ट कोणा-जवळ न बोलण्याविषयीं तिनें म्हातारीला बजावून सांगितलें.

त्यानंतर म्हातारीला भूक लागली असेल ह्या विचारानें ती स्वयंपाकाला लागली. तिनें भात शिजविला. आज 'आंबट' करण्याच्या मनःस्थितींत ती नव्हती. म्हणून भात शिजत असतां त्या भातांतच तिनें थोडें मीठ

घातलें व तें जेवण म्हातारीच्या व मुलांच्या पुढें ठेवलें. मग म्हातारीला मुलांकडे लक्ष देण्यास सांगून ती घराबाहेर पडली.

ती जी निघाली ती थेट त्या भंडाऱ्याच्या ताडीच्या झोपड्याकडे वळली तेथें जाऊन ती त्या भंडाऱ्याला हळूच मायाबद्दल विचारूं लागली. माया त्या दिवशीं सकाळीं तास दीड तास आपल्या दुकानांत बसला व मग कुठेंतरी निघून गेला, इतकीच माहिती त्यानें सांगितली. त्या दिवशीं मायानें नवीन कपडे घातले होते असेंही त्यानें सांगितलें. इतकी माहिती सांगितल्यावर मायाचीच्या तोंडाकडे पाहून त्या भंडाऱ्याला कांहीं वेगळाच संशय आला. मायाबाबत तिच्याकडून कांहीं जास्त माहिती मिळविण्याच्या हेतूनें त्यानें तिला अधिक प्रश्न विचारण्यास प्रारंभ केला. माया डहाणूला सावकाराकडे कामाला गेला आहे असें तिनें सांगतांच तो तिला कामाच्या स्वरूपाविषयीं प्रश्न विचारूं लागला. त्यावर तिनें " घोल्या (पुरुष) माणसाचं काम म्हाताऱ्यांना (बायकांना) थोडीच सांगत. " असें म्हणून पुढें येणाऱ्या प्रश्नांची सरबत्ती चुकविण्यासाठीं ती तिथून पटकन् निघून गेली.

ती घरीं आली, जेवली व म्हातारीजवळ बसून बोलूं लागली. इतक्यांत देराणी आली व तिनें मायाबाबत प्रश्न विचारतांच तिनें आदल्या दिवशींचेंच पुन्हा उत्तर दिलें व डहाणूंतील त्याचें काम न संपल्यामुळें तो आला नसल्याचें तिला सांगितलें. थोडा वेळ इकडल्या तिकडल्या गप्पा करून देराणी निघून गेली.

ती गेल्यावर मुलांना घेऊन मायाची जेव्हां आडवी झाली, तेव्हां तिचे मायाबाबतचे विचार तिला जोरानें सतावूं लागले. माया कुठें तरी कायमचा गेला व तो परत येणार नाहीं, अशी आतां तिची जवळजवळ खात्री झाली. आतां ह्यापुढें आपणांवर तीन मुलांना व एका म्हातारीला पोसण्याची जबाबदारी येऊन पडली, याची तिला पहिल्यानें

जाणीव झाली. याप्रमाणें ती विचार करीत असतांच तिचें लहान बाळ रडूं लागलें. त्या रडण्यामुळें ती भानावर आली आणि मुलाला पाजूं लागली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं म्हातारी व मुलें उठण्याच्या आधींच ती जागी झाली. उठल्याबरोबर ती चुलीच्या कोपऱ्यांत बाजूला खणूं लागली. मध्यंतरीं गवताचे भारे विकून मायानें दहापंधरा रुपये जमविले होते. ते पैसे मायाचीनें त्याच्याजवळून काढून घेतले व अडीअडचणींना कामीं पडावे, म्हणून घरांतच चुलीजवळ तिनें ते पुरून ठेवले होते. आतां मायाची तेच पैसे शोधूं लागली. खड्डा उकरल्यावर ते पैसे तिला मिळेनात. जागा खणतांना आपली चूक तर झाली नाहीं ना ? असा विचार तिच्या मनांत आला व त्या जागीं ठेवलेल्या खुणा तिनें पुन्हा एकदां पाहून घेतल्या. पुन्हा ती ते पैसे शोधूं लागली. थोड्या वेळानें तिची खात्री झाली कीं, ते पैसे जागेवर नाहींत. पैसे नक्की माया घेऊन गेला, हें तिला पटलें व त्याचबरोबर त्याच्या परत येण्याबाबत ती पूर्ण निराश बनली.

दिवस कसाबसा गेला. रात्र आली. आतां माया येणार नाहीं, अशी जवळजवळ तिची खात्री झाली. पण आशा वेडी असते. मायाजवळ असलेले पैसे सहा सात दिवसांत संपून जातील व पैसे संपल्यावर तो धांवत घरीं येईल, असें तिचें मन तिला सांगूं लागलें. या विचारानें तिचें समाधान झालें व तिला थोडें हलकें वाटूं लागलें.

पण आतां माया गेल्याला आज आठ दिवस झाले. तिचा धीर आतां पूर्ण सुटला. या दिवशीं त्या पाड्यावर रहाणाऱ्या वीस बावीस घरांतील सर्व स्त्रिया एकत्र जमून तिच्या घरीं आल्या व तिच्याजवळ मायाबाबत तपास करूं लागल्या. लहानपणापासून आपण सर्व एकत्र वाढलों असल्यामुळें व मायाशीं आपला नात्याचा संबंध असल्यामुळें त्याच्या जाण्यामुळें आपणां सर्वांना दुःख व काळजी वाटत असल्याचें त्या

सर्वांनीं सांगितलें. क्षणभर ती गोंधळली. तिचें हृदय भावनांनीं भरून आलें. आपला नवरा घरांतून पळून गेला असें तिला त्यांना सांगावयाचें नव्हतें. थोडा वेळ शांत राहून त्यांचें बोलणें तिनें ऐकून घेतलें व नंतर ती त्यांना म्हणाली, " डहाणूशीं एक मांगेला इघेल ( आला ) होता. तो सांग, पोराचा बास ( पोरांचा बाप—वार्ली बायका नवऱ्याचें नांव कधींसुद्धां घेत नाहींत. वार्ली पुरुष पण बायकांना नांवानें कधीं हांक मारीत नाहींत. ) सावकाराच्या हारी ( बरोबर ) पठारात ( शहरांत ) जाघेल. तो तथंच रह्याचा, मगां शिमग्यावर इयाचा. "

ह्या तिच्या उत्तरानें त्यांचें समाधान झालें किंवा नाहीं तें नीटसें स्पष्ट झालें नाहीं. पण त्या तिच्याबरोबर थोडा वेळ बोलत बसल्या व त्यांनीं तिला पडेल ती मदत करण्याचें आश्वासन देऊन त्या घरीं निघून गेल्या. त्या गेल्यावर तिनें सुटकेचा निःश्वास टाकला. त्या रात्रीं बसून ती मनसोक्त रडली.

पण मायाची धीराची बायको. दुसऱ्या दिवशीं सकाळीं ती उठली व मोठ्या जोमानें कामाला लागली. माया गेला. आतां घरची सर्व जबाबदारी आपल्यावरच पडली आहे व ती आतां आपण नीटपणें पार पाडलीच पाहिजे असें तिनें मनाशीं ठरविलें. ती उठून देराणीकडे गेली व आतां लवकरच सावकाराकडून खंड वसुलीला लोक येण्याचा वेळ जवळ आल्यामुळें मळणीच्या कामाला आपणांस तिची मदत लागेल असें तिनें तिला सांगितलें. देराणीनें आपण व आपला नवरा येऊन सर्व कामास जरूर ती मदत करूं असें आश्वासन दिलें. त्या आश्वासनानें संतुष्ट होऊन ती आपल्या घरीं गेली व पुन्हा उत्साहानें कामाला लागली.

दिवसामागून दिवस जात होते. मायाची रोज शेतावर जाऊन काम करीत होती. आतां नियमितपणें आपल्या मोठ्या मुलाला बरोबर घेऊन ती जाई व त्याला कामाला लावी. शेजारच्या लोकांच्या मदतीनें तिची

मळणी झाली व कणगा बांधून तिनें त्यांत भात भरून ठेवलें. आतां सावकाराचा माणूस केव्हां येऊन आपला खंड घेऊन जातो ह्याची ती वाट पहात राहिली.

इतक्यांत सावकाराचा कारकून दोनतीन दिवसांनीं खंडाच्या वसुली-करितां येणार अशी बातमी त्यांच्या पाड्यावर येऊन थडकली. ते सर्व वार्लीं एकाच सावकाराची जमीन खंडानें लावीत. तो त्यांचा सावकार फार श्रीमंत होता. तो स्वतः चारपांच वर्षांतून एकदां केव्हांतरी कांहीं विशेष भानगड असली तरच शेतावर येत असे. एरव्हीं त्याचा एक बुटका म्हातारा चष्मेवाला कारकून येऊन खंड वसूल करून घेऊन जाई. तो जुना कारकून वारल्याचें व त्याच्या जागीं सावकारानें नवीन मनुष्य नेमल्याचें ह्या मंडळींना समजलें होतें. त्यामुळें जेव्हां तो कारकून येणार अशी बातमी आली, तेव्हां, ‘ तो कसा असेल ? आपणांस कितपत त्रास देईल ? ’ याविषयीं ते सर्वजण चर्चा करूं लागले.

शेवटीं एकदांचा तो येऊन थडकला. तो उंच, मजबूत व निमगोरा होता. त्यानें जंगल खात्याच्या अधिकाऱ्याप्रमाणें खाकी विजार, बूट व साहेबी टोपी घातली होती. तो आल्यावर त्यानें मायाच्या दारांत येऊन छपरांवर छडी वाजवली. तो आवाज ऐकून मायाची व तिची सासू बाहेर आली. त्यांच्याजवळ त्यानें मायाची चौकशी केली. तेव्हां म्हातारी पुढें होऊन म्हणाली, “ माझा पोरगा जाधेल पठारान्. खंड तयार आहे. तूं सांगशी तंय देऊं. ” ( माझा मुलगा शहरांत गेला आहे, खंड तयार आहे. तूं सांगशील तेव्हां देऊन टाकूं. ) हें तिचें बोलणें ऐकून, दुपारीं जेवण झाल्यावर आपण येऊं, असें सांगून व मायाचीकडे एकदां नजर टाकून तो निघून गेला.

ठरल्याप्रमाणें तो दुपारीं आला. मायाचीनें देराणीला सांगून तिच्या नवऱ्याला बोलावून घेतलें. देराणीच्या नवऱ्यानें त्या कारकुनाला खंडाचें

धान्य मोजून दिलें. त्यानें रिकामीं पोतीं बरोबर आणलीं होतीं. त्या पोत्यांत त्या मंडळींनीं तें सर्व धान्य घातलें व गोणी बांधून तयार केल्या. मायाची आंत गेली. तिनें एक कोंबडी व ७।८ अंडीं आणून तीं देराणीला दिलीं व तिनें आपल्या नवऱ्यामार्फत सावकाराला वर्षदिवसाचा नजराणा सादर केला. दरवर्षीं कारकून खंड वसूल करायला येईल तेव्हां, त्याला याप्रमाणें नजराणा देण्याची पद्धति त्यांच्या सावकारानें लावून दिली होती. दिलेली कोंबडी कारकुनाच्या मालकीची होत असे कीं, सावकाराच्या? ह्याचा तपास ते वार्ली करीत नसत. प्रामाणिकपणें ते वर्षांतून एक कोंबडी घरांतून उचलून सावकाराला देत ही गोष्ट खरी.

आपण मेहनत करून तयार केलेलें भात आपणांसाठीं फारच थोडें शिल्लक ठेवून, जवळजवळ सर्वच सावकाराला घालतांना वार्ल्यांना यातना होत किंवा नाहींत हें त्यांच्या चेहऱ्यांवरून कळत नसे. त्यांचे चेहरे नेहमींच निर्विकार दिसतात. (एकाद्या यंत्राप्रमाणें खंडाच्या वेळीं धान्य मोजून देतांना लेखकानें ह्या वार्ल्यांना पाहिलें आहे.) त्या वेळची त्यांची वृत्ति स्थितप्रज्ञाप्रमाणें दिसते. कारकुनाच्या पदरांत धान्य व कोंबडी पडल्यावर त्यानें चार आणे ‘ पीणीसाठीं ’ ( ताडी पिण्याकरितां बक्षिस म्हणून ) म्हातारीच्या अंगावर टाकून व पुन्हा एकदां मायाचीकडे नजर टाकून तो तेथून आपल्या मुक्कामाच्या ठिकाणीं निघून गेला.

काळ झपाट्यानें पुढें चालला होता. अजून माया आला नव्हता. आतां माया परत येईल अशी आशा पण मायाचीला वाटत नव्हती. मुलांना तर मायाची आठवणसुद्धां होत नसे. माया नांवाचा मनुष्य आपला बाप म्हणून ह्या घरांत रहात होता, ही गोष्टसुद्धां मुलें विसरून गेलीं होतीं. होळीच्या सणाच्या वेळीं माया परत येईल अशी जी अंधुक आशा त्याच्या बायकोला वाटत होती तीसुद्धां फोल ठरली. राबासाठीं टहाळ वगैरे गोळा करण्याकरितां तीं मुलें फिरूं लागलीं. आतां मायाचा मोठा मुलगा

जेव्हा हा आपणांवर पडलेली जबाबदारी ओळखून होता. तो आईच्या बरोबरीनें काम करी व तिला मायाची गैरहजेरी न जाणवेल अशी काळजी घेई. राबाचे दिवस संपले. पावसाळा आला. देराणीच्या व तिच्या नवऱ्याच्या मदतीनें मायाचीनें शेताचें काम अगदीं व्यवस्थित चालविलें होतें.

पुढें दिवाळीचे दिवस जवळ येत चालले व आतां दिवाळीला तरी माया परत येईल असें मायाचीला वाटूं लागलें. ओला चारा विकून मायाचीनें थोडे रोख पैसे जमा केले होते. त्या पैशांतून तिनें मुलांकरितां थोडे तयार कपडे व म्हातारीला एक चोळी आणली. ते सर्व कपडे आणून तिनें मुलांना दिले. मायानें पाठविलेल्या पैशांतून आपण कपडे आणले व माया आतां लवकरच येणार आहे, अशी बातमी पसरविण्याचा तिनें मनाशीं विचार केला. नवे कपडे अंगांत घालून मुलें आजूबाजूला हिंडूं लागलीं. त्या मुलांच्या अंगांवर नवीन कपडे पाहून भोंवतालच्या मंडळींना आश्चर्य वाटलें. मायाच मुलांसाठीं कपडे घेऊन आला असेल असें त्यांना वाटलें. सर्व बायका मायाचीच्या झोपडीकडे वळल्या.

त्यांना पाहून मायाची बाहेर आली व "माया इघेल सा ?" ( माया आला का ? ) असा त्यांनीं प्रश्न विचारतांच–" इघेल नाय्, पण दिवाली कराया इयाचा. त्याचा सावकार पका बेस. त्याला अज्गा दिस ( सबंध दिवस ) हारी न हारी ( बरोबर ) हिंडव. आतां दिवालीला रजा दियाचा चार दिसाची " असें तिनें उत्तर दिलें. त्या सर्व भोळ्या बायांचें ह्या उत्तरानें समाधान झालें व मायाचीच्या हंसऱ्या बोलण्यामुळें तिच्या शब्दांच्या खरेपणाविषयीं तिळमात्रसुद्धां संशय घेण्याची त्यांना जरुरी वाटली नाहीं. थोडा वेळ मायाचीबरोबर गोष्टी बोलून त्या सर्वजणी आपआपल्या घरीं निघून गेल्या.

त्या बायांसमोर मायाचीनें जरी बेमालूम नाटक केलें तरी तें सोंग तिला

फार वेळ चालवितां येईना. रात्रीं सर्वत्र झोंपेचें साम्राज्य पसरलें, तरी मायाचीला झोंप येईना. तिच्या सर्व भावना जोरांत उचंबळून आल्या. ती मनसोक्त रडली. कधीं, माया गेला तो परत येणार नाहीं ह्या विचारानें ती रडत असे; तर कधीं, आपला नवरा पळून गेला ह्या विचारानें लज्जित होऊन ती रडे; तर कधीं, उभ्या जगांत आपणास कोणाचा आधार नाहीं, या तीन मुलांना व म्हातारीला पोसण्याची जबाबदारी आपणांवर येऊन पडली आहे, ह्या विचारानेंही तिला रडूं कोसळे. अशा रीतीनें एकदां भरपूर रडल्यावर तिची छाती हलकी होई व नंतर ती मोठ्या उत्साहानें व धीरानें आपल्या कामाला लागे. ती धीराची बाई होती. इतर बायांसारखी ती दुबळी नव्हती. पण स्त्रीस्वभावसहज अशा भावना कधीं कधीं तिला विकल करून सोडीत. त्यावेळीं तिचा इलाज चालत नसे. पण दिवसा मात्र तिच्या डोळ्याला कधींच पाणी येत नसे. ती सदासर्वदा कामांत मग्न असे. आतां तिला मधून मधून लोक मायाबद्दल प्रश्न विचारीत. त्या वेळीं ती न डगमगतां त्यांना शांतपणें उत्तर देई. तिच्या चेहऱ्यावरील त्या वेळचे विकार पाहून कोणालाहि तिच्या बोलण्याबद्दल संशय येत नसे.

आज ती सकाळींच उठून कामाला गेली. तिनें काल रात्रीं एक युक्ति योजली होती. काशाला रेंज ऑफिसांत जो कारकून असतो, तो पोस्टाचें काम करतो हें तिला माहीत होतें. त्याच्याकडे ती गेली. तो गरीब लोकांचीं पत्रें लिहून देतो, हें तिला माहीत होतें. त्याच्याकडे ती गेली व मायाला पत्र लिहिण्याविषयीं ती त्याला विनंति करूं लागली. तिनें त्याच्या मेहनतीबद्दल पैसे देण्याचेंही कबूल केलें. पत्र कोणत्या गांवीं पत्र पाठवावयाचें असें त्यानें विचारतांच तिनें मुंबईचें नांव सांगितलें. पण त्या कारकुनानें तिला पूर्ण पत्ता सांगण्यास सांगितलें, त्या वेळीं ती एकाद्या बावळटाप्रमाणें त्याच्याकडे पाहूं

लागली. तिला वाटलें मायाचें नांव घालून मुंबईला पत्र टाकलें कीं, तें त्याला मिळेल. तिनें त्याला पुन्हा पुन्हा विनवण्या केल्या. अधिक पैसे देण्याची लालूच दाखविली. पण तो कारकून सज्जन असल्यामुळें त्यानें तिचे पैसे घेतले नाहींत. गोड शब्दांत तिची समजूत घालून तिला परत पाठवलें. मायाचा तपास करण्याचें तें एकमेव साधन निरुपयोगी ठरलें. ती खूपच निराश झाली व जड पायांनीं घराकडे वळली. आतां लोकांच्या तोंडावर फेकण्यासाठीं कोणती युक्ति योजावी, याचा ती विचार करूं लागली. कारण दिवसेंदिवस मायाचा तपास करणाऱ्या लोकांची संख्या वाढत चालली होती.

* * *

## : ६ :

मायाला पत्र पाठविण्याची तिची युक्ति सफल झाली नाहीं. तेव्हां आतां पुढें काय करावें याचा ती विचार करूं लागली. तिला वाटत होतें कीं, मायाकडून जर एकादें पत्र आलें तर बरें होईल; पण तें पत्र येणार कसें ? मायाचा तर पत्ता नव्हता. तो कुठें गेला हें कुणीसुद्धां सांगूं शकत नव्हतें. लोकांकडून सारखी मायाबद्दल विचारपूस होत होती. म्हणून या लोकांच्या तोंडावर फेकून त्यांचें समाधान होऊं शकेल असें एकादें नामी उत्तर शोधून काढण्यांत ती मग्न होती. माया गेल्याबद्दल तिला जें दुःख झालें, त्यापेक्षां मायाबद्दल विचारण्यांत आलेल्या प्रश्नांनीं व लोकांच्या कुजबुजण्यानें तिला जास्त दुःख होऊं लागलें.

माया दिवाळींत येईल असें मागें जेव्हां ती घरीं आलेल्या बायांना म्हणाली, तेव्हां दिवाळीपर्यंत लोक चूप बसले. पण दिवाळींत तो आला नाहीं, इतकेंच नव्हे तर दिवाळीच्या मागून शिमगा गेला, तरी त्याचा पत्ता लागेना. तेव्हां साहजिकच भोंवतालचे लोक वाढत्या प्रमाणांत त्याचा तपास करूं लागले व त्यांना उत्तरें देतां देतां ती बेजार झाली.

शेवटीं तिनें दुसरी एक युक्ति योजली. एके दिवशीं ती म्हातारीला म्हणाली, " आया, मी सांग उद्यां डहाणूला जायाची, रातचं वख्ताला तथंच रहाया पडेल, तूं पोरांना आंबील करून घालजो. " ( मी उद्यां डहाणूला जाणार, कदाचित् रात्रीं तिथेंच रहावें लागेल. तूं पोरांना पेज करून पाज. ) याप्रमाणें तिनें म्हातारीला सांगितलें. तत्पूर्वीं तिनें शहरांत नेऊन विकण्याकरितां एकावर एक असे दोन लांकडाचे भारे बांधून ठेवले होते. हल्लींच्या दिवसांत त्या लाकडांचे तिला दीडदोन रुपये मिळण्यासारखे होते.

तसेंच तिच्या घरांत असलेलीं ८।९ अंडींही तिनें एका फडक्यांत बांधून घेतलीं. हीं अंडीं विकूनही तिला एकादा रुपाया मिळाला असता. अशा रीतीनें दोन अडीच रुपये कमाविण्याच्या तयारीनें ती निघाली; पण डहाणूला जाण्याचा तिचा उद्देश मात्र निराळाच होता.

पहाटेस ती लवकर उठली आणि तो भारा व तीं अंडीं घेऊन ती निघाली. शिवाय, जवळ असलेले दोनतीन रुपये पण तिनें घेतले व कोणालाही सुगावा न लागूं देतां ती निघून गेली. जातांना पोरांना आंबील तयार करून पाजण्यास तिनें म्हातारीला सांगितलें. म्हातारी जागीच होती. तिनें तिला शक्य तितक्या लवकर येण्याविषयीं बजावलें.

मायाची निघाली व तिनें डहाणूची वाट धरली तिच्या डोक्यांत विचाराचें चक्र जोरानें फिरत होतें. तिनें योजलेली युक्ति कशी यशस्वी करावी याचा ती सारखा विचार करीत होती. या विचारांत ती मग्न असतां तिचीं पाउलें मात्र झपाझप पडत होतीं. विचाराच्या तंद्रीमध्यें ती आंबेसरीला येऊन पोहोंचली; पण तें तिच्या लक्षांतही आलें नाहीं. मायाचीच्या गांवाचें नांव चिंचलें. चिंचल्याहून आंबेसरी साधारण पांच मैल दूर. रस्ता मात्र बराच खराब आहे. वाटेंत बारीची खिंड लागते. शिमग्यानंतर गाड्यांची वहातूक फार होते. त्या वेळीं तर तो रस्ता नेहमींपेक्षांही अतिशयच खराब होतो. गाडींत बसून त्या रस्त्यानें गेलें तर इतके धक्के बसतात कीं, गाडींतील माणसांचीं डोकीं एकमेकांवर आपटतात. ह्या रस्त्यावरून गाडींत बसून जाण्यापेक्षां चालत जाणें अधिक सोयीचें व सुखाचें वाटतें. वारली लोकांना मैलच्या मैल पायांनीं जाण्याचें कांहींच वाटत नाहीं व जंगलांतील पायरस्त्यानें तर वारली फारच झपाट्यानें चालतात. त्यामुळें मायाचीला आंबेसरीपर्यंत यायला फारसा वेळ लागला नाहीं.

आंबेसरीला एक मोठें वडाचें झाड आहे. त्या झाडाजवळच एक विहीर आहे. बाजूला एक ताडीचा पट्टा आहे. ह्या झाडाखालीं भर दुपारीं-

सुद्धां भरपूर सावली असते. ह्या झाडाखालीं नेहमीं कित्येक गाडीवाले गाड्या सोडून बसलेले असतात. एथें छाया व पाणी असल्यामुळें बैलांना विश्रांति देण्यासाठीं ही जागा फार सोयीची आहे. शिवाय ताडीचा पट्टा आहे. ताडीचा पट्टा असल्यामुळें गाडीवाल्यांनासुद्धां एथें श्रमपरिहार करायला सोय आहे. ह्याखेरीज जे गाडीवाले १०-१५ मैल लांबून येतात, त्यांना आंबेसरीला थोडा मुक्काम करणें जरूर वाटतें. थोडा वेळ एथें थांबून जेवण वगैरे करून, विश्रांति घेऊन ते पुढचा रस्ता सुधारतात. ही जागा मोठी रमणीय आहे. मायाची ह्याच झाडाखालीं थोडा वेळ बसली. तेथें तिला तिच्या ओळखीच्या चारदोन बायका भेटल्या. त्यांच्याजवळ थोडें बोलून ती पुढचा मार्ग आक्रमूं लागली.

आंबेसरीहून निघाल्यावर मायाची पुन्हा झपाट्यानें चालूं लागली व वाटेंत 'सरावलीला' पुन्हा एकदां विश्रांति घेऊन ती मल्याणीला (डहाणू रोड स्टेशन) आली. तेथें थांबून तिनें एक आण्याचे 'डाले' (चणे) विकत घेतले. थोडा वेळ तेथेंच बसून तिनें ते खाल्ले. नंतर एका विश्रांतिगृहाच्या दारांत उभे राहून तिनें अर्धा कप चहा घेतला. ती उभी असतां तिनें आपला भारा विकण्याचा प्रयत्न केला; पण लाकडाला स्टेशनपेक्षां गांवांतच जास्त भाव मिळेल या आशेनें तिनें तेथें लांकडें विकलीं नाहींत. मात्र एक चांगलें गिऱ्हाईक येतांच तिनें आण्याला एक याप्रमाणें अण्डीं मात्र विकलीं.

गांवांत जाऊन तिनें ते लाकडाचे भारे विकून टाकले. त्यानंतर नेहमीं माया ज्या मांगेल्याकडे उतरत असे, त्याच्याकडे ती गेली व तेथें तिनें मायाचा तपास केला; पण माया तेथें आलाच नसल्यामुळें तिला त्याच्याकडून कोणतीही माहिती मिळूं शकली नाहीं. शेवटीं ती तेथें थोडा वेळ बसली व माया गेल्या दिवसापासूनची हकीगत तिनें त्याला सांगितली. माया शहरांत कुणाकडे तरी कामाला गेला असेल व एकदां माणूस शहरांत गेला कीं, त्याला

शहरचे लोक वरचेवर रजा देत नाहींत, असें त्या मांगेल्यानें तिला सांगितलें. त्याचें उत्तर ऐकून तिचें थोडेंबहुत समाधान झालें. तिथून ती उठली व तिनें घरचा रस्ता सुधारला.

ह्हाणूहून ती जेव्हां परत मल्याणीला आली, तेव्हां ती एका वाणी व्यापाऱ्याच्या दुकानांत शिरली. तिच्याजवळ माल विकून आलेले२||-३ रुपये व घरून आणलेले २-३ रुपये होते. ह्या ५-६ रुपयांतून म्हातारीला एक चोळी, लहान मुलाला एक डगली व मोठ्या मुलीकरितां एक चोळी इत्यादि जवळच्या पैशानें घेतां येतील इतके कपडे तिनें घेतले व दोन आण्यांचे चणे घेऊन ती पुन्हा चालूं लागली. आपण रात्रींपर्यंत घरीं जाऊन पोहोंचूं असें तिला वाटलें नाहीं. सबब रात्रीं वाटेंत मुक्काम करण्याचें तिनें ठरविलें.

सरावलीला तिच्या ओळखीची एक बाई रहात होती. तिचा नवरा सरावलीला पुनमचंद नांवाच्या मारवाडी सावकाराकडे नोकरीला होता. चिंचलें आंबेसरी एथें जाणारे बहुतेक वार्ली लोक सरावलीच्या ह्या शेटच्या आवारांतून जात. कारण, तो रस्ता फार जवळचा वाटे त्यांना. मायाची त्याच रस्त्यानें जाणार होती. म्हणूनच तिनें वर सांगितलेल्या बाई-कडे ती रात्र काढण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें ती सरावलीला पोहोंचली व त्या बाईला भेटून आपला रात्रभर तिथें राहाण्याचा विचार तिनें तिच्या कानांवर घातला. आपल्याकडे 'मायाची पाणेरी इधेल' ( पाहुणी आली ) ह्या विचारानें त्या बाईला फार आनंद झाला. सुखदुःखाच्या गोष्टी बोलत मायाचीनें ती रात्र तिथेंच काढली व सकाळीं उठून ती आपल्या मार्गाला लागली.

मायाची सकाळीं लवकर उठली व घराकडे जाण्यास निघाली. आपल्या जवळच्या लोकांना मायाबद्दल एक नवीनच बातमी सांगण्याचें, वाटेनें जातांना ती ठरवीत होती. ही नवी बातमी लोकांना कळल्यावर कांहीं दिवस

तरी ते आपणांस मायाबाबत प्रश्न विचारून छेडणार नाहींत, असें तिला वाटत होतें. रस्त्यानें जातांना ती स्वतःच्या विचारांत पूर्णपणें मग्न होती. ही तिची समाधि, तिला ज्या वेळीं दोन चार बाया भेटून तिच्याशीं बोलूं लागल्या त्याच वेळीं भग्न पावली.

ह्याप्रमाणें विचारामध्यें मग्न असतांच ती घराजवळ येऊन पोहोंचली. घर जसें जवळ आलें तशी ती शुद्धीवर आली. घरीं जाऊन आपणांस एक नाटक करावयाचें आहे, ह्याची तिला जाणीव झाली. ही आपली भूमिका नीटपणें बजावण्याची तयारी तिनें चालवली. इतक्यांत ती घरीं येऊन थडकलीच.

घरीं आल्याबरोबर दारांतच ती ओरडली, " यारे अज्गे, नांगा तुमच्या बासनें काय धाडेल तुम्हां दियां. " ( यारे सगळे, तुमच्या बापानें तुम्हांला देण्यासाठीं काय पाठविलें तें पाहा. ) हे तिचे शब्द ऐकतांच तिचीं मुलें व म्हातारी पटकन् तिच्याजवळ आली. तिनें कागदांतून आणलेले ते कपडे सोडून त्यांच्या हातांत दिले.

ते कपडे पाहून मुलें खूष झालीं व आनंदानें नाचूं लागलीं. म्हातारीला चोळी पाहून खूप आनंद झाला. गेले कित्येक दिवस तिला मुलाबाबत कांहींच न कळल्यामुळें ती खूप काळजींत होती. आपला मुलगा खुशाल आहे व तो नीट कामधंदा करून रहातो या विचारानें तिला समाधान वाटलें. तिनें मायाचीला विचारलें, " माया कोठ ग ? "

ती म्हणाली," तो पठारांनं ( शहरांत ) रहं. शेठचा भास ( भाऊ ) जाधेल तथं. त्याच्या हारी (बरोबर) मायानी सुडकी (कपडे) दिधेल. होलीवर सांग येवंवं तंय इयाचा, नाय येववं तयं मग पाणी पडाच्या पहला इयाचाच." ( होळीला त्याला येतां आलें तर तो येणार आहे आणि तें जर न जमलें तर पाऊस पडायच्या पूर्वी तो येईलच.) ह्या उत्तरानें म्हातारीचें समाधान

झालें व म्हातारी चूप बसली. सुनेसमोर म्हातारी फारशी बोलत नसे, पण दुसऱ्या बायका जमल्या कीं, म्हातारीच्या तोंडाचा पट्टा जोरानें चाले.

मुलें कपडे घालून शेजारीं गेलीं व आपल्या बापानें पाठविलेले कपडे सर्वांना दाखवूं लागलीं. पंधरा मिनिटांच्या आंतच ही बातमी सर्व पाडाभर पसरली. हा वेळ असा होता कीं, प्रत्येक घरांतील स्त्रीपुरुष त्या वेळीं जेवणाच्या निमित्तानें घरींच होते. माया परत आला असावा अशा कल्पनेनें त्या बायका एकामागून एक मायाचीच्या झोपडीकडे निघाल्या. त्या सर्वांचें मायाचीनें अगदीं हंसतमुखानें स्वागत केलें. माया अद्यापि आला नाहीं; परंतु तो थोड्याच दिवसांत येईल. शेटच्या धाकट्या भावाला तो भेटला व त्याच्याबरोबर त्यानें कपडे पाठविले. त्याचें नीट चाललें असून तो लवकरच आपणांसाठीं दागिने पाठविणार आहे, वगैरे गोष्टी तिनें त्यांना तिखट मीठ लावून सांगितल्या.

ती त्यांच्याशीं बोलत असतांच म्हातारी तिथें आली व म्हणाली, "माया होलीवर इयाचा. तो सावकार सांग रजा नाय् देत." अशा प्रकारें प्रारंभ करून तिनें आपणाला आणलेली चोळी त्यांना दाखविली. लवकरच माया खूप पैसे घेऊन परत येईल, असें तिनें त्यांना सांगितलें. मायाचीनें बतावणी इतकी उत्तम केली कीं, त्या सर्व बायका तिची हकीकत ऐकून पूर्ण समाधान व्यक्त करून निघून गेल्या.

दिवसभर ती मायाबद्दल स्वतःच रचलेल्या गोष्टी बोलत राहिली. माया शहरांत खूप पैसे कमावीत असून तो लवकरच येणार आहे, अशी हकीकत ज्याच्या त्याच्या कानीं घालविण्याचा तिनें सपाटा चालविला. थोड्याच वेळांत ती गोष्ट सर्वांना समजली व पटलीही. वार्ली लोक मुळांत खूप भोळे आहेत. कोणतीही बातमी ऐकली कीं, ती पटकन् खरी मानतात. ह्या त्यांच्या प्रवृत्तीमुळें मायाचीला वरील बातमी त्यांच्या गळीं उतरवितांना फारसे प्रयास पडले नाहींत.

लोक तर फसले, पण पुढें काय ? रात्रीं मायाची जेव्हां आपल्या पथारी-वर पडली, तेव्हां ती पुन्हा बेचैन झाली. आपण जर ही थाप लोकांना मारली नसती तर अधिक बरें झालें असतें, असें तिला वाटूं लागलें. शिमग्याला जर माया आला नाहीं, तर लोकांना आपण काय उत्तर देऊं शकूं ? याचा ती विचार करूं लागली. माया आपणांसाठीं दागिने पाठविणार आहे अशी बातमी आपण पसरविली ही मोठी चूक केली, असें तिला आतां वाटूं लागलें. कारण, उद्यां ज्या वेळीं सर्व बायका दागिने कुठें आहेत म्हणून विचारतील, त्या वेळीं त्यांना आपण काय दाखवूं शकूं ! याची तिला काळजी वाटूं लागली. त्यामुळें ती जास्तच उदास व बेचैन झाली. तिचे डोळे भरून आले. अशा प्रकारें कितीतरी वेळ ती तळमळत होती. शेवटीं तिला झोंप केव्हां लागली कुणास कळे !

* * *

: ७ :

शिमगा आला व गेला, पण माया मात्र आला नाहीं. मायाचीनें लोकांना सांगितलें होतें कीं, तो होळीच्या दिवसांत येणार म्हणून. पण तो जेव्हां आला नाहीं, तेव्हां पाड्यावरच्या लोकांनीं साहजिकच तिच्या-जवळ चौकशी केली. तिनें सुचलें तें उत्तर देऊन पटकन् त्यांची रवानगी केली.

मायाचीचा स्वभाव इतका कडक होता कीं, भोंवतालच्या बायका तिला वचकून असत. ती जात्या अबोल होती. आपलें घर सोडून ती कधीं कुणाकडे गप्पा मारण्यास जात नसे. आपण बरें, आपलें घर बरें कीं, आपला संसार बरा. अशी तिची वृत्ति असे. एकाद्या यंत्राप्रमाणें ती आपली रोजचीं कामें करीत असे. काम करतांना कधीं बडबड नाहीं, कटकट नाहीं. ती घरांत असली कीं, घरांतील वातावरण एकदम शांत बने. इतकी बडबड करणारी तिची म्हातारी सासू, पण मायाची घरांत असली कीं, तीही चूप बसे. कामांत ती अगदीं तरबेज असे. स्वच्छतेची व टापटिपीची तिला फार आवड होती. त्यामुळें शेजारच्या बायका तिचें कौतुक करीत. पण ती रागीट असल्याचें त्यांना माहीत असल्यामुळें त्या तिच्यापासून दूरच रहात. एक देराणी मात्र तिच्याजवळ मनसोक्त बोलूं शकत असे.

ह्या तिच्या स्वभावामुळेंच माया शिमग्याला आला नाहीं, तरी बायकांनीं तिला फारसें छेडलें नाहीं. एरव्हीं दुसरी कुणी साधीसुधी बाई असती तर इतर गोष्टीवेल्हाळ बायांनीं चांभार चौकशी करून तिला बेजार केलें असतें. पण मायाचीचा गंभीर व प्रशान्त चेहरा पाहिला कीं, समोरची

व्यक्ति तिला वचकून चूप रहात असे. ह्या संकटसमयीं मायाचीला स्वतःच्या स्वभावाची खूप मदत झाली.

पुन्हा शेतीच्या कामाचे दिवस आले. मायाची जोरानें कामाला लागली. ती आतां मोठ्या मुलाकडून पुष्कळ काम करवून घेऊं लागली. तिची मुलगी आतां घरकामांत तिला पुष्कळ मदत करूं लागली होती. म्हातारीला आतां फारसें काम होत नव्हतें. तिला आठवण जराहि रहात नव्हती. तिला खूप भूक लागत असे व सारखें तिचें लक्ष खाण्यांत असे. नाहीं म्हणायला घर सांभाळायला तिचा उपयोग होई. शिवाय, मायाचीचा लहान मुलगा ' दादू ' तिला फार आवडत असे. सारखी ती दादूला कडेवर घेऊन झोंपडीच्या आसपास हिंडत असे. ( वार्ली लोक लहान मुलाला ' दादू ' म्हणतात. )

दादू पण आतां चालूं लागला होता व म्हातारीला तो भरपूर थकवीत असे. तो मायाचीच्या अंगावर अजून पीत होता. तसें तिला आतां फारसें दूध येत नसे. परंतु मूल छातीशीं धरल्यावर व तें पीत असतांना ज्या मुग्ध भावना उचंबळून येत व ज्या गोड सुखसंवेदना होत, त्या तिला खूप आवडत व त्यामुळें रात्रीं किंवा कधीं कधीं दिवसासुद्धां त्या मुलानें अंगावर पिण्याचा हट्ट धरला, तर ती त्याचा तो हट्ट पुरवीत असे.

काळ झपाट्यानें पुढें चालला होता. लावण्या वगैरे केव्हांच झाल्या होत्या. हळवीं ( हलकीं ) भातें तयार होत आलीं होतीं. गरव्याला ( चांगल्या जातीच्या भाताला ) अजून पुष्कळ वेळ होता. ह्याच दिवसांत मायाचीची पूर्वींची बाळंतपणें झालीं होतीं. माया जर गेला नसता तर आजसुद्धां ती कदाचित् बाळंत झालेली असती. एक लहानसें पोर कुशींत घेऊन ती झोंपली असती. पूर्वी ज्या वेळीं तिला मुलें होत होतीं, त्या वेळीं त्या मुलाचें तिला इतकें कौतुक वाटलें नाहीं. पण आज मात्र तिला वाटूं लागलें कीं, आपणांस एकादें लहान मूल असावें. अशा प्रकारच्या चम-

स्कारिक मनःस्थितींत ती असतांनाच तिला देराणीची मुलगी बोलाविण्यास आली. देराणी पुऱ्या दिवसाची होती.

ती मुलगी आली व म्हणाली, “ मायाची, आया तुला लाहां लाहां वाहरं ( आई तुला लवकर लवकर बोलाविते ). देराणीचा प्रसुतीचा वेळ जवळ आला आहे हें तिला माहीत होतें. त्यामुळें तिचा निरोप आल्याबरोबर ती हातांतील काम टाकून त्या मुलीबरोबर जाण्यास निघाली. जातांना तिनें म्हातारीला घराकडे लक्ष देण्यास बजावलें.

देराणीच्या घरीं ती गेली त्या वेळीं देराणी यातनांनीं विव्हळ झालेली होती. एरव्हीं सदासर्वदा हंसतमुख असणाऱ्या त्या बाईच्या तोंडावर आज हास्याच्या ऐवजीं दुःख व काळजी यांचें दारुण साम्राज्य पसरलेलें होतें. मध्येंच ती कण्हत होती. मध्येंच मायाचीशीं ती बोलत होती. देराणीची ही सहावी खेप होती. पण वाढत्या वयाबरोबर येणाऱ्या अशक्तपणामुळें तिला ह्या खेपेला जरा जास्त त्रास होत होता. मायाची तिच्याजवळ बसून तिला धीर देत होती. ह्याप्रमाणें तास दीड तास तिला बसावें लागलें असेल. एकदांची देराणी निर्विघ्नपणें प्रसूत झाली व तिला मुलगा झाला.

मायाचीनें त्या मायलेकराला न्हाऊं घातलें व पेज तयार करून ती देराणीला पाजली. प्रसुतीच्या वेदनांनीं व श्रमांनीं थकलेली ती देराणी आतां झोंपेस आली होती. मायाचीनें तिला झोंपविलें व जरूर लागल्यास आपणांस बोलाविण्याची तिच्या मुलीला सूचना देऊन ती घरीं जाण्यास निघाली.

घराच्या रस्त्याकडे ती वळली. पूर्वीच्या विचारांनीं तिच्या मनाची पुन्हा पकड घेतली. तिला आतां मायाची गैरहजेरी खूप जाणवूं लागली. आपणांला पण एक लहान मूल असावें असें तिला वाटूं लागलें. तिच्या भावना अनावर होत चालल्या. ती जवळजवळ धावतच घराकडे निघाली

व दारांत पाऊल टाकतांच धाकट्या दादूला तिनें उचलून घेतलें. त्याचे तिनें पटापट मुकेहि घेतले, पण तिचें तेवढ्यानें समाधान झालें नाहीं.

तिनें त्याला बळजबरीनें छातीशीं धरलें. तिच्या ह्या अनपेक्षित व चमत्कारिक वर्तनानें तो छोटा मुलगा गोंधळून गेला. त्याला ती बळें प्यायला लावीत होती. तरी तो तिच्यापासून दूर जाऊं लागला. त्या मुलानें खूप वेळ आपलें दूध प्यावें असें तिला वाटत होतें, म्हणून बळजबरीनें मुलाच्या तोंडांत ती स्तन कोंबूं लागली. पण आईच्या ह्या विलक्षण वागणुकीनें गोंधळलेला तो मुलगा मोठ्यानें रडूं लागला. इतक्यांत ती म्हातारी धांवत आली व 'दादूला' क्याला कुटस एन्हींच ?' (बाळाला कां मारलेंस उगीच ?) असा प्रश्न करीत ती त्या मुलाला उचलून घेऊन गेली. त्या दिवसापासून त्या मुलानें इतकी दहशत घेतली कीं, त्यानें अंगावर पिणें अजिबात सोडून दिलें. अशा रीतीनें जें थोडेंबहुत सुख तिला आजपर्यंत मिळत होतें, त्या सुखालाही ती कायमची पारखी झाली. दुर्दैव बिचारीचें !

* * *



मायाचीला लहानपणापासून मुलांची फार आवड होती. तिच्या आईला पुष्कळ मुलें होतीं. त्या सर्व मुलांना सांभाळण्याचें काम ती मोठी असल्यामुळें तिच्याकडे आलें होतें. तिनें फार उत्साहानें तें काम पार पाडलें होतें. लग्न झाल्यावर, तिलासुद्धां एकामागून एक अशीं मुलें झालीं व त्यामुळें तिला जें काम पूर्वीपासून आवडत होतें, तेंच आतां करावें लागत होतें. पण जसजसा तिचा दादू मोठा होऊं लागला, तसतसा तो तिच्यापासून दूर जाऊं लागला आणि त्यामुळें तिला फार उदास व खिन्न वाटूं लागलें. आपणाला एखादें लहान मूल असावें असें तिला वाटूं लागलें.

तिचा मोठा मुलगा आतां चांगलाच मोठा झाला व शेतीच्या कामांतसुद्धां तो झपाट्यानें तरबेज होत चालला होता. आईच्या बरोबर काम करीत असतां तो आतांशा बऱ्याच वेळां आईला विरोध पण करूं लागला होता. मायाचीला तें सहन होत नसे. ती त्याला ताडकन् बोलत असे. ह्याप्रमाणें त्यांचे वरचेवर खटके उडूं लागले होते. यामुळें हा मुलगा हळुहळू तिच्या मर्जीतून उतरत चालला होता. ह्याच्यापासून आपणांस फारसें सुख लागणार नाहीं असें जवळजवळ तिच्या मनानें घेतलें होतें.

तिची दुसरी मुलगी पण आतां मोठी झाली होती. पण वाढत्या वयाबरोबर तिचे डोळे जास्त बिघडत चालले होते. त्यामुळें तिच्या बाबतींतसुद्धां तिची निराशाच दिवसेंदिवस वाढत चालली होती. त्या मुलीचे डोळे साफ जाणार व ती पूर्ण आंधळी होणार ह्याची तिला जाणीव होती. पण येणारी आपत्ति ती टाळूं शकत नव्हती. खेडेगांवांत कुठले आले डॉक्टर नी वैद्य ! आणि शहरांत जाऊन उपचार करणें त्यांना कोठें शक्य

होतें ! त्यामुळें त्या मुलीबद्दल जरी मायाचीला पूर्ण सहानुभूति वाटत होती, तरी येणाऱ्या संकटापासून ती तिला वाचवूं शकत नव्हती.

आतां राहिला तिसरा मुलगा. त्याचें नांव तिनें अगदीं नव्या पद्धतीनें ठेविलें होतें. त्याचें नांव रामा. वाल्यांच्या मानानें हें नांव बरेंच अद्ययावत् होतें. एरव्हीं ज्या महिन्यांत मूल जन्मलें असेल त्या महिन्याचें ( चैत्या, जेठ्या वगैरे ) नांव वार्ली लोक त्यास ठेवितात.

मायाचीला धाकटा दादू फारच आवडे. तूर्त तरी तोच तिला आपलें सर्वस्व वाटे. पण दादूचे लाड करतांनासुद्धां ती संयम दाखवी. मुलाचे लाड करीत बसायला तिला वेळ तरी कुठें होता ! ती सारखी कामांत गुंतलेली असे. मायाच्या गैरहजेरीमुळें तिची जबाबदारी वाढली होती. तथापि ती शांतपणें काम करून आल्या आपत्तीला तोंड देत होती. इतर बायकां-बरोबर तिचें फारसें उठणें बसणें नसल्यामुळें तिला वेळीं प्रसंगीं धीर देण्यास एका देराणीखेरीज दुसरें कोणी नव्हतें.

पण मायाची मोठी करारी बाई होती. कामाचा तिला कंटाळा नव्हता. आलेल्या संकटांनीं ती घाबरून गेली नव्हती. मायाची गैरहजेरी आपणांस मुळींच जाणवत नाहीं असें दाखविण्याचा ती कसून प्रयत्न करी. तिच्या मुला-कडून तिला भरपूर साहाय्य होत असल्यामुळें तिचें शेतीचें काम मायावांचून अडून राहिलें नव्हतें. ठराविक पद्धतीनें काम करावयाचें व सावकाराचा मुनिम आल्यावर त्याला वक्तशीर खंड मोजून द्यावयाचा असा क्रम चालू होता.

पुन्हा एकदां खंड वसुलीचा हंगाम आला. तो सावकाराचा मुनिम खंड मोजून घेण्यास आला. तो शेतावर आला कीं, प्रथम मायाचीकडेच येत असे व तिच्याकडून पहिल्यानें खंडाचे भाग वसूल करी. तो मुनिम वसुलीला आला असें कळतांच मायाचीनें आपल्या मुलाला देराणीच्या नवऱ्यास बोलावून आणण्यास सांगितलें. पण तिचा मुलगा आतां बराच मोठा झाला होता. आपणांला खंड देण्याचें काम जमणार नाहीं म्हणून आपली

आई देराणीच्या नवऱ्याला बोलाविण्यास सांगते हें त्याच्या लक्षांत आलें व त्याला बोलाविण्यांत आपणाकडे कमीपणा येतो ह्या भावनेनें त्यानें त्या शेजाऱ्याला बोलाविण्याचें नाकारलें. मायाचीनें पुन्हा एकदोन वेळां सांगतांच तो तिच्या अंगावर ओरडून म्हणाला, " बिजाला क्याला ऱ्हींच तरास ? तो काय रिकामा बसेल अथं एक दिस मोडाया ? रातदिस मी काम करंतय, धान नाय मोजावं मला ? ( दुसऱ्यांना कशाला उगीच त्रास ! तो काय रिकामा बसला आहे काय येथें येऊन एक दिवस मोडायला ! सर्व दिवस मी काम करतों, मग धान्य नाहीं का मोजतां येणार मला ? ) हें उत्तर ऐकून मायाची चूप बसली. ती शहाणी होती. परक्याच्या समोर उगीच भांडण नको असें तिला वाटलें. पण देराणीचा नवरा आला असता तर बरें झालें असतें, असें तिला सारखें वाटत होतेंच.

सावकाराच्या मुनिमानें पण जेठ्याच्याच म्हणण्याला पाठिंबा दिला व त्यानें मायाचीला खात्री दिली कीं, तिला आपणाकडून केव्हांही त्रास होणार नाहीं. खंडाचें धान्य मोजण्यांत आलें. वर्षाचा हिशोब मोजण्यांत आला. शेतीला बांध घालण्याकरितां पावसाळ्याच्या दिवसांत खाण्याकरितां व बीं पेरण्याकरितां जी रोख रक्कम व जें धान्य त्यांनीं सावकाराकडून आणलें होतें, त्याची पण त्यांनीं परतफेड केली. शेवटीं व्याजाचा हिशोब राहिला होता. जेठ्यानें त्या मुनिमाला व्याजाबाबत विचारलें. तेव्हां मायाचीकडे तिरक्या नजरेनें पहात तो म्हणाला " तुम्ही फार चांगले लोक आहांत, म्हणून तुम्हांला व्याजाची सूट." मायाचीला उद्देशून तो पुढें म्हणाला, " काय मायाची खूष कीं, नाहीं आतां ? " पण ती कांहीं बोलली नाहीं. झटकन् ती आपल्या झोपडीकडे निघाली.

संध्याकाळीं जेठ्या जेव्हां जेवायला बसला तेव्हां तो आईला म्हणाला, " आया सावकाराचा कारकून पकां बेस माणूस होवा. जबरी दिया करूं तंय पण व्याज घेय नाय्"( आई सावकाराचा कारकून फार चांगला माणूस

असला पाहिजे. जबरदस्तीनें आपण व्याज द्यायला लागलों, तरीपण तो घेत नाहीं. ) त्याचें हें बोलणें मायाचीनें ऐकलें तरी तिनें त्याला कांहीं उत्तर दिलें नाहीं. त्यानें पुन्हा विचारलें, "आया ऐकस का नाय्, मी सांग सावकाराचा कारकून पक्का बेस " ( आई, ऐकलंस कीं नाहीं ! मी म्हणतों,सावकाराचा कारकून फार चांगला माणूस आहे.) आतां मात्र तिला कांहीं तरी बोलणें प्राप्तच होतें. ती म्हणाली, " काय जणूं बेस होवा का व्वाट होवा ता ?"( कोणास ठाऊक तो चांगला आहे कीं, वाईट आहे तें).

आईचें हें उत्तर ऐकून जेठ्याला मोठें आश्चर्य वाटलें. त्या कारकुनानें व्याज सोडून दिल्याचें माहीत असून आई त्याला चांगलें म्हणावयास तयार नाहीं, याचें त्याला फार आश्चर्य वाटलें. पण आपली आई अलिकडे चिडखोर बनली आहे आणि आपलें व तिचें मुळींच पटत नाहीं, याची त्याला जाणीव असल्यामुळें त्यानें तो विषय तेवढ्यावरच सोडून दिला. मात्र कारकुनाबद्दल त्याचा ग्रह फारच चांगला झाल्यामुळें तो कारकून जितक्या दिवस त्या पाड्यावर राहिला तितके दिवस शक्य तों वेळ काढून जेठ्या त्याच्याजवळ जाऊन बसे व त्याचें पडेल तें काम करी. त्याच्या भलेपणानें जेठ्या जवळजवळ भाळून गेला होता.

त्या शेतावर तो कारकून जवळजवळ एक आठवडा राहिला होता. कारण त्याला त्या पाड्यावर राहाणाऱ्या सर्व कुळांकडून खंड वसूल करावयाचा होता. रोज दोनतीनदां तो मायाचीच्या झोपडीकडे जेठ्याला शोधण्यासाठीं येई. जेठ्या घरांत असला, तर तो पटकन बाहेर येई व मग त्याला घेऊन कारकुनाला बाहेरूनच जावें लागे. पण जेठ्या जर घरांत नसला, तर तो झोंपडीच्या आंतसुद्धां पाऊल टाकून जेठ्याचा तपास करी. मायाची जर दिसली तर तो थांबून तिच्याशीं बोलण्याचा प्रयत्न करी. पण मायाची सहसा त्याच्यापुढें येत नसे. बहुतेक तिची सासूच पुढें होऊन उत्तर देई. किंवा जर मायाचीलाच पुढें होऊन त्याला उत्तर

द्यावें लागलें, तर ती कणग्याच्या आड उभी राहून त्याच्या प्रश्नास उत्तर देई. त्यानें जर अधिक बोलण्याचा प्रयत्न केला तर ती लागलीच सासूला किंवा मुलाला हांक मारून त्याच्याजवळ बोलायला बसवी व ती आपल्या कामाला लागे. तो सुद्धां नंतर तिथें फार वेळ थांबत नसे. त्याचें वरचे-वर घरीं येणें मायाचीला आवडत नसे. तो इतर झोंपड्या सोडून आप-ल्याच घरीं कां येतो, हें तिच्या लक्षांत येऊं लागलें होतें व तेव्हांपासून ती त्याला सारखी टाळत होती. पण गेला सबंध आठवडाभर तो तिच्या नजरेसमोर अनेकदां आला होता. प्रत्येक वेळीं तो तिच्याकडे टक लावून पहात असे. त्यामुळें ती थोडी अस्वस्थ होऊं लागली होती. पण आठ दिवसांनीं त्याचें शेतावरलें काम संपलें व त्याला आपला मुक्काम तेथून हालवावा लागला. एके दिवशीं पहाटे तो तिथून निघाला. जातांना पण तो जेठ्याच्या दारांत आला. त्यानें त्याला हांक मारून ‘ सूर पिया ’ ( ताडी पिण्याला ) एक रुपया दिला. ‘ नको, नको ’ म्हणत जेठ्यानें तो घेतला.

तो कारकून निघून गेला. तरी मधून मधून मायाचीला तो आल्याचा भास होई. तो गेल्यानंतर कित्येक दिवस तिला तो डोळ्यांसमोर दिसत होता. ती त्याच्यावर मुळींच आषक झाली नव्हती. पण त्याच्या त्या चम-त्कारिक नजरेची तिला एक प्रकारची दहशत बसली होती. तसें पाहिलें तर त्यानें तिच्याशीं अंगलट करण्याचा कधींच प्रयत्न केला नव्हता. पण वेळीं अवेळीं जेठ्याला भेटण्याच्या निमित्तानें जेव्हां तो येई, तेव्हां तिच्याशीं बोलण्याचा प्रयत्न करी व सारखा टक लावून तिच्याकडे पहात राही. तो घरीं आला, असें कळल्यावर सहसा मायाची त्याच्यासमोर येत नसे. पण त्यानेंच कांहीं निमित्त काढून तिला बोलाविलें, तर तिला बाहेर येऊन त्याच्या प्रश्नाचें उत्तर देणें भाग पडे; कारण त्याचा उघड उघड अपमान ती करूं शकत नव्हती.

पुन्हा एकदां शिमगा आला व गेला. नंतर उन्हाळ्याचे दिवस आले.

पाऊस येण्यापूर्वीच्या ह्या दिवसांना वार्ली लोक अखेरीचे दिवस म्हणतात. ह्या दिवसांत वार्ल्यांना खूप काम असतें. शेणगोळे तयार करणें, झाडपाला जमविणें इत्यादि ' राब ' करण्यासाठीं लागणारी सामुग्री गोळा करण्यांत ते गढून गेलेले असतात. मायाची पण ह्या कामांत गढून गेली होती. आतां ती शेठच्या कारकुनाला विसरली होती. मध्येंच एकाद्या दिवशीं तिला त्याची आठवण होई व त्या आठवणीनें त्याच्याबद्दल तिला धास्ती वाटे. पण ही धास्ती थोडा वेळच टिके. कारण कामाचा पसारा तिच्या-भोंवतीं इतका होता कीं, तिला असल्या गोष्टींचा विचार करायला वेळ मिळत नसे.

पावसाळा आला व शेतीचें काम जोरांत सुरू झालें. मायाचीला आतां ' माया ' ची जवळजवळ आठवण येत नव्हती. परंतु म्हातारी मात्र दर सणाला मायाची वाट पाही. आषाढांत ' कूळी ' खाण्याच्या वेळीं व भाद्रपदांत ' नवं ' खाण्याच्या वेळीं म्हातारीला मायाची आठवण येई. ( वार्ली लोक कूळी नांवाची पालेभाजी समारंभानें खातात. त्याचप्रमाणें श्रावणअखेर अथवा भाद्रपदांत ' हरीमाडी ' या जातीचें हलकें भात पहिल्यानें जेव्हां तयार होतें, तेव्हां तें भात ते समारंभानें खातात, त्याला ' नवं खाणं ' म्हणतात.) मुलें जवळ जवळ मायाला विसरून गेलीं होतीं. मोठया मुलानें मायाची जागा घेतली होती व त्यामुळें मायाची गैरहजेरी आतां जवळजवळ कुणालाच जाणवत नव्हती.

ह्या वर्षीं पीक फारच छान आलें होतें व म्हणून वार्ली लोक थोडे खुषींत होते. याला मायाची अपवाद नव्हती. दिवाळी जवळ आल्यामुळें जो तो आतां ' दिवाली करण्याच्या ' गोष्टी जोरांत बोलत होता. मोठ-मोठीं तारफीं ( तारफें म्हणजे वार्ली लोक वाजवीत असलेलें वाद्य; लांब भोपळयास बांबूच्या काड्या लावून एक वाद्य तयार करतात व दिवाळी जवळ आली कीं, तें वाद्य वाजवितात. एरव्हीं तें खुंटीलाच ठेवून देतात.)

वाजविण्यांत वार्ली गढून गेले होते. फुरसद साधून ते डहाणूला जाऊन दिवाळीची खरेदी करीत होते. खरेदी काय असणार मोठी ! एकादी चोळी, एकादी डगली ( जॅकेट ), बायकांना बांगड्या, तंबाखू, सुके बोंबील, ' डाळे ' ( चणे ) इत्यादि. मायाची पण एक दिवस देराणीला घेऊन ' दिवाळीचें ' सामान आणायला डहाणूला गेली. जातांना त्या बरोबर गेल्या, पण डहाणूला गेल्यावर देराणीनें धाकट्या दादूसाठीं एक झबलें शिवायला टाकलें व म्हणून ती डहाणूला मांगेल्याकडे राहिली व मायाची सरावलीला आपल्या नातेवाइकाकडे ती रात्र रहाणार होती व सकाळीं उठून त्या दोघी मिळून घरीं जाणार होत्या.

मायाची सरावलीला जावयाला निघाली. ती वाटेंत मल्याणला थांबली. मल्याण हेंच डहाणू स्टेशन. मल्याणला मोठी बाजारपेठ आहे. दिवाळी जवळ आली कीं, अनेक व्यापारी एथें हंगामी दुकानें उघडतात व वार्ल्यांना जरूर त्या वस्तु ते विकतात. वार्ल्यांकरितां अशीं हंगामी दुकानें काढणें व्यापाऱ्यांना परवडतें. कारण वार्ली लोक फार भोळे असल्यामुळें व्यापाऱ्यांना त्यांच्यापासून चांगली कमाई होते.

मल्याणला मायाचीनें निरनिराळीं दुकानें पाहिलीं. तिनें येतांना बरोबर पांचदहा रुपये आणले होते. त्यांपैकीं पांचसहा तिनें कपडे व इतर सामान यापोटीं खर्चले. राहिलेल्या पैशांतून ती जोडवीं विकत घेणार होती, म्हणून ती एका दुकानाजवळ थांबली. दुकानदारानें तिला पाहून आपलें वाक्पांडित्य सुरू केलें. त्यांनीं तिला कांहीं चांदीचे व कांहीं कथिलाचे दागिने दाखवले. ती दागिने बघत होती. इतक्यांत तिला कोणींतरी नांवानें हांक मारली. ती एकदम चमकली व मागें वळून पहाते तों तिच्या नजरेला तो शेठचा कारकून दिसला.

" काय मायाची क्यावर इघेल ? " ( काय मायाची कशाकरितां आलीस ? ) असें त्यानें विचारतांच ' एऱ्हींच ' ( एरव्हींच ) असें म्हणून

ती जरा बाजूला झाली. तो कारकून पुढें झाला व त्यानें एक चांदीची सांखळी त्या दुकानांतून घेतली आणि व्यापाऱ्यानें मागितलेली १५ रुपयांची रक्कम त्याच्या अंगावर फेकून तो मायाचीशीं एक शब्दही न बोलतां निघून गेला.

मायाचीला ती सांखळी फार आवडली, पण नुसती आवडून उपयोग काय ? तशी सांखळी विकत घेण्याचें सामर्थ्य तिच्याजवळ नव्हतें. तो कारकून गेला असें पाहून ती पुन्हा दुकानासमोर उभी राहिली व तिनें तिला पाहिजे होतीं तीं जोडवीं घेऊन व पैसे देऊन ती निघाली. बाजूला मल्याणचा मच्छीबाजार आहे, त्यांत ती शिरली व निरनिराळ्या जातीचे सुके मासे विकत घेऊन ती घरीं जाण्यास निघाली. एव्हांना सूर्य केव्हांच मावळत होता व संधिप्रकाश सर्वत्र पसरला होता. लोकांची रहदारी पण कमी झाली होती. मायाची झप्झप् चालूं लागली.

रेल्वेचें फाटक ओलांडून ती थोडें पुढें गेली. इतक्यांत तिला तो कारकून समोरून येतांना दिसला. त्याला पाहिल्यावर ती घाबरली. इतक्यांत तो तिच्या अगदीं जवळ आला व त्यानें आपल्या हातांतील चांदीची सांखळी तिच्या अंगावर टाकली आणि ही तुझ्यासाठींच घेतली आहे असें तो बडबडला. तिनें ती सांखळी उचलली व त्याला ती परत देण्यासाठीं ती इकडे तिकडे पहाते तों तो केव्हांच अदृश्य झाला. ती खूप गोंधळली. काय करावें हें तिला सुचेना. तिला एकदां वाटलें, ती सांखळी फेकून द्यावी. परंतु तसें तिच्याच्यानें करवेना. थोडा वेळ ती स्तब्ध राहिली. पण रात्र होत चालली,याची जाणीव झाल्यामुळें ती जवळजवळ धावतच निघाली. ती सांखळी तिनें आपल्या पदरांत बांधली. तो मनुष्य पुन्हा दिसला कीं, त्याच्या अंगावर ती टाकून देण्याचा तिनें विचार केला.

सरावलीला तिनें ती रात्र काढली. तिच्या त्या आप्त बाईबरोबर ती बराच वेळ बोलत बसली. रात्रीं ती झोपली असतां कितीतरी वेळ तिचा

डोळा लागेना. शेवटीं केव्हां तरी ती झोंपली. स्वप्नांत तिला ती चकाकणारी सांखळी दिसली. थोड्या वेळानें आपल्या हातावर कोणाचा तरी गरम हात पडला असा तिला भास झाला व ती एकदम जागी झाली. मग तिला झोंप येईना.

सकाळीं देराणी आली व त्या दोघी घरीं गेल्या. घरीं गेल्यावर लहान दादू धावत आला व तिला बिलगला, तरी ती हंसली नाहीं. म्हातारीनें विचारलेल्या प्रश्नांना तिनें तुटकच उत्तरें दिलीं. आल्याबरोबर ती झपाट्यानें कामाला लागली व जेवण करून तिनें सर्वांना वाढलें. मोठ्या मुलानें विचारलेल्या प्रश्नांना तिनें मोजक्या शब्दांत उत्तरें दिलीं. पण आईच्या स्वभावाची आतां त्याला नीट ओळख झाल्यामुळें त्याला कांहीं आश्चर्य वाटलें नाहीं.

रात्रीं सर्वजण झोंपले तरी मायाची जागी होती. सर्व जण गाढ झोंपीं गेले, अशी तिची जेव्हां खात्री झाली, तेव्हां ती उठली व आपल्या पोटाजवळ लुगड्यांत ठेवलेली सांखळी तिनें काढली आणि ज्या ठिकाणीं ती आपल्याजवळील शिल्लक राहिलेले रुपया दोन रुपये ठेवी, तिथें तिनें ती सांखळी ठेविली, तेव्हां तिला खूप हलकें वाटलें. त्या सांखळीबद्दल ती विचार करीत पडली असतां तिचा केव्हांच डोळा लागला. कारण खूप चालल्यामुळें ती थकून गेली होती.

* * *

: ९ :

दिवाळी अगदीं जवळ आली. मुलें व म्हातारी मोठ्या उत्साहानें दिवाळीच्या गोष्टी बोलत बसलीं. दिवाळीचा पहिला दिवस वार्ली लोक मोठ्या उत्साहानें साजरा करतात. पावसाचे चार महिने ते चवळी, नारळ, अळू इत्यादि पदार्थ खात नाहींत. दिवाळींत ' चवळी खायाचा ' ( चवळ्या खाण्याचा ) सण ते साजरा करितात. त्या दिवशीं ते पिठांत गूळ घालून तें कोनफळीच्या पानांमध्यें ठेवून त्याला वाफ आणतात. हें एक मोठें पक्वान्न समजलें जातें. त्याला ते पानांची भाकर म्हणतात. त्या दिवशीं ते नव्या चवळ्या उकडून खातात. पण ह्या खाद्यपदार्थांपेक्षां वार्ल्यांचें लक्ष ताडीवर जास्त असतें. त्यांचा कोणताही समारंभ ताडीवांचून साजरा होत नाहीं. मूल जन्मल्याचा समारंभ असो किंवा मनुष्य मेल्यावर त्याचा दिवस अगर श्राद्ध करण्याचा समारंभ असो, ताडीवांचून हे समारंभ साजरे होत नाहींत. त्यांच्या तक्रारीचा निकाल लावण्यासाठीं जेव्हां 'जात' ( पंचायत ) बसते, तेव्हांसुद्धां ताडीचीं मडकीं खलास करण्यांत येतात. थोडक्यांत सांगायचें म्हणजे ताडीवांचून वार्ल्यांचें कोणतेंहि समारंभ साजरे होत नाहींत. सणामध्यें वार्ल्यांना कोणता आनंद वाटत असेल, तर तो त्या दिवशीं भरपूर ताडी प्यायला मिळते हा होय.

दिवाळीच्या वेळीं वार्ली ' तारपें ' नांवाचें वाद्य वाजवितात. तोंडांत तारप्याची नळी घालून, गाल फुगवून, एक माणूस तारपें वाजवतो व त्याच्याभोंवतीं हातांत हात घालून पुरुष व स्त्रिया कोंडाळें करून नाचतात. हा नाच तासच्या तास चालतो. ह्या नाचाचे निरनिराळे प्रकार असतात. पण एकदां एक प्रकार सुरू झाला कीं, तो बराच वेळ चालतो. पांढरपेशा

लोकांना तो नाच पाहून लवकरच कंटाळा येतो. ह्या दिवसांत वार्ल्यांच्या बरोबरीनें काथोडी लोकपण नाचतात. काथोडी हे वार्ल्यांपेक्षां अधिक मागासलेले आहेत. कोळशाच्या भट्टया लावून कोळसे तयार करण्याचें काम 'काथोडी' करतात. काथोडी नाचतांना त्यांना ढोलाची सांथ लागते. त्यांच्या नाचामध्यें अंगविक्षेप अधिक असतात. नाचांत कसरतीचें काम भरपूर पहावयास मिळतें. दिवाळीच्या दिवसांत तुम्ही जंगलांत कुठेंही जा. तुम्हांला ठिकठिकाणीं वार्ली—काथोडी-बायका-पुरुष-मुलें-मुली-नाचतांना दिसतील. 'वाडगो' ( म्हातारे ) 'वाडगिणी' ( म्हाताऱ्या ) स्वत: जरी नाचूं शकत नसले, तरी ज्या ठिकाणीं नाच चालू असतील, तिथें त्यांची हजेरी असतेच. नाच पहातांना ते गप्पा मारतात व नाचणाऱ्या लोकांची अधूनमधून स्तुति करतात.

मायाचीचा मुलगा जेठ्या आतां चांगलाच तरणाबांड असल्यामुळें तो नाचांत मोठ्या उत्साहानें भाग घेत होता. तारफें वाजविण्यामध्यें तो बराच तरबेज झाला असल्यामुळें ह्या नाचामध्यें त्याला मानाचें स्थान होतें. ह्या गांवच्या सर्व 'लोठया' ( तरण्या मुली ) जेठयाच्या वादनकौशल्यावर खूष होत्या. मायाचीसुद्धां नाच पहाण्यास देराणीबरोबर मधूनमधून बाहेर पडत होती.

दिवाळी संपली. अद्यापि मळणी व्हावयाला बराच उशीर होता. इतक्यांत अगदीं अचानकपणें सावकाराचा कारकून त्या गांवांत आला. गेले कित्येक दिवसांत मायाचीला तो दिसला नव्हता. जवळजवळ ती त्याला विसरतच चालली होती. इतक्यांत तो तिच्या दारांत येऊन उभा राहिला. त्याला पाहून तिला आश्चर्याचा धक्का बसला. दरवर्षी सावकाराचा कारकून संक्रांतीनंतर येत असे. ह्या विभागांतले रस्ते पावसाळ्यांत बरेच खराब होतात व संक्रांतीच्या आधीं तेथें जाणें जिकिरीचें असतें. शिवाय, ह्या विभागांतील बहुतेक भात 'गरव्या' जातीचें असल्यामुळें मळणी पण

उशिरां होते. यामुळें तो कारकून सालाबादपेक्षां फार लवकर आलेला पाहून मायाची आश्चर्यचकित झाली यांत कांहींच नवल नाहीं.

मायाचीला पाहून तो तिला म्हणाला, " काय मायाची, बेस का नाय् ? " असा प्रश्न विचारून त्यानें तिला इतक्या लवकर जंगलांत येण्याचें कारण सांगितलें. सावकाराच्या सांगण्यावरून सर्व पिकांची पहाणी करण्यास आपण आलों आहों असें तो म्हणाला. " मी येतांना बाकीचीं सर्व पिकें पाहिलीं, एक तुझींच शेतें पहाण्याचीं राहिलीं. " अशी सुरुवात करून तिला त्यानें बरोबर येऊन जो भाग तिच्याकडे लागवडीस होता तो दाखविण्यास सांगितलें. त्यावेळीं जवळजवळ संध्याकाळचे पांच वाजले होते. त्यानें मायाचीला सर्व गोष्टी इतक्या सहज मनानें सांगितल्या कीं, ती तावडतोब उठली व त्याला शेतें दाखविण्यास निघाली. तो पुढें चालला होता व त्याच्यामागें थोडया अंतरावर मायाची चालली होती. तो थोडा झपाट्यानें चालत होता व मायाचीला त्याच्याबरोबर जोरानें चालणें जमत नव्हतें; तरी ती शक्य तो प्रयत्न करीत होती. वाटेनें जातांना तो कांहीं बोलत नव्हता.

थोडें अंतर चालल्यावर मायाचीनें एका शेताकडे बोट दाखविलें व ती म्हणाली, " हे नांग माझं केंड " ( हें पहा माझें शेत ).

तो थांबला व त्या शेताकडे पहात म्हणाला, " अरे वा ! यंदा भात छान आलें आहे. मजा आहे तुझी मायाची "

ती कांहीं बोलली नाहीं. नुसती शांत उभी राहिली. थोड्या वेळानें तो म्हणाला " आतां तुझें दुसरें केंड दाखव. "ती म्हणाली, "तें पकां दूर. तयं जाईपावत कालोख पडल.

परंतु आतां आपण लवकरच परत जाणार, जाण्यापूर्वी शेटनें सांगितल्याप्रमाणें सर्व शेतांची पहाणी झालीच पाहिजे असें तो म्हणाला. हें त्याचें उत्तर ऐकून मायाचीला काय करावें तें सुचेना. त्याच्याबरोबर ती

# आदिवासींचें जीवन–दर्शन







# आदिवासींचें जीवन-दर्शन





एकटी जायला घाबरत होती. त्याच्याविषयीं तिला आलेला अनुभव विशेषसा चांगला नव्हता. म्हणून तिनें त्याला उशीर होत असल्याचें पुन्हा सांगितलें व घरीं जाऊन आपला मुलगा जर परत आला असेल, तर त्याला त्याच्याबरोबर देण्याचें तिनें कबूल केलें. पण पुन्हा घरीं जाऊन वेळ फुकट घालविण्यास तो तयार नव्हता. त्यानें तिला खूपच आग्रह केला व नाइलाज म्हणून ती त्याच्याबरोबर निघाली.

तीं दोघें तिच्या दुसऱ्या शेताकडे निघालीं. आतां तो बराच हळू हळू चालत होता. त्याच्या व मायाचीच्यामध्यें विशेषसें अंतर नव्हतें. एकदां तर शेताच्या बांधावरून चालत असतांना त्याचा पाय घसरला. तो मायाचीच्या अंगावरच पडला असता; पण त्यानें चटकन् स्वतःला सावरलें. मायाची एक शब्दही बोलत नव्हती. तो मात्र आतां तिला मधून मधून प्रश्न विचारीत होता. शेवटीं एकदांचीं तीं दोघें मायाचीच्या शेताजवळ येऊन ठेपलीं. तेव्हां मायाची त्याला म्हणाली, " हें नांग काय नांगस तें " ( हें पहा तुला काय पहायचें असेल तें ).

तिच्या बोलण्याकडे त्याचें लक्षच नव्हतें. त्याची शोधक नजर इकडे तिकडे कांहीं तरी शोधत होती. इतक्यांत झटकन् तो शुद्धीवर आला व मायाचीला म्हणाला, " आतां तुझं राहिलेलं तिसरं केंड दाखव. "

आतां मात्र मायाचीला काय करावें तें सुचेना. सावकाराचा माणूस तो. त्याचा हुकूम बिनतक्रार पाळण्याची तिच्या रक्ताला संवय लागली होती. पण आतां काळोख पडत चालल्यामुळें व शेत दूर असल्यामुळें ती विचारांत पडली. इतक्यांत त्यानें तिला फिरून एकदां लवकर चालण्यास सांगितलें. ती उठली व तिच्या दुसऱ्या शेताकडे चालूं लागली. तिनें मनांत विचार केला कीं, जातांना रस्त्यांत जेठ्या किंवा देराणीचा नवरा यांपैकीं कुणी भेटल्यास त्याच्याबरोबर कारकुनाची रवानगी करतां येईल.

पण तिला रस्त्यांत कुणी भेटलें नाहीं. ती पुढें चालत होती. तो कार-

कून तिच्या मागें चालला होता. ह्या खेपेला तो चूप होता. शेवटीं तीं दोघेंजणें त्या शेतावर येऊन पोहोंचलीं. शेतावर आल्यावर मायाचीनें हातानें त्याला आपलें शेत दाखविलें. एव्हांना संधिप्रकाशसुद्धां मावळत चालला होता. त्या कारकुनानें दूरवर नजर फेकली व आजूबाजूस कोणी चिट-पांखरूं दिसत नाहीं, अशी त्याची खात्री झाल्यावर तो मायाचीच्या अगदीं जवळ आला आणि तोंडानें कांहींसें बडबडत त्यानें तिचा हात धरला.

मायाचीनें पटकन् त्याच्या हाताला हिसडा दिला व ती तेथून धांवत सुटली. थोडीशी धावल्यानंतर तिला खूप थकवा आल्यामुळें ती एका झाडाखालीं बसली. पुष्कळ दिवसांत पुरुषाचा सहवास न मिळाल्यामुळें ह्या आकस्मिक प्रकारानें तिच्या भावना उचंबळून आल्या. तिचें अंग खूप शहारून आलें. तिला वाटलें उठावें व त्या माणसाकडे परत जावें. पण ती तसें करूं शकली नाहीं. ती कमालीची अस्वस्थ झाली. पुन्हा सर्व जुन्या स्मृति जागृत झाल्या. काय करावें हें तिला समजेना. ती तशीच त्या झाडाखालीं बसली.

इतक्यांत तो कारकून तेथें आला. आतां काळोख पडला होता. त्या अंधारांत त्यानें तिला ओळखलें. आतां तो खूप धीट झाला होता. तिच्या-जवळ तो आला व त्यानें पुढें होऊन तिचा हात धरला. त्याचा प्रतिकार करण्याची तिच्यामध्यें ताकद राहिली नव्हती. तिला हातानें धरून तो जवळच एके ठिकाणीं घेऊन जाण्यास निघाला.

एखाद्या मंत्रमुग्ध नागाप्रमाणें तीसुद्धां त्याच्याबरोबर निघाली. तो एका सोयीच्या ठिकाणीं तिला घेऊन गेला व जी संधि मिळण्याची तो गेले कित्येक दिवस वाट पहात होता, ती संधि मिळाल्यामुळें तिचा भरपूर फायदा घेण्याची त्यानें तयारी केली. अशा रीतीनें जें त्याला हवें होतें ( व जें तिला त्या क्षणीं नको नव्हतें ) तें त्यानें मनसोक्त मिळविलें.

* * *

: १० :

मायाची घरीं आली. म्हातारी तिची वाटच पहात होती. सुनेला पहातांच ती म्हणाली, " इधेल शी ? माझ्या जिवाला बेस नाय् आज. पकां हिंव भरत आहे "( आलीस ? आज मला बरें वाटत नाहीं. फार थंडी वाजते ). तिचे हे उद्गार ऐकून मायाची लागलीच तिच्याजवळ गेली. म्हातारी पडूनच होती. मायाचीनें तिच्या अंगाला हात लावून पाहिला. म्हातारीचें अंग तिला खूप गरम लागलें. मायाची बाहेर गेली, तिनें घराजवळ लावलेला सागरगोट्याचा पाला आणला व त्याचा रस काढून तिनें तो म्हातारीला पाजला.

ती ज्या वेळीं घरांत आली, त्या वेळीं तिच्या मनावर मोठें दडपण होतें. तिच्या हातून घडलेल्या चुकीच्या जाणिवेनें तिचें मन अगदीं बेचैन झालें होतें. पण घरांत येऊन तिनें म्हातारीला ताप आल्याचें जेव्हां पाहिलें, तेव्हां तिला एक प्रकारें बरें वाटलें. तिला यायला जो उशीर लागला, त्याबाबत तिला कोणींसुद्धां प्रश्न विचारला नाहीं व तिच्या बेचैन झालेल्या जिवाला पण एक निश्चित काम मिळाल्यामुळें तिचें मन त्यांत गुंतून गेलें. ती रात्र तिनें म्हातारीच्या शेजारीं बसून काढली. रात्रीं वीट तापवून तिनें म्हातारीला शेकलें. मधून मधून तिला सुचतील असे उपाय ती करीत होती व अशा प्रकारें म्हातारीची सेवा करीत तिनें ती रात्र काढली. त्या अपेक्षित आलेल्या कामांत गढून गेल्यामुळें आतां तिला खूप हलकें वाटत होतें.

सकाळीं तिनें देराणीला व तिच्या नवऱ्याला बोलावून आणिलें. त्यांनीं येऊन म्हातारीला पाहिलें. म्हातारी आतां फार दिवस जगणें शक्य नाहीं

असें तिला पहातांच त्यांना वाटलें. देराणीनें नवऱ्याला धुंदुलवाडीला जाऊन ' भगत ' आणावयास सांगितलें. धुंदुलवाडी हें गांव चिंचल्यापासून तीनचार कोसांवर आहे. तिथें दर आठवड्याला बाजार भरतो. देराणीचा नवरा तावडतोब तिथून निघाला व तो धुंदुलवाडीला भगत आणायला गेला. देराणी बाहेर पडली व तिनें म्हातारी आजारी असल्याची हकीकत पाड्यावरच्या सर्व लोकांना कळविली. त्याबरोबर प्रत्येक घरांतून बायका व पुरुष मायाचीच्या झोंपडीकडे येण्यास निघाले. पांच मिनिटांच्या आंत मायाचीचें अंगण माणसांनीं भरून गेलें. त्यांतील पोक्त अशा बायका पुढें सरल्या व त्या थेट म्हातारीजवळ जाऊन पोहोंचल्या. एव्हांना म्हातारीची प्रकृति अधिक खराब झाली होती. प्रत्येक शेजारीण आपल्या अनुभवाप्रमाणें औषध सुचवीत होती.

इतक्यांत म्हातारी मायाचीला खुणा करूं लागली. तिनें बोलण्याचा प्रयत्न केला; पण तिच्या ओठांतून शब्द बाहेर पडेनात. कांहींतरी सांगण्याचा ती प्रयत्न करीत होती. पण तिची वाचा जवळजवळ बंद झाली होती. म्हातारीला काय हवें असेल याची कोणालाहि कल्पना करतां येईना. थरथरत्या हातानें पुन्हा एकदां म्हातारीनें कोणाला तरी जवळ बोलाविलें. मायाची तिच्या उशाशीं बसूनच होती. तिनें म्हातारीच्या अंगावरून हात फिरविला. बाकीच्या बायका म्हातारीची शेवटची इच्छा काय असावी याचा तर्क करूं लागल्या. इतक्यांत देराणी थोडा चहा करून घेऊन आली आणि ती व मायाची मिळून म्हातारीला चहा पाजूं लागल्या. दोनतीन घोट म्हातारीच्या पोटांत गेले असतील नसतील, इतक्यांत म्हातारीला जोरानें ठसका लागला व तिनें डोळे फिरविले. ताबडतोब जोराचा आरडाओरडा झाला व दोनच मिनिटांत म्हातारी ' टाकल्याचें ' (मेल्याचें) देराणीनें जाहीर केलें.

म्हातारी मेल्यावर, मायाची मोटमोठ्यानें रडूं लागली. तिला खरो-

खरच खूप दुःख झालें. माया निघून गेल्यापासून तिला म्हातारीचाच आधार होता. आतां म्हातारीपण गेली. त्यामुळें आपणाला आतां कोणाची मदत राहिली नाहीं, याची तिला जाणीव झाली. शिवाय, म्हातारीजवळ तिनें आयुष्याचीं कित्येक वर्षें काढलीं होतीं व ह्या अवधींत त्या जणूं काय मायलेकीप्रमाणें रहात होत्या. त्यामुळें साहजिकच म्हातारी मेल्याबरोबर मायाचीला जोरानें भडभडून आलें.

भोंवतालच्या बायांनीं तिला शांत करण्याचे प्रयत्न सुरू केले. मायाचीचें म्हातारीवर केवढें प्रेम होतें, याचें प्रत्येकजण वर्णन करूं लागला. देराणीनें ओळखलें कीं, आतां आपण बाहेर जाऊन म्हातारीची अखेरची व्यवस्था करण्याच्या मार्गाला लागलें पाहिजे. तिनें जेंझ्याला बाजूला बोलावून पुढील व्यवस्था काय करायची तें समजावून सांगितलें व पाड्यावरच्या इतर दोनतीन जाणत्या माणसांना बोलावून त्यांना पुढील व्यवस्था करायला पाठविलें.

दुसऱ्या दिवसापासून मायाचीच्या झोंपडींत भोंवतालच्या बायका जमूं लागल्या. त्यांच्यासमोर मायाची म्हातारीचें खूप गुणवर्णन करी. म्हातारीचें ' दिसपाणी ' चांगल्या रीतीनें करण्याचा आपला विचार मायाचीनें त्या सर्व बायकांच्यासमोर जाहीर केला. त्यामुळें त्यांच्या गोष्टींना आतां निराळीच चालना मिळाली आणि त्या सर्वजणी 'दिवस कशा रीतीनें करावेत' याचा विचार करूं लागल्या.

मायाचीनें आपल्या झोंपडीच्या कोपऱ्यांत पुरून ठेवलेले तीस रुपये काढले व ते देराणीच्या हातीं देऊन त्या रुपयांतून म्हातारीच्या दिवसपाण्याचा खर्च करण्यास तिला सांगितलें. इतकेंच नव्हे तर जरूर पडल्यास दहा-पंधरा रुपये तिच्या पदरचे खर्च करण्यास सांगितलें. देराणीकडून जर उसने पैसे घ्यावे लागले तर त्याची तिनें लवकरच परतफेड करण्याचें कबूल केलें.

आज म्हातारी मेल्याचा बारावा दिवस. आजपासून तिचें श्राद्ध सुरू होणार. सकाळपासून त्यांची तयारी मोठ्या जोरांत चालू होती. पाड्यावरील सर्व लोक आज कामावर गेले नव्हते. संध्याकाळच्या सुमारास त्या धार्मिक विधीला सुरुवात होणार होती. त्यासाठीं घराच्या अंगणांत एक तात्पुरता मांडव घालण्यांत आला व त्यांतील जागा सारवून त्यावर प्रथम तुसाचा एक कणा काढण्यांत आला; नंतर दुसरा तांदुळाचा कणा काढण्यांत आला. त्यांवर मडकीं ठेवण्यांत आलीं, भगत बोलविण्यांत आला व लागलीच कामाला प्रारंभ झाला. सर्व मंडळी भोंवतीं बसली. भगत नंतर बराच वेळ घुमत राहिला. नंतर मेलेल्या म्हातारीच्या गुणवर्णनपर गाणीं गाण्यांत आलीं. संध्याकाळपासून आलेल्या मंडळींना सारखी मधून मधून ताडी देण्यांत आली. शेजारच्या भंडाऱ्यानें ओळखीमुळें ताडीचा दर थोडा कमी करण्याचें त्यांना कबूल केलें होतें. ३०-४० रुपयांची ताडी आणण्यांत आली होती. हा गाणीं गाण्याचा व ताडी पिण्याचा कार्यक्रम सर्व रात्रभर चालू होता. सकाळीं उठल्यावर त्यांच्यापैकीं एकाला 'पितर' (मेलेला माणूस) म्हणून मध्यें बसविण्यांत आलें. हा माणूस नंतर घुमायला लागला.

सुदैवानें मायाचीच्या म्हातारीला जिवंतपणीं विशेष त्रास झाला नव्हता. नाहींतर ज्या माणसाच्या अंगांत अशा रीतीनें 'पितर' येतें, तो मनुष्य त्या मृत माणसाला जिवंतपणीं ज्या हालअपेष्टा भोगाव्या लागल्या, त्यांचें रसभरित वर्णन करतो व ज्यानें ज्यानें त्याला त्रास दिला असेल, त्यांचीं नांवें सांगतो. एकादा इसम जर संशयास्पद स्थितींत मेला, तर ह्या पितर बनलेल्या इसमाच्या सांगण्याला फार महत्त्व येतें. त्या मनुष्याच्या अंगांत आल्यावर तो जें आपल्या मृत्यूचें कारण सांगतो, तें खरें मानण्यांत येतें. मायाचीची सासू शांतपणें मेली होती. तिनें फक्त 'माया' बाबत ह्या पितरामार्फत विचारपूस केली. नंतर तिथें जमलेले सर्व लोक त्या पितराला

भेटले. हा भेटण्याचा विधि बराच वेळ चालला. हा विधि चालू असतांना शिल्लक राहिलेली ताडी पिण्याचें काम चालूच होतें. अशा रीतीनें चोवीस तास चालू असलेला हा कार्यक्रम ताडीचीं मडकीं संपलीं, त्याच सुमारास खलास झाला.

हा सर्व समारंभ चालू असतां मायाची सारखी जिवापाड मेहनत करीत होती. एकादें बारीकसारीक कामसुद्धां ती स्वतः करीत होती. मध्यंतरीं दोनतीन वेळां ती म्हातारीसाठीं खूप रडली. तिला रडतांना पाहून भोंवतालच्या बायकांनीं तिची समजूत केली व मायाचीचें सासूवर जें प्रेम होतें, त्याची त्या बायांनीं मुक्तकंठानें स्तुति केली.

परंतु आतां जेव्हां तो शेवटचा कार्यक्रम संपला तेव्हां मात्र तिला अगदीं बेचैन वाटूं लागलें. एका दृष्टीनें पाहिलें, तर म्हातारीचा आजार, मृत्यु व नंतर तिचे 'दिवस' करण्याचा समारंभ ह्या सर्व घटना तिच्या पथ्यावरच पडल्या होत्या.

ह्या काळांत, त्या काळ्या रात्रीपासून ज्या भीतीनें व विषण्णतेनें तिला पछाडलें होतें, त्या सर्वांवर एक प्रकारचा पडदा पडलेला होता. त्या भोंवतालच्या गर्दींत तिला आपल्या दुःखाचा थोडा विसर पडला होता. परंतु ज्याप्रमाणें एकाद्या जखमेवरील खपली दूर झाल्यावर जसें भळभळां रक्त वाहूं लागतें, तसें तिची भीति व दुःख पुन्हा तिला बेचैन करूं लागलें. आपल्या हातून घडलेल्या पापाची हकीगत कानीं पडण्याच्या आंत आपली सासू वारली, याचें मात्र तिला मोठें समाधान वाटलें.

एक महिना असाच गेला व तिची भीति कमी होण्याऐवजीं वाढूं लागली. दोनतीन महिने गेले, मळणीसुद्धां केव्हांच झाली होती. ज्या गोष्टीची तिला भीति वाटत होती ती गोष्ट आतां संशयातीत झाली होती. आपल्या तोंडाला आतां निश्चित काळें फासलें जाणार ह्याची जाणीव झाली कीं, ती अतिशय खिन्न बनत असे. तिला सारखी भीति वाटे कीं, जर ही गोष्ट

लोकांना कळली, तर लोक काय म्हणतील ? आणि आज नाहीं उद्यां ती गोष्ट लोकांना निश्चित कळणारच होती. तीन मुलांची आई अशा फंदांत सांपडलेली जर दिसली तर लोक थोडीच गय करणार ? अशा प्रकारच्या विचारानें ती अगदीं कष्टी बने व मग ती सारी रात्र जागून काढी. कधीं कधीं ती रात्रीं उठून बसे व खूप रडे. आपल्या हातून केवढी भयंकर चूक झाली, केवढें मोठें संकट आपणावर आलें आहे, त्या संकटांतून अब्रू-निशीं कशी सुटका करून घ्यावयाची याचा विचार करीत रात्रींमागून रात्री तिनें जागून काढल्या. अशा वेळीं तिच्या डोक्यांत आत्मघात करण्याचे भयंकर विचारही येत. पण त्याच वेळीं शेजारीं झोंपलेल्या त्या लहान मुलांकडे तिची नजर जाई व मग ती आल्या संकटास तोंड देण्याचा निश्चय करी.

आतां दुसरी एक खुळी आशा तिच्या डोक्यांत थैमान घालूं लागली. वास्तविक नेहमींच्या पद्धतीप्रमाणें तो शेठचा कारकून एव्हांना वसुलीला यायला पाहिजे होता. परंतु ह्या वर्षीं अजून तो आला नव्हता. मायाची त्याची उत्सुकतेनें वाट पहात होती. तो आल्यावर ती त्याला भेटणार होती. त्याला भेटून ती काय करणार होती कोण जाणे ! पण दिवसेंदिवस त्याला भेटण्याची तिची उत्सुकता मात्र वाढत चालली होती; तथापि स्वतः होऊन शहरांत जाऊन त्याला गांठण्याचें धैर्य कांहीं तिच्याजवळ शिल्लक राहिलें नव्हतें. मात्र ती मोठ्या उत्कंठेनें त्याची वाट पहात होती, ही गोष्ट अगदीं सत्य.

इतक्यांत एके दिवशीं त्या पाड्यावर बातमी आली कीं, शेठचा कारकून दुसऱ्या दिवशीं वसुलीला येणार. ती बातमी ऐकून मायाची खूपच अस्वस्थ झाली. त्याला कसें टेभावें, भेटून त्याला काय सांगावें—याचा ती सबंध रात्र विचार करीत होती. दुसऱ्या दिवशीं तो शेठचा कारकून आला व लागलीच आपल्या वसुलीच्या कामाला लागला. तो

यावेळीं पूर्वीप्रमाणें मायाचीकडे आधीं आला नाहीं, तर पाड्यावरील इतर एकदोन घरीं त्यानें मापून धान्य घेतलें. तो आल्याचें कळल्या-पासून मायाची जराशी अस्वस्थ झाली. तिनें काळजीपूर्वक वेणीफणी केली व ती त्या कारकुनाची वाट पहात राहिली. शेवटीं एकदांचा तो तिच्या घरीं आला. पूर्वीप्रमाणें आतां तो घरांत वगैरे आला नाहीं. आल्याबरोबर त्यानें कामाला आरंभ केला. मायाची त्याच्यासमोर येऊन उभी राहिली; पण त्यानें तिच्याकडे मान वर करून पाहिलेंसुद्धां नाहीं. त्यानें जी मान खालीं घालून कामाला सुरुवात केली, ती त्यानें जरासुद्धां वर केली नाहीं. जेठ्या माप नीट भरत नाहीं असा त्याला संशय आला व म्हणून तो त्याच्या अंगावर दोन तीन वेळां खेंकसला. सर्व धान्याचें माप झाल्यावर त्यानें मागील बाकी म्हणून आणखी एक फऱ्याची मागणी केली. त्या वेळीं मायाचीनें बोलण्याचा प्रयत्न केला; पण कारकून जेठ्याला म्हणाला, " नांगत क्या रहस, जा लाहां लाहां बाकीचें धान घेन ये; मला अथं बसाया वखत नाय. " ( पहात काय राहिलास ? लौकर जाऊन बाकीचें राहिलेलें धान्य घेऊन ये. मला एथें थांबायला वेळ नाहीं. )

वार्ली लोकांच्याबरोबर नेहमीं काम करणारे कारकून वार्ल्यांच्या भाषेंतच त्यांच्याशीं बोलतात. कारकुनाचें तें बोलणें ऐकून जेठ्या तर अगदीं सर्दच झाला. मायाची आंत गेली व तिनें आणखी एक टोपली धान्य आणून आपल्या मुलापुढें ठेविलें. जेठ्यानें त्याला आणखी एक फरा धान्य मोजून दिलें; मग कारकुनानें नोकराजवळ तीं पोतीं दिलीं व एक शब्दहि न बोलतां तो तेथून निघून गेला. आजचें त्या कारकुनाचें वर्तन पाहून मायाचीपेक्षां जेठ्याला खूप आश्चर्य वाटलें. तो आईला म्हणाला, " आया नांगलंस काय ? आज तो कारकून असा क्याला करत

होता ? पोर ( गेल्यावर्षी ) तो पका बेस होता. अंमदां क्यां ( कशाला ) व्याट ( वाईट ) झाला. काय खबर ? ”

मायाचीनें त्याला कांहींच उत्तर दिलें नाहीं. तिला पण त्या कारकुनाचें वर्तन मोठें तऱ्हेवाईकपणाचें वाटलें. तो कारकून त्यांच्या गांवांत तीन दिवस राहिला होता. ह्या तीन दिवसांत तिनें संधि साधून, चारपांच वेळां त्याला भेटण्याचा प्रयत्न केला; पण दर खेपेला त्याच्याबरोबर कुणी ना कुणी होतेंच; शिवाय प्रत्येक खेपेला त्यानें तिच्याकडे न पाहिल्यासारखेंच केलें. ह्यामुळें त्याला भेटून जें कांहीं सांगण्याचा तिनें विचार केला होता, तो तिच्या मनांतल्या मनांतच राहिला. तो कारकून आला तसा निघूनसुद्धां गेला. मायाचीला आतां स्वतःबद्दल खूप काळजी वाटूं लागली. तिच्या पोटांतील पाप आतां हलूं लागलें होतें. ह्या अडचणींतून आपली कशी सुटका करून घ्यावी याचा ती सारखा विचार करी. तिच्या चेहऱ्यावर या काळजीचा परिणाम दिसूं लागला होता. मायाचीच्या प्रकृतीमध्यें जो फेरफार दिसूं लागला होता तो देराणीच्या लक्षांत आला होता; पण मायाचीच्या चोख वर्तनाबद्दल सर्वांची खात्री असल्यामुळें तिच्याबद्दल वेडावांकडा संशय कोणींसुद्धां घेतला नाहीं; आणि त्याला दुसरें कारण म्हणजे तिच्या पापाचें स्वरूप अद्यापि प्रकट दिसूं लागलें नव्हतें. एके दिवशीं जेळ्या व रामा जेवायला बसले असतांना, जेळ्या आईला सहज म्हणाला, “ आया, मी सांग माझा बास टाकला होवा ! कइचा जाघेल तो पताच नाय् त्याचा. जिवता होता तंय एकदां पण इया पाहिजे होता. ” ( आई, मी सांगतों माझा बाप वारला असेल ! केव्हांपासून तो गेला, त्याचा पत्ताच नाहीं. जिवंत असता तर एकदां तरी यायला पाहिजे होता ना ! )

“ क्याला एऱ्हींच व्याट व्याट बोलस ?” ( कशाला उगीच वाईट वाईट बोलतोस ? )

त्यानंतर थोडा वेळ जेठ्या निमूटपणें जेवला; पण त्याच्या डोक्यांत त्याच्या बापाबद्दल जे सारखे विचार येत होते ते त्याला स्वस्थ बसूं देईनात. थोड्या वेळानें जेठ्या पुन्हा म्हणाला, " आया, मी जायाचा पठारांत माझ्या बासला गवसाया; तूं पशे नाय् देशी तंय पण मी जायाचा न् जायचाच." ( आई, मी माझ्या बापाला शोधण्यासाठीं शहरांत जाणार. तूं पैसे नाहीं दिलेस तरी मी जाणार अन् जाणारच. )

" तूं जाऊन काय कराचा ? तूं जाशी अन् तथच रहाशी. मग मी एकली अथं काय कराची ? "

" आया, दादा जाय तंय त्याच्या हारी मी व जायाचा " ( आई, दादा जाईल तर त्याच्याबरोबर मी पण जाईन. ) धाकटा रामा म्हणाला.

" नांग, तुझा भास काय सांग?" ( पहा तुझा भाऊ काय म्हणतो ? )

" आया, मी नक्की तुला सांगत आहें, माझा बास टाकलाच होवा." ( आई, मी तुला खात्रीनें सांगतों; माझा बाप मेलाच असेल. )

ती पुन्हा त्याच्या अंगावर ओरडली, तेव्हां तो चूप बसला. तो चूप बसला खरा; पण त्यावेळेपासून तिचें विचारचक्र निराळ्या दिशेनें फिरूं लागलें. जेठ्या म्हणतो तेंच खरें असेल, आपला नवरा नक्की मयत झाला असेल; एरव्हीं तो एकदां तरी परत आला असता असें तिला वाटूं लागलें. त्या रात्रीं तिनें ह्या गोष्टीवर खूप विचार केला व मग तिनें आपल्या मनाची खात्री केली कीं, माया नक्की मेलाच असला पाहिजे.

दुसऱ्या दिवशीं ती सकाळीं लवकरच उठली व जेठ्याला सांगून ती डहाणूला जायला निघाली. जातांना घरांत जमलेलीं सात आठ अंडीं घेतलीं, एक रुपया ओटींत खोवून ती बाहेर पडली व डहाणूला जाण्यास निघाली.

डहाणू स्टेशनवर आल्यानंतर तिनें तीं अंडीं विकून टाकलीं. डहाणूला जातांना तिचें मनांत कोणता विचार रचला होता कुणास कळे ! तीं अंडीं

विकून झाल्यावर तिनें दोन आण्यांचे चणे विकत घेतले. एका जवळच्या चहाच्या दुकानासमोर जाऊन तिनें एक कप चहा मागितला व तो चहा उभ्यानेंच पिऊन टाकला आणि तेथून ती निघाली. स्टेशनच्या मागील बाजूला कोळसा वगैरे टाकण्याचें जें आवार आहे त्या बाजूला ती वळली. ज्या सावकाराचें शेत ती करीत होती, तो सावकार कोळशाचा पण व्यापार करीत असे; त्यामुळें तो सावकाराचा कारकून ह्या रेल्वेच्या आवारांत नेहमीं उभा असे. आपल्या शेठच्या ज्या कोळशाच्या गाड्या येतील त्या गाडीवाल्यांचा हिशोब करून त्यांची मजुरी चुकविण्याचें कामही तो करीत असे. त्याला केवळ भेटण्याच्याच उद्देशानें मायाची त्या बाजूला वळली.

आज बहुतेक दैव तिच्याच बाजूचें होतें; कारण तिला फार वेळ त्या कारकुनाला शोधावें लागलें नाहीं. तो समोरून येतांना तिला दिसला. ती थोडें पुढें सरली व तीं दोघें एकमेकांसमोर येऊन उभीं राहिलीं. तिला पहातांच तो आधीं थोडा चपापला; पण लागलीच स्वतःला सावरून त्यानें तिला तिथें येण्याचें कारण विचारलें. मोठी हिंमत करून मायाचीनें त्याला अस्पष्ट रीतीनें आपण अडचणींत असल्याचें सुचविलें व माया वारल्याची बातमी आल्याचें पण त्याला सांगितलें. तिचें बोलणें संपतांच तो एकदम ओरडून म्हणाला, "मला क्याला सांगस अजुनं ? मी तर तुला पुरे पशे दिघेल." ( मला कशाला सांगतेस हें सर्व ? मी तुला पूर्ण पैसे दिलेत. ) ह्याप्रमाणें तीं दोघें बोलत असतांच तेथील एक मुसलमान कारकून त्यांच्याजवळ आला व त्या शेठच्या कारकुनाला म्हणाला, "क्यौं आज तूनें नया कबुतर लाया ? मझा है यार तेरी" ( तूं आज नवीन पांखरूं आणलेंस ? मजा आहे तुझी. )

"अरे यार मुझे तो ए चीज बिल्कूल पसंद नहीं; तुझे मंगता तो उठा

लेना. " ( अरे मला ही वस्तु बिलकूल पसंत नाहीं; तुला जरूर असेल तर घेऊन जा. )

परंतु तो मुसलमान इसम जवळ आलेला पहातांच मायाची तिथून सटकली व जोरानें सडकेच्या बाजूला चालूं लागली. त्या कारकुनाचें बोलणें ऐकून तिला खूप संताप आला. त्यानें आपणाला जे दागिने बळजबरीनें दिले, त्याची फारच मोठी किंमत त्यानें वसूल करून घेतली हें तिच्या लक्षांत आलें. ती खूप चिडली; पण चिडून करणार काय ? घरांतून निघतांना जो एक बेत योजून ती निघाली होती, तो तिचा बेत साफ फसला. त्या माणसाला आपण भेटलों नसतों, तर फार बरें झालें असतें असें तिला वाटूं लागलें. ती ह्या वेळीं अगदीं एकटी होती. तिला धीर द्यायला कोणी जवळ नव्हतें; खालीं मान घालून तिनें जोरानें घरचा रस्ता सुधारला.

ती कशीबशी घरीं आली व दारांत येऊन बसतांच तिनें जोरानें रडायला सुरुवात केली. तिचा रडण्याचा आवाज इतका मोठा होता कीं, तावडतोब आजुबाजूच्या बायका व पुरुष येऊन तिच्याभोंवतीं गोळा झाले व जो तो तिला रडण्याचें कारण विचारूं लागला; पण तिच्या तोंडून शब्द फुटेना. शेवटीं देराणी तिच्याजवळ जाऊन बसली व तिनें तिला रडण्याचें कारण विचारलें. तिनें तिला आपण डहाणूला गेल्यावर तिथें मुंबईहून आलेला कोणी मांगेला भेटला व त्यानें मला माया मेल्याची खबर सांगितली, असें हळूहळू सांगितलें. ही हकिकत ऐकून जो तो मायाविषयीं बोलूं लागला. इतक्यांत तिचा मुलगा जेठ्या कुठूनसा तिथें येऊन थडकला व त्याला ती हकीकत कळतांच तो पण मोठ्यानें रडूं लागला. थोड्या वेळांत ती रडारड शांत झाली; इतक्यांत त्या जमावांतील नवशी नांवाची एक बाई मोठ्यानें गळा काढून रडूं लागली व मायाचीला म्हणाली, " तूं क्याला अवढी रडस ? तुला तर दोन बेस

पोरगें आहां. माझ्या सासऱ्याचा लेकूस टाकला तंयशीं मी आखां जलम एकली न एकली " (तूं कशाला एवढी रडतेस ? तुला तर दोन चांगले मुलगे आहेत. माझ्या सासऱ्याचा मुलगा—अर्थात तिचा नवरा--मेल्यापासून सबंध जन्म मी एकटी अन् एकटीच आहें. )

असा हा रडण्याचा व सांत्वन करण्याचा कार्यक्रम थोडा वेळ चालला. मग त्या जमावांतील जाणते पुरुष पुढे आले आणि त्यांनीं जेठ्याला एका बाजूला बोलावून घेतलें. वार्ली लोकांमध्यें असा एक रिवाज आहे कीं, जर एकादा मनुष्य बाहेर गांवीं मेला असेल व जर त्याचें प्रेत पहाण्यास मिळालें नसेल, तर त्याचे नातेवाईक त्या माणसाचें प्रतीक म्हणून एक बाहुलें तयार करितात. मग तें बाहुलें, सर्वजण जाऊन प्रेताप्रमाणें जाळून टाकतात. ह्याप्रमाणें जेठ्याला सांगून त्या जाणत्या लोकांनीं मायाचें शेवटचें ऋण फेडण्यासाठीं जें कांहीं विधियुक्त करावयाचें तें सर्व केलें.

माया वारल्याची बातमी हां हां म्हणतां सर्व ठिकाणीं पसरली गेली. दोनतीन दिवस भोंवतालच्या बायका मधून मधून येऊन मायाचीचें सांत्वन करून जात. त्या बायका आल्या कीं, त्यांच्यासमोर मायाची रडे व मायाचीचें नवऱ्यावरील प्रेम पाहून त्या बायका घरीं गेल्यावर तिचें भरपूर कौतुक करीत.

थोडे दिवस गेल्यावर जो तो आपआपल्या कामाला लागला; परंतु त्यानंतर मायाचीला आपल्या असहायतेची तीव्रतेनें जाणीव होऊं लागली. तिच्या पोटांतील पापाबद्दल दिवसेंदिवस ती अधिकच बेचैन होऊं लागली होती. ह्या संकटांतून आपली सुटका कशी करून घ्यावी याचा ती अहोरात्र विचार करीत होती शेवटीं तिनें ठरविलें कीं, ह्या संकटांतून जर आपणाला सुटका करून घ्यावयाची असेल तर आपणाला कोणातरी दुसऱ्या बाईची मदत घेणें जरूर आहे. तिच्या विश्वासाला पात्र अशी एकच व्यक्ति होती व ती म्हणजे देराणी. दुसरे दिवशीं

ती देराणीकडे गेली व संधि साधून तिनें देराणीजवळ ती गोष्ट काढण्याचें ठरविलें. बोलतां बोलतां देराणी तिला म्हणाली, " तुझ्या जिवाला बेस नाय् काय ? तुला पका थाक जसा इघेल. माया जिवता रहता तंय तुला नांगल्यावर तूं पोटाशीं इघेल असंच सांगायची होती मी. " ( तुझी प्रकृति बरी नाहीं का ? तूं फार थकलेली दिसतेस. माया जर जिवंत असता तर तुला दिवस गेले आहेत असेंच मी म्हणालें असतें. )

देराणीचें हें बोलणें ऐकून मायाचीला आश्चर्याचा धक्का बसला; पण लागलीच ती भानावर आली व तिनें देराणीला आपली अडचण समजावून सांगितली. देराणीनें तिला हें कसें झालें असें मुळींच विचारलें नाहीं; उलट तिनें तिला धीर दिला व त्या संकटांतून तिची सुटका करण्यासाठीं जरूर ती मदत करण्याचें कबूल केलें. देराणीला अशा प्रकारच्या अडचणींत पडलेल्या बायांची सुटका करण्याचें तंत्र माहीत होतें. बऱ्याच वार्ली लोकांना हें तंत्र माहीत असतें. आपण दिलेल्या ' वनसया ' ( वनस्पति ) ह्या बाबतींत किती अचूक काम देतात त्याचीं वर्णनें वार्ली लोक खुषींत आले कीं करितात.

ह्याप्रमाणें देराणीच्या बरोबर मायाचीनें बोलणें केलें व जातांना ही गोष्ट कोणालाही न सांगण्याविषयीं तिनें देराणीला बजावून सांगितलें. मायाचीला त्या बाबतींत पूर्ण निर्धास्त रहाण्यास देराणीनें सांगितल्यावर ती तिथून निघाली. घरीं आल्यावर तिला खूपच हलकें वाटूं लागलें. इतक्या दिवसांत तिला नीटशी झोंप कधींच लागली नव्हती; पण आज ती शांतपणें झोंपली.

दोन दिवस गेले व एके दिवशीं दुपारीं देराणी मायाचीकडे आली आणि तिनें आपण सर्व व्यवस्था केली असल्याचें तिला सांगितलें. " दवा पकी गरम रहे. अज्ग्या अंगाची आग होय " ( औषध फार गरम आहे. साऱ्या अंगाची आग होईल. ) असें देराणीनें मायाचीला

बजावून सांगितलें; परंतु कसेंही औषध असलें तरी तें घेण्याची आपली तयारी असल्याचें तिनें देराणीला सांगितलें.

ह्याप्रमाणें त्या दोघींचें बोलणें झालें व त्याच रात्रीं त्या दोघींनीं गांवाबाहेर एके ठिकाणीं जमावें व तिथें मायाचीनें तें औषध प्यावें असें ठरलें. औषध घेतल्यावर ती रात्र मायाचीनें तिथेंच पडून रहावें व दुसऱ्या दिवशी सकाळीं ती जिवंत राहिल्यास देराणीनें तिला घरीं आणावें असें ठरलें. कारण, हें औषध घेतल्यावर घेणाऱ्या बाईवर प्रसंगीं मरणाची पण पाळी येते, ह्याची देराणीनें आपल्या मैत्रिणीला जाणीव करून दिली होती. पण पुढें होणारी बेइज्जत टाळण्यासाठीं मृत्यूलासुद्धां कवटाळण्याची तयारी मायाचीनें दाखविली. वास्तविक वार्ली जमातींत पांढरपेशांप्रमाणें ह्या प्रकरणाबद्दल जास्त चोखंदळपणा बाळगिला जात नाहीं. जर एकाद्या कुमारिकेला अथवा विधवेला अशी अनैतिक संतति झाली तर लागलीच ' जमात ' बसते व ती त्या प्रकरणाची चौकशी करते. जमात त्या बाईला तिच्याशीं संबंध ठेवणाऱ्या पुरुषाचें नांव सांगायला सांगते. ज्या पुरुषाचें नांव ती सांगेल त्या पुरुषाचें म्हणणें ऐकून घेऊन त्या माणसास त्या बाईशीं लग्न लावण्याचा सल्ला देण्यांत येतो; पण जर तें लग्न होणें शक्य नसेल, तर त्या बाईला नुकसानभरपाई म्हणून अमुक रकम देण्याचा ठराव जमात करते. तात्पर्य काय कीं, अशा प्रकरणाचा पांढरपेशांपेक्षां सहानुभूति-पूर्वक निकाल लावण्याचें काम वार्ली जमात करते.

परंतु मायाचीला आपलें प्रकरण चार लोकांच्या कानीं जाऊं नये असें वाटत होतें. त्या गांवांत तिची प्रतिष्ठा मोठी होती व त्या प्रतिष्ठेला धक्का लागूं नये अशी तिची इच्छा असल्यामुळेंच, ती पुढील भयंकर दिव्यांतून जायला तयार झाली होती. तिच्या सुदैवानें देराणीसारखी विश्वासू व जाणती बाई तिला मदत करायला लाभली होती.

ह्याप्रमाणें त्या दोघीजणी रात्रीं त्यांच्या शेतावरील खळ्याजवळ जमल्या

व तेथें आल्यावर मायाचीला देराणीनें एका मडक्यांतून उकळवून आण-लेलें तें औषध पाजलें.

ती रात्र त्या दोघींनीं त्या खळयामध्यें काढली. मायाचीनें औषध घेऊन एक तास झाला असेल नसेल तोंच त्या औषधाचा तिच्यावर परिणाम व्हायला सुरुवात झाली. तिच्या पोटांत जोरानें दुखूं लागलें व तिच्या सर्वांगाची लाही होऊं लागली. आगीचा नुसता डोंब उठला.मायाची सारखी विव्हळत होती व देराणी तिच्याजवळ बसून तिला सारखा धीर देत होती. हा प्रकार सुमारें एक तास चालू राहिला व ह्या तासांत मायाचीला अवर्णनीय वेदना सहन कराव्या लागल्या; परंतु तासाभरानें तिची त्या पापांतून सुटका झाली. देराणीनें तिच्याजवळ जाऊन नंतरचे सर्व विधि केले. आतां मायाची खूपच थकून गेली होती. तिला देराणीनें थोडा वेळ विश्रांति घेण्यास सांगितलें व तिच्या जवळच ती पण थोडी आडवी झाली.

सकाळींच देराणी तिला घेऊन गेली. त्या दिवसापासून मायाची कित्येक दिवस आजारी राहिली. तिच्या ह्या आजारांत देराणीनें पाठच्या बहिणीप्रमाणें तिची सेवाचाकरी केली. भोंवतालच्या बाया मधून मधून तिच्याकडे येऊन बसत. त्यांनीं पांढरपेशा बायकांप्रमाणें तिच्या आजारा-बद्दल कधीं आपसांत काथ्याकूट केला नाहीं. उलट, प्रत्येक बाई तिला थोडी बहुत मदतच करण्याचा प्रयत्न करीत होती; कारण मायाचीबद्दल त्या सर्वांनाच एक प्रकारची आपुलकी वाटत असे.

ह्या आजारामध्यें मायाचीला खूप अस्वस्थ वाटत होतें. तिला सारखें वाटे कीं, देराणीच्या गळयांत गळा घालून खूप खूप रडावें; पण तिला रडूं कसें तें येत नव्हतें. आजारानें ती खूपच थकून गेली होती. कित्येक दिवस ती शेतावर जाऊं शकली नाहीं; अर्थात् त्यामुळें तिच्या शेता-बाबतची सर्व जबाबदारी तिच्या मोठया मुलावरच येऊन पडली. आजारामध्यें मायाची कोणाशीं बोलत नव्हती. मूळचीच ती अबोल;

पण आतां ती कमालीची अंतर्मुख बनली होती. एक देराणी आली कीं, तिच्याशीं थोडी बोले; बाकी सर्व वेळ डोळे मिटून ती पडून राही. तिला दिवसांतून एकदां, देराणीजवळ बसून खाऊं घाली व देराणी आली तरच ती खाई.

अशा प्रकारें दिवसामागून दिवस जात होते. आतां पुन्हा शेतें पिकलीं होतीं व मळणीला थोडा वेळ होता. ह्या वर्षीं मायाचीच्या मोठ्या मुलानें—जेठ्यानें—सर्व कामें इतर शेजारी पाजाऱ्यांच्या मदतीनें एकट्या-नेंच केलीं होतीं. भोंवतालच्या लोकांनी त्याला भरपूर मदत करायला मुळींसुद्धां कमी केलें नव्हतें. रोज सकाळीं उठून जेठ्या कामाला जाई.

असाच एक दिवस तो कामावर जायला निघाला, तों त्याच्या दारांत त्याला शेठचा जुना कारकून दिसला. त्याला पाहून तो आश्चर्यचकीत झाला. त्या कारकुनानें आपल्या शेठची नोकरी सोडली, असाच त्या पाड्यावरील लोकांचा समज होता; पण तो पुन्हा दारांत दिसल्यावर जेठ्याला साहजिकच खूप आश्चर्य वाटलें.

जेठ्याला पहातांच तो म्हणाला, " काय जेठ्या, बेस का नाय् ? " ( काय जेठ्या ठीक आहे ना ? )

" बेस सांगशी तंय बेस. पण आया बेस नाय्, कइची ठाकून हाय्; पका जर इधेल तिला. अंमदा गोट कऱ नको. अजुगं काम मी एकटयानं आपोटलं. पकां पकां तरास झाला." ( तूं म्हणशील तर ठीक, पण आईला बरं वाटत नाहीं, केव्हांपासून ती झोंपून आहे. फार ताप येत आहे तिला. यंदां गोष्ट बोलूं नको. सर्व काम मी एकटयानं आटोपलं. फार फार त्रास झाला. )

जेठ्या हें बोलत होता, तेव्हां मायाचीची व त्या कारकुनाची नजरा-नजर झाली; पण त्याच्या नजरेंत मायाचीला सहानुभूतीचा मागमूस दिसला.

नाहीं. अत्यंत केविलवाण्या नजरेनें तिनें त्याच्याकडे पाहिलें; पण त्यानें तिची नुसती चौकशीसुद्धां केली नाहीं. आपण ऐकलेल्या गोष्टीचा आपणावर जरासुद्धां परिणाम झाला नाहीं असें भासवून तो जेठयाला म्हणाला, " चल माझ्या हारी नांगू वर केंड ब्रेस पिकेलशीं ! " ( चल माझ्याबरोबर पाहूं शेतं नीट पिकलीं का ? ) असें म्हणून मायाचीकडे न पहातां तो जेठयाला घेऊन निघून गेला.

त्याची ही बेपर्वा वृत्ति पाहून मायाचीला खूप भडभडून आलें. त्यानें केलेल्या अत्याचाराचें फळ आज महिनेच्या महिने ती भोगत होती. त्याला ह्या सर्व गोष्टींची पूर्ण जाणीव असूनही त्यानें नुसती शब्दाची सहानुभूतिसुद्धां दाखविली नाहीं. सहानुभूतीच्या एका शब्दानेंसुद्धां तिला बरें वाटलें असतें; पण तेवढी माणुसकीसुद्धां त्यानें जेव्हां दाखविली नाहीं, तेव्हां मायाचीला खूप खूप वाईट वाटलें व ज्या अश्रूंची ती गेले कित्येक दिवस सारखी वाट पहात होती, ते अश्रू सर्व पाटबंधारे तोडून खळखळां वाहूं लागले. ती सारखी रडूं लागली. हुंदके देऊन देऊन रडूं लागली. देराणीला तें कळतांच ती हातांतलें काम टाकून धावत आली. मायाचीच्या अंगावरून तिनें हात फिरविला. थोडा वेळ ती तिच्याजवळ बसून राहिली; पण एका शब्दानें तिनें तिला रडें आवरण्यास सांगितलें नाहीं; इतकेंच नव्हे तर तिथून जातांना ती मायाचीच्या मोठया मुलीला सांगून गेली कीं, " आया रडेल तवढी रडूंन दे. रडेल तयंच ब्रेस." अशा प्रकारें मायाची बराच वेळ रड रड रडली. मग ती थकली आणि थोड्या वेळानें तिचा जरासा डोळा लागला.

पण झोंपून तो जेव्हां उठली तेव्हां तिच्यांत खूपच बदल झालेला दिसला. तिला स्वतःला खूप हलकें वाटत होतें, इतकेंच नव्हे तर एक प्रकारची हुशारी पण वाटत होती. जवळच बसून राहिलेल्या आपल्या मोठया मुलीला तिनें हाक मारून बोलाविलें. [illegible] प्रकृतीबाबत

तपास केला. आज कित्येक महिन्यांत तिनें मुलांबाबत एक अक्षर तोंडावाटे काढलें नव्हतें. आपल्या मुलीच्या डोळ्यांबाबत एकदोन प्रश्न विचारले व दुसऱ्या दिवशीं तिच्याकरतां औषध आणण्याचें आश्वासन देऊन तिच्याजवळ तिच्या धाकट्या भावाचा तपास केला. तिनें बाहेर जाऊन त्या मुलाला बोलावून आणलें. तो आल्यावर त्याला तिनें छातीशीं धरिलें व त्याचे एकामागून एक कितीतरी मुके घेतले. नंतर त्याच्याकडे थोडा वेळ ती टक लावून पहात राहिली व म्हणाली "नांग कवढा काला दिसस तूं ? कइचा आंघोलला नाय् होवा ! उद्यां मी तुला बेस आंघोल घालाची. " ( पहा किती काळा दिसतोस तूं. केव्हांपासून तुझी आंघोळ राहिली असेल ! आतां उद्यां मी तुला नीट आंघोळ घालतें. )

इतकें बोलून तिनें त्याला पुन्हा एकदां जवळ घेतलें; इतक्यांत तिची नजर आंत येत असलेल्या मोठ्या मुलाकडे गेली व ती त्याला म्हणाली, " जेठ्या, तुझ्या हाताला कसं हाय आतां ? खांडेल ( कापला ) होता ना तुझा हात ?" असें म्हणून तिनें त्याला जवळ बोलाविलें व त्याचा हात आपल्या हातांत घेऊन तो साफ बरा झाला असल्याची खात्री करून घेतली.

आपल्या आईच्या वृत्तीमधील हा आकस्मिक फेरबदल पाहून त्या मुलांना फार आश्चर्य वाटलें. त्यांना वाटलें, फार दिवस बाहेरगांवीं गेलेली आपली आई आज आपणांमध्यें परत आली. आईनें जवळ घेतल्यामुळें त्या सर्व मुलांना भरपूर आनंद व उत्साह वाटला ! तीं सर्व मुलें तिच्याजवळ बसलीं. त्यांनीं तिला खूप निरनिराळ्या गोष्टी ऐकविल्या. आज कित्येक दिवसांनीं त्या घराला आलेली प्रेतकळा नाहींशी झाली होती व एक प्रकारचा अपूर्व आनंद सर्वत्र पसरलेला दिसत होता.

थोड्या वेळानें ती उठून बसली. मग तिनें जेठ्याजवळ आपल्या शेताची खूप आस्थेवाईकपणें चौकशी केली व त्यानें तिला जरूर ती सर्व माहिती सांगितली. नंतर तो म्हणाला, " आया, शेठचा कारकून सांगं तो आतां बिजून अथं इयाचा नाय्. अमदाचं त्याचं आखेरीचं वरस हाय. तो

आतां पठारान् जायाचा. तो सांग, त्याला जंगलांत हिंडायचा पका कंटाला इधेल. सांग दर वरसाला तीच भुसाटं ( वार्ली लोकांना सावकार लोक तुच्छतेनें 'भुसाटं म्हणत असत. ) नांगायचीं अन् त्याच त्यांच्या म्हाताऱ्या व नांगायच्या. " ( आई, शेठचा कारकून म्हणतो, तो आतां फिरून इथें येणार नाहीं. यंदाचं त्याचं शेवटचं वर्ष आहे. तो आतां शहरांत जाणार. तो म्हणतो, त्याला जंगलांत फिरण्याचा फार कंटाळा आला आहे. दरवर्षी तेच वार्ली व त्याच त्यांच्या बायका पहायच्या. )

आपल्या मुलाचे वरील शब्द तिनें अगदीं शांतपणें ऐकून घेतले. थोडा वेळ ती अगदीं शांत राहिली. जणूं काय तिनें ऐकिलेले ते शब्द ती नीट पचवून घेत होती. थोड्या वेळानें ती मुलाला म्हणाली, " असं सांग काय तो ! तो नाय् येय तंय् बिजा येल् ! " ( असें म्हणतो काय तो ! तो नाहीं आला तर दुसरा येईल कोणीतरी ! )

थोड्या वेळानें तिनें आपल्या मुलांना जेवायला उठविलें. ती स्वतः जाऊन त्यांच्यामध्यें बसली व त्यांच्याबरोबर तिनें थोडी आंबील घेतली. मुलें जेवत होतीं व सारखीं बोलत होतीं. तीसुद्धां त्यांच्या बोलण्यांत भाग घेत होती. जेवणें आटोपल्यावर तिनें देराणीला बोलावून आणण्याचा विचार केला; पण आपल्या आईमध्यें जो अकल्पित बदल घडून आला, त्याची बातमी तिच्या मुलांनीं आधींच देराणीच्या कानांवर घातली असल्यामुळें, तीच स्वतः होऊन तिला भेटायला आली. थोडा वेळ बोलून देराणी आपल्या घरीं गेली. जातांना तीसुद्धां खूप खूष झालेली दिसली.

झोंपण्यापूर्वी तिनें जेठयाला आपल्या मुलीकरतां डॉक्टरकडून काशाला जाऊन औषध आणण्याची सूचना दिली व ती सर्व मंडळी झोंपण्यासाठीं आपआपल्या पथारीवर पडली. थोड्याच वेळांत एकामागून एक सर्वजण गाढ झोंपीं गेले. आज प्रत्येकाच्या तोंडावर प्रसन्नता व शांतता दिसत होती. किती गाढ झोंप लागली होती त्या सर्वांना ! * * *

: ११ :

दुसऱ्या दिवशीं सकाळीं ती उठली, ती आपला आजार विसरूनच उठली. उठल्याबरोबर नित्याचीं कामें पूर्ववत् करायला तिनें आरंभ केला. सकाळची आंबील झाल्याबरोबर तिला मुलीच्या डोळ्यांवर औषधोपाय करण्याची आठवण झाली. रात्रीं झोंपतांना तिनें मुलीला काशाला नेण्याबाबत मोठ्या मुलाला सांगितलें होतें. पण सकाळीं तिचा विचार बदलला. तिनें धुंदुलवाडीला जाऊन भगताला बोलावून आणण्यास जेठ्याला सांगितलें.

भगत आला व त्यानें आपली भगताई करायला सुरुवात केली. थोड्या वेळानें तो मायाचीला म्हणाला " हिचे डोले वेस व्हायाचे नाय्, हिनें काय तरी पका व्याट काम करेल होवा." ( हिचे डोळे चांगले होणार नाहींत. कारण हिनें कांहीं तरी फार वाईट काम केलें आहे )

भगताची ही स्पष्टोक्ति ऐकून त्या मायलेकींना जबरदस्त धक्का बसला. थोड्या वेळानें मायाची त्या भगताला म्हणाली, " निक्कां डोले बेस नाय् होयाचे ? ही पोरगी तर लहान; ही क्याचं व्याट काम कराची !"( खरंच ! डोळे चांगले नाहीं का होणार ? ही मुलगी तर लहान आहे, ही काय वाईट काम करणार ? )

" हिचं नाय् तयं तुझं पाप होया. तुझं व्याट काम करेल, तें पोरगीला तरास देत होवा " तो भगत म्हणाला.( हिचं नसलं तर तुझं पाप असेल ! तूं वाईट काम केलं असशील, तें पोरीला त्रास देत असेल. )

त्या भगताचे हे शब्द ऐकून मायाचीला फार वाईट वाटलें. आपल्या हातून घडलेल्या पापाबद्दल आपल्या पोरीला जन्मभर आंधळें व्हावें लागेल,

हें ऐकून तिला अपरिमित दुःख झालें. थोडा वेळ ती स्वतःशींच विचार करूं लागली. खूप विचार करून तिनें ठरविलें कीं, तें जें पाप आपल्या हातून घडलें, त्याला आपण जबाबदार नाहीं. प्रयत्न करूनसुद्धां आपण ती गोष्ट घडण्याचें टाळूं शकलों नसतों. नंतर तिनें त्या भगताबरोबर थोडा विचारविनिमय केला व अमुक एक प्रकारचा तोडगा केल्यास थोडा आराम वाटूं शकेल अशी त्यानें तिला खात्री दिली. आठ दिवसांनीं तो पुन्हा येऊन जरूर तो विधि करणार होता.

तो भगत निघून गेल्यावर मायाचीनें आपल्या पोरीची खूप समजूत घातली. तिच्या आजीचे डोळे असेच लाल होत असत; पण ती आयुष्यांत केव्हांच आंधळी झाली नाहीं, असें तिनें आपल्या मुलीला सांगितलें. भगतानें सांगितल्याप्रमाणें आपण इलाज करून पाहूं व नंतर कदाचित् तुझे डोळे सुधारतील, असेंही तिनें त्या मुलीला समजावून सांगितलें. त्या मुलीची वृत्ति अशी होती कीं, पडेल तें दुःख निमूटपणें सहन करावें. उभ्या आयुष्यांत ( चैतीनें ) तिच्या मुलीनें कधींही आपलें स्वत्व प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला नव्हता. जें पडेल, तें सहन करावें; जें मिळेल, तें खावें; जें करावें लागेल, तें करावें–एवढेंच तिला माहीत होतें.

आठ दिवसांनीं भगत येणार होता. तो आल्यावर त्याला पुष्कळ वस्तु भगताई करण्यास लागणार होत्या. ह्या सर्व वस्तु विकत घेण्यास पैसे लागणार होते. आपल्या पापाचें प्रायश्चित्त आपल्या मुलीला भोगावें लागूं नये, म्हणून मायाची सर्व प्रयत्न करायला तयार होती. दोन तीन दिवसांनीं तिला खूप हुशारी वाटूं लागली, तेव्हां एके दिवशीं सकाळीं ती उठली व कामाला जाण्याची तयारी करूं लागली. आपणास लागणारे पैसे उभे करण्याकरितां काय करावें याचा ती विचार करीत असतां

तिला कारकुनानें दिलेल्या सांखळीची आठवण झाली. त्याबरोबर ती सांखळी विकून टाकावी व ते पैसे ह्या कामीं लावावे, असा तिनें विचार केला; पण पुन्हा तिला वाटलें, त्या पापी प्रकरणाची आठवणसुद्धां नको. त्या सांखळीला हातसुद्धां लावूं नये असें तिचें एक मन तिला सांगूं लागलें. त्यावर तिच्या दुसऱ्या मनानें तिला असें उत्तर दिलें कीं, ती सांखळी तूं फेकून दे. कारण उद्यां जर तुझा माया परत आला व त्यानें जर ती सांखळी पाहिली. तर त्याचा नक्की वाईट परिणाम होणार. कारण, ही सांखळी आपण विकत घेऊं शकणार नाहीं, ह्याची मायाला खात्री असणार. मग ती आपल्या घरांत कशी आली तें त्याला समजावून सांगावें लागणार व अशी सांखळी आपण ठेवून घेतल्याबद्दल तो आपणांवर खूप रागावणार. सबब ही सांखळी घरांत न ठेवणें इष्ट हा विचार तिला पटला. पण ती सांखळी फेकून देण्याऐवजीं विकून टाकावी, हें योग्य असें तिनें ठरविलें.

तिनें ती सांखळी घेतली व मुलीला बरोबर घेऊन ती काशाला जायला निघाली. तिनें मुलीचा हात धरला होता. काशाला गेल्यावर तेथील मांगेल्याच्या दुकानांत ती गेली. तिनें त्याला तो जिन्नस दाखविला आणि तो विकत घेण्यास त्याला सांगितलें. त्या मांगेल्याची व तिची ओळख असल्यामुळें फारशी घासाघीस न होतां सौदा पटला व त्यानें दहा रुपये तिच्या हातांत ठेविले. खेड्यांपाड्यांतून वस्ती करून राहिलेले हे मांगेले लोकसुद्धां वाल्यांच्या अज्ञानाचा कमी फायदा घेत नाहींत. संधि मिळेल तेव्हां हेसुद्धां वाल्यांकडून जास्तींत जास्त फायदा उपटण्याचा प्रयत्न करतात आणि वाल्यांच्या जीवनाशीं ज्यांचा ज्यांचा म्हणून संबंध येतो, ते ते सर्व लोक संधि मिळाली म्हणजे वाल्यांना पिळतात. केवळ सावकारांपासून अथवा ठेवीदारांपासूनच वाल्यांना भय आहे असें नव्हे, तर वाल्यांच्या दैनंदिन गरजा पुरवूं शकणारे

जे जे लोक आहेत, ते ते सर्व लोक जसें जमेल तसें वाल्यांचें अर्थशोषण करीत असतात.

मायाची ते दहा रुपये घेऊन निघाली; पण इतक्यांत त्या मांगेल्याची नजर चैतीच्या डोळ्यांकडे गेली व त्यानें मोठ्या आस्थेनें तिच्या डोळ्यांबाबत चौकशी केली. तिनें सांगितलेली हकीकत ऐकतांच तो तिला म्हणाला, "मायाची माझं ऐकशी तूं ? यो अथं काशाला नवा डाक्टर इघेल, तो पक्का बेस हाय. माझ्या हारी तूं तथं चल. यो अथंच दवाखान्यांत रहं. तो तुझ्या पोरगीचं डोले बेस नांगून दवा देईल." (मायाची, तूं माझं ऐकशील ? हा इथंच काशाला जो नवा डॉक्टर आला आहे, तो फार चांगला आहे. माझ्याबरोबर तूं तिथें चल. तो इथं दवाखान्यांतच रहातो. तो तुझ्या पोरीचे डोळे नीट पाहून औषध देईल ).

मायाचीनें त्याचें बोलणें ऐकून घेतलें व त्यानें फार आग्रह केल्यावर ती आपल्या मुलीला घेऊन त्या डॉक्टराकडे गेली. काशाला लोकल–बोर्डाचा दवाखाना ठेवला आहे व तेथें आयुर्वेदिक कॉलेजांत शिक्षण घेतलेला एक डॉक्टर नेमला आहे. त्या डॉक्टराकडे तो मांगेला मायाचीला घेऊन गेला. मांगेल्याची व मायाची चांगली ओळख होती, त्यानें डॉक्टरला सर्व हकीकत सांगतांच, त्यानें उठून तिचे डोळे काळजीपूर्वक तपासले. डॉक्टराची तपासणी होत असतां, मायलेक मोठ्या आशाळभूतपणें डॉक्टरकडे टक लावून पहात राहिल्या. थोड्या वेळानें डॉक्टर तिला म्हणाले, " मी औषध देतों, तें रोज लावीत जा. त्यानें लाली कमी होईल; परंतु आतां दिसतें ह्यापेक्षां तिला जास्त दिसणें शक्य नाहीं. इतकेंच नव्हे तर हळू हळू तिला कमीच दिसूं लागेल. " डॉक्टरचे हे शब्द तिला व त्या मुलीला अत्यंत तापदायक वाटले.

डॉक्टरनें दिलेलें औषध घेऊन मुलीला हातानें धरून ती निघाली. आपली मुलगी जन्मभर आंधळीच रहाणार, ह्या विचारानें तिला एकदम

जोराचा धक्का दिला. रस्त्यानें जातांना ती कांहीं बोलली नाहीं. आपल्या हातून घडलेल्या पापामुळेंच आज आपणावर ही आपत्ति आली अशी तिची मनोमय खात्री झाली. तिला त्या वेळच्या आपल्या वागण्याबद्दल खूप खूप वाईट वाटलें. घरीं आल्यावर त्या रात्रीं ती मनमुराद रडली. अशाच प्रकारें ती एकसारखा विचार करीत बसली असतां तिला खूप खूप थकल्यासारखें वाटलें. आतां आपण पूर्ण म्हातारें झालों, आपली जवानी आपणाला कायमची सोडून गेली ह्याची तिला अगदीं पहिल्यानें, ह्या क्षणीं जाणीव झाली. अशा चमत्कारिक मनःस्थितींत ती असतां तिला केव्हां झोंप आली, कुणास ठाऊक !

* * *

# १२

दुसऱ्या दिवशीं ती उठली, त्या वेळीं आपण आतां तरुण नाहीं, ह्याची तिला आठवण होती—नव्हे, आपण आतां ‘ वाडगीण ’ ( म्हातारी ) झाल्याचें तिच्या मनानें कायमचें घेतलें !—

तशी ती इतर बायांप्रमाणें लठ्ठ झाली नव्हती. तिची शरीरयष्टि पूर्वीसारखीच सडपातळ होती. उतार वयांत इतर बाया ज्याप्रमाणें अंगानें सुटतात, त्याप्रमाणें ती सुटली नव्हती. तिचें चालणें पण पूर्वींसारखेंच दमदार होतें; पण तिच्या डोळ्यांभोंवतीं निळ्या रेघांचें जाळें पसरलेलें होतें व त्यामुळें एकदम पहाणारास ती म्हातारी दिसूं लागली होती.

आणि योगायोग पहा कसा ! तिला ज्यावेळीं आपण ‘ वाडगीण झाल्यासारखें वाटूं लागलें, त्याचवेळीं लोकांनींसुद्धां तिला ‘ वाडगीण ’ या नांवानें संबोधायला प्रारंभ केला. पहिली सुरुवात शेजारच्या देराणीच्या लहान मुलानें केली. तो तिच्याजवळ आला व म्हणाला, “ वाडगीण, आया तुला वाहरं ” ( म्हातारे, आई तुला बोलावते. )

त्या मुलानें तिला ‘ वाडगीण ’ या नांवानें हांक मारतांच तिला एकदम धक्का बसला; पण चटकन् ती भानावर आली व म्हणाली, “कोणाला रं वाडगीण सांगस ? ” ( कोणाला तूं म्हातारी म्हणतोस ? )

“ तुला. बिजं कोणाला ? बिजी कोण वाडगीण हाय अथं ? ” ( तुला. दुसऱ्या कोणाला ? दुसरी कोण म्हातारी आहे एथें ?) तो म्हणाला.

आतां मात्र ती चूप राहिली.

दुसरा अनुभव तिला त्याच दिवशीं आला. ती शेतावर गेली होती मोठ्या मुलाबरोबर. आज कित्येक दिवसांनीं ती शेतावर आली होती व

त्यामुळें मोठ्या उत्साहानें ती कामाला लागली होती; पण ती जें जें काम करायला निघे, तें तें काम तिचा मुलगा तिच्या हातून काढून घेऊं लागला व दर वेळीं तो म्हणाला, " आया, तूं क्याला अवढं काम करस ? आतां तुला जबरा थाक येत होवा. वाडगीण जशी दिसस तूं आतां; फार काम नको करू."( आई, तूं कशाला इतकं काम करतेस ? आतां तुला फार दम लागत असेल; म्हातारी दिसतेस तूं. )

मुलाच्या या बोलण्यानें ती अगदीं नाराज झाली व काम तसेंच टाकून तिथून घरीं निघून गेली.

ती घरीं आली, तेव्हां तिला पूर्णपणें पटलें होतें कीं, आतां ती तरुण राहिली नाहीं. घरांत आल्यावर तिची आंधळी मुलगी तिच्या नजरेस पडली; त्या वेळीं आपल्या घरांत एकादी चांगली तरुण मुलगी असणें जरूर आहे, असें तिला पहिल्यांदा वाटलें. मग तिनें आपल्या मुलाचें वय किती असेल याचा हिशेब केला व आपला मोठा मुलगा आतां बराच मोठा झाल्याचें तिला पटलें. आतां त्याचें लग्न शक्य तितक्या लवकर करावयाचें असा तिनें मनाशीं निश्चय केला.त्या मुलानें अजूनपर्यंत आपल्या लग्नाबाबत तिच्याजवळ शब्द काढला नव्हता. तो दिवसभर कामावर जाई, रात्रीं थोडा वेळ शेजारीं पाजारीं जाऊन बसे व मग झोंपून जाई. कधींकाळीं फारच कंटाळला, तर शेजारच्या भंडाऱ्याच्या दुकानांत जाऊन तो बोलत बसे. कधीं एकादे वेळीं एकादी बाटली ताडी तो घेई; परंतु इतर लोकांप्रमाणें तो डहाणूला किंवा कुठल्याही बाजाराला जात नव्हता. कधीं लहर लागली, तर एकाद्या वेळीं तो पावा घेऊन वाजवीत बसे. त्या पाड्यावर लहानमोठ्या बायका होत्या, पण हा कधीं त्यांच्यामध्यें जाऊन गप्पा मारीत नसे. त्यांनीं विचारलेल्या प्रश्नांचीं मोजक्या शब्दांतच उत्तरें देई. त्याला कोणी जानी–दोस्त नव्हता; मग लग्न करून घेण्याची इच्छा जरी त्याला

कधींकाळीं झाली असली, तरी ती तो कोणाजवळ व्यक्त करणार ? आणि आईबद्दल तर त्याच्या मनामध्यें कायमचीच दहशत बसली होती !

ज्या क्षणीं मुलाचें लग्न जमविण्याचे विचार तिच्या डोक्यांत आले, त्याच क्षणीं दुसरा पण एक विचार तिला त्रास देऊं लागला. आपल्या मुलाला बायको आणण्यापूर्वीं आपल्या मुलीची सोय करायला पाहिजे. आपल्या मुलीचें कसें होईल याची तिला काळजी वाटूं लागली होती. पूर्वीं ज्या वेळीं तिनें आपल्या मुलीच्या लग्नाबद्दल आपल्या मुलाजवळ बोलणें काढलें होतें, त्या वेळीं " आया, तूं क्याला अवढी फिकर करस ? मी बशेल हाय तिला खाया घालाया" ( आई, तूं कशाला एवढी काळजी करतेस ? मी बसलों आहे तिला खायला घालायला. ) असल्या शद्बांनीं त्यानें आईचें समाधान केलें होतें; परंतु मायाचीला वाटलें, उद्यां जर ह्याची बायको आली व तिच्या नादानें जर ह्यानें आपल्या मुलीकडे दुर्लक्ष केलें तर ?

पण चैतीशीं लग्न करणार कोण? आतां तर ती आंधळी ह्या सदरांत जमा झाली होती. मायाचीनें एक घंटा आणली होती व ती एका काठीला बांधून तिच्या हातांत दिली होती. ती चालूं लागली कीं, काठी आपटी व नंतर ती घंटा वाजे; मग समोरच्या माणसांना आंधळी येत असल्याचें कळे ! परंतु हें सर्व जरी झालें, तरी ती आंधळी आहे ही गोष्ट सत्य होती व अशा आंधळीला कोण पत्करणार ? पण आपल्या डोळ्यांसमोर तिचें लग्न करण्याचा मायाचीनें जवळ जवळ निश्चय ठरविला होता; कारण, लग्नानंतर आपल्या मुलामध्यें बदल होईल असें तिला सारखें वाटत होतें; आणि त्याला थोडें कारणही तसेंच घडलें होतें.

तिचा जो धाकटा मुलगा होता, तो आतां मजबूत व उंच झाला होता. तो शेताच्या कामाकडे ढुंकूनसुद्धां बघत नसे. भोंवतालच्या पाड्यांवर व खेडयांवर तो रखडत राही व नेमका दोन वेळ जेवायला हजर होई. त्याच्या मोठ्या भावानें त्याला अनेकदां कामावर येण्याबाबत सूचना

दिल्या. पण त्यांचा कांहीं उपयोग होत नाहीं, असें दिसतांच त्यानें एक दोन वेळां त्याच्यावर चौदाव्या रत्नाचा प्रयोग केला. एकदां तर त्यानें त्याला चागलेंच बडवून काढलें. त्या वेळीं त्या मुलानें एवढ्या जोरानें ओरडा केला कीं, शेजारचे लोक धावत आले व त्यांनीं त्या मुलाला सोडविलें. तेव्हांपासून तर मायाचीला त्या मुलाची सारखी काळजी वाटूं लागली व तिच्या मनानें पक्कें घेतलें कीं, जोंपर्यंत ह्या मोठ्या मुलाचें लग्न झालें नाहीं, तोंपर्यंतच हा आपल्या जवळ रहाणार. एकदां त्याचें लग्न झालें कीं, हा आपणाला, चैतीला व आपल्या धाकट्या मुलाला मुळींच नीट वागाविणार नाहीं.

ज्या दिवशीं जेठ्यानें आपल्या धाकट्या भावाला खूप बडाविलें, त्या दिवसापासून त्याच्यामध्यें व त्याच्या आईमध्यें असलेली दरी दिवसेंदिवस जास्तच वाढत चालली. त्याची खात्री होती कीं, जर आपल्या भावाला वेळींच आपण धाक बसविला नाहीं, तर तो बिघडेल. आपण दिवसभर मर मर मरावें आणि ह्या पोरानें नुसतें उनाडावें, हें त्याला आवडत नव्हतें.

आपला धाकटा भाऊ नुसता उनाडतो, तरी आई त्याचेच लाड करते. उलट, आपण इतकी मेहनत करितों, तरी आपणांशीं ती धड बोलतसुद्धां नाही ह्याचें त्याला फार वैषम्य वाटे. त्याच्या धाकट्या भावानें मार मिळालेल्या दिवसापासून जेठ्याच्या वाऱ्यालाही उभें न रहाण्याचें धोरण स्वीकारलें. तो फारसा घरीं रहातच नसे. जेठ्याच्या गरहजेरींत तो घरीं येऊन जेवून जाई व त्यावेळीं आईजवळ बसून थोडा बोलत राही. पण जेठ्या आल्याची चाहूल लागतांच तो पळून जाई व बाकीचा सर्व वेळ तो शेजारच्या पाड्यावर घालवी. तिथें समवयस्क पोरापोरींचीं टोळकीं जमवून तो त्यांच्या संगतींत आपला वेळ घालवी.

जेठ्याला आपल्या आईचें वागणें मुळींच पसंत नव्हतें; पण स्वभावतःच अबोल असल्यामुळें तो आईबरोबर फारसा वाद करीत बसत नसे. पण

कधीं कधीं मात्र तो संतापून आईला सांगे कीं, तिनेंच आपल्या भावाला फार लाड करून बिघडविलें आहे. " आया, तुला तोच पोरगा गंमत आहे. " ( आई तुला तोच मुलगा आवडतो. )

आणि त्याचें हें म्हणणें फारसें खोटें नव्हतें. तिला तोच मुलगा फार आवडे; त्याचें कारण त्याचा तोंडावळा थेट मायाच्या तोंडावळ्यासारखा दिसे. त्याचें बोलणेंचालणें थेट मायासारखें होतें व त्यामुळें तो मुलगा तिला अधिक आवडे. त्याच्याखेरीज दुसरें कोण आवडणार तिला ? चैती शहाणी होती, कामसू होती; पण ती आंधळी असल्यामुळें जरी तिला तिची खूप कींव येत होती, तरी ती त्या मुलाइतकी तिला आवडत मात्र नव्हती. आणि जेठ्या ? त्याच्याबद्दल तर तिच्या मनांत अलीकडे एक अढीच निर्माण झाली होती; त्यामुळें दिवसेंदिवस तो तिच्या मनांतून उतरत चालला होता; आणि त्यामुळेंच, जेव्हां जेठ्या आपल्या धाकट्या भावाला मारायला जाई, तेव्हां ती मध्यें पडे व जेठ्यालाच दोन शिव्या हांसडून, त्या लहान मुलाला त्याच्या तावडींतून सोडवी.

आईनें सोडविल्यावर तो मुलगा पळून जाई व मग बराच वेळ घरीं येत नसे. तो वेळेवर जेवायला परत न आला,तर मायाची काळजीनें व्यग्र होई व हातांमध्यें त्याची भाकरी व बरोबर ' आंबटं ' घेऊन ती त्याला शोधायला जाई व भेटल्यावर ' बाबा ' ' पुता ' करून ती त्याला जेवूं घाली.

परंतु हें सर्व जेठ्याला समजणार नाहीं, अशी काळजी बाळगून ती करी. जेठ्याच्या आधींच शेतावरून ती घरीं येई व आल्यावर पहिल्यानें आपल्या धाकट्या मुलाला जेवायला घाली. जेठ्या घरीं येण्याच्या आंत ती त्या मुलाला जेवायला देण्यास चुकत नसे. कारण तो मुलगा तिला अतिशयच आवडत असे. त्याचा तो गोल पण गोंडस चेहरा,त्याचें तें डौलदार बोलणें, बोलतांना आपल्या बापाप्रमाणें हातवारे करण्याची त्याची ती लकब-

या सर्व गोष्टींमुळें तिला तो मुलगा खूप खूप आवडे. आणि जेव्हा ? खूप कामामुळें त्याचे हात राकट झाले होते. सबंध दिवस उन्हांत काम करावें लागल्यामुळें तो खूप काळवंडला होता. सबंध दिवस काम करून जेव्हां तो घरीं येई, तेव्हां थकल्यामुळें तो पडून राही. त्याच्यामध्यें एक प्रकारचा सुस्तपणा निर्माण झाला होता. नेहमींच्या अबोल वृत्तीमुळें त्याचा चेहरा गंभीर दिसत असे. ह्या सर्व कारणांमुळें मायाचीला तो मुळींच आवडत नसे. शिवाय, पुढें लग्न झाल्यावर हा आपणाला, आपल्या मुलीला व मुलाला विचारणार नाहीं, हें जें तिच्या मनानें घेतलें होतें, त्यामुळें तर तो तिच्या मर्जींतून झपाट्यानें उतरत चालला होता. त्याच्या उलट, धाकट्या मुलावरचें तिचें प्रेम दिवसेंदिवस सारखें वाढत चाललें होतें.

आपल्या आईला जरासासुद्धां त्रास पडूं नये, म्हणून आपण इतकी काळजी घेतों, तरी आपली आई आपणाशीं नीट वागत नाहीं याचें त्याला वरचेवर वाईट वाटे ! आई आपणाशीं अशी कां वागते, ह्याचा तो सारखा विचार करी. शेवटीं त्याच्या मनानें ठरविलें कीं, ह्या लहान भावामुळेंच आई आपणाशीं अशी कठोरपणें वागते; आणि त्यामुळें तो त्या लहान भावाचा द्वेष करूं लागला.

* * *

## : १३ :

त्याच्या पोटांत त्याच्या भावाबद्दल धुमसणारा हा द्वेषाग्नि किती जोरानें भडकत चालला आहे त्याची कोणालाही—त्याला सुद्धां—कल्पना नव्हती. पण एके दिवशीं ह्या ज्वालामुखीचा जोरानें स्फोट झालाच !

तो स्फोट ह्या वर्षीं मळणीच्या वेळीं झाला. मळणीचे दिवस शेतकऱ्यांच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचे. त्या वेळीं घरांतील सर्व माणसांनीं कामाला लागलेंच पाहिजे. ज्या वेळच्यीं कामें त्या वेळीं झालींच पाहिजेत व म्हणूनच मायाचीनें धाकट्या मुलाला बजावून सांगितलें होतें कीं, "मोठा दादा काम सांगेल तें करजो. थोडा दिस बेस काम करजो."( मोठा दादा सांगेल तें काम करीत जा. थोडे दिवस चांगलें काम कर. ) व त्याप्रमाणें तो काम करायला पण लागला होता.

ज्या दिवशीं ही गोष्ट घडली, त्या दिवशीं लहान 'दादूनें' ( लहान मुलाला वार्ली लोक 'दादू' म्हणतात. ) सकाळपासून नीट काम केलें होतें; कारण ह्या वेळेला जर त्यानें चांगलें काम केलें,तर त्याला त्याची 'आया' कांहींतरी चांगलें बक्षिस देणार होती. त्या दिवशीं त्या सर्व मंडळींना खूपच काम पडलें. वाडगीण तर खूपच थकून गेली. त्या काळ्या रात्रीं तिनें तें औषध घेतलें आणि तेव्हांपासून तिची काम करण्याची शक्ति साफ कमी झाली होती. सकाळपासून खूप काम केल्यावर ती अगदीं थकून गेली व मुलांना म्हणाली, " मी आतां घरां जायाची, मी धान रांधत आहे, तुम्ही काम आपोटून ( आटोपून ) घरां या. "

" तूं थाकली होवा तंय घरां जा; आम्ही काम आपोटून मगच येऊं," तिचा मोठा मुलगा तिला म्हणाला.

त्या दोन भावांना तसेंच काम करीत ठेवून ती तिथून निघाली व घरीं जाऊन कामाला लागली. तिनें भाताचें मडकें चुलीवर ठेविलें, इतक्यांत तिची ती मुलगी ओरडली, " आया नांग, दादू क्याला गाज करत रडत हाय तो," ( आई पहाना, दादू कशाला मोठ्यानें ओरडून रडत आहे. ) हें ऐकतांच ती हातांतील काम टाकून बाहेर आली. तों तिला आपला मोठा मुलगा त्याच्या धाकट्या भावाला बडवीत असलेला दिसला. तो धाकटा मुलगा पण त्याच्या मोठ्या भावाच्या हाताला झोंबत होता व आपली सुटका करून घेण्याचा प्रयत्न करीत होता; पण मोठा भाऊ चांगलाच मजबूत असल्यामुळें त्यानें त्याला घट्ट धरलें होतें व तो त्याला जोरानें मारीत होता.

एकाद्या वाघिणीप्रमाणें ती वाडगीण त्या मोठया मुलावर धावून गेली व लहान दादूला सोडवूं लागली आणि म्हणाली " अवढा क्याला कुटस ? काय मारून टाकाचा हाय त्याला ?" ( इतका त्याला कशाला मारतोस ? काय त्याला ठार मारण्याचा विचार आहे ? ) असें म्हणून तिनें त्याच्यावर झडप घातली व त्या लहान मुलाला सोडवून घेतलें. भावाच्या हातांतून सुटल्याबरोबर त्या अंधारांत तो कुठें गडप झाला कुणास कळे !

तो मुलगा दूर गेला, हें पाहून ती मोठ्या मुलाला म्हणाली, " लहाना पोरगा तो. त्याला कवढा कुटस ? पोर तो खेलाचाच. " ( तो लहान असल्यामुळें त्याचें खेळांत लक्ष आहे; मोठा झाल्यावर तो आपोआप काम करायला लागेल. ) अशा अर्थाचें तें आईचें भाषण ऐकून तो म्हणाला, "मी लहाना होता तंय काम नाय् करत होता ? तें वखताला मी नाय् करता, तंय सावकार अजूगी भोय ( सर्व जमीन ) खाऊन जाता. कइशीं (केव्हांपासून) मी काम करून मरून जात हाय्; यो रखडत फिरत हाय्. "

याप्रमाणें त्यानें भावाबद्दल तक्रार सुरू केली व तिनेंच लाड करून त्याला बिघडवून टाकलें असल्याचें तो म्हणाला. आपण मर मर मेहनत

करतों व पै पैसा कमावतों आणि त्यांतून या उनाडाला चैन करायला आई मधून मधून पैसे देते, अशी पण त्याची तक्रार होती. इतकेंच नव्हे, तर मळणीचें काम नीट करण्याबद्दल आईनें ह्या मुलाला एक कडें कबूल केलें होतें. "मी काम करून मराचा, तूं त्याला कडा दियाची ? मी क नांगत आहे तूं त्याला कशे पशे देस ती ?"( मी काम करून मरतों व तूं त्याला कडें देणार ? मी पण पहातों तूं त्याला कशी पैसे देतेस ती. ) असें म्हणत तो तिथून निघून गेला व पुन्हा कामाला लागला. आज त्याच्या अंगांत कोणी सैतानच संचारला होता. अंधार पडला होता, तरी तो काम करीतच होता. थोडा वेळ त्याची वाट पाहून मायाची त्याला बोलवायला शेतावर गेली. तिनें त्याला हांक मारल्यावर तो काम टाकून तिच्याजवळ आला. तो खूप चिडला होता; पण आतां आईच्या जवळ येऊन उभा राहिल्यावर एकाएकीं त्याला रडूं कोसळलें.

त्याला रडतांना पाहून तिला फार वाईट वाटलें. ती झटकन् उठली व त्याच्याजवळ येऊन उभी राहिली. तिनें त्याला खेचून आपल्या पोटाशीं धरलें व म्हणाली, " गुन्हा माझाच, तूं क्याला ( कशाला ) रडस ? तूं घरचं अजूनं काम करस. ( तूंच घरचा मोठा माणूस. ) तूं सांगशी तें अजूनं मी ऐकाची, तूं काय ब्याट ( वाईट ) सांगस ? आतां बाजारहाट अजूगी तूं करजो. तूं मोठा बंड्या ( तरुण ) झालास. आज पावत मी तुझ्यावर घेन ( ध्यान ) दिधेल ( दिलें ) नाय्; पण आतां मी तुला ' नवरी बदवायची ( नवरी नक्की करणार ). तुझं लगीन झालं मग तूं व तुझी म्हातारी( बायको ) अजूनं काम काज नांगा ( पहा )."

नंतर त्याला शांत करून ती आपल्या कामाला लागली. तिनें आतां आपल्या मनाशीं कांहीं गोष्टी निश्चित ठरविलेल्या असाव्यात. ती झपाट्यानें घरकामांत गुंतली. तिचा मुलगा कांहीं तरी बडबडत तिथेंच बसून राहिला.

आज ती जेवणासाठीं कांहीं तरी विशेष बनविणार होती. तिनें आपल्या घरांतून दोन तीन अळूचे कांदे काढले व थोडे सुके बोंबील काढून त्यांचें आंबटं बनविण्याचें काम ती करूं लागली. इतक्यांत तिच्या मुलीनें विचारलें, "आया, गांज (गडबड) क्याचा झाला ?"

"तुझे दोन भास ( भाऊ ) झगडले. तो लहाना काम करत नाय्. मग जेव्हा त्याच्या हारी ( बरोबर ) झगडं आणि त्याला कुटं ( मारतो ). आज त्याला जरा वधारे ( पुष्कळ ) कुटला."

ह्याप्रमाणें आपल्या मुलीशीं बोलत असतां ती हातानें काम करीतच होती. आपला मोठा मुलगा एकाद्या मोठ्या माणसाप्रमाणें आपल्या कुटुंबाचा भार उचलत असून आपण मात्र त्याला मोठ्या माणसाप्रमाणें वागवीत नाहीं, याबद्दल तिला फार वाईट वाटलें व तिनें मनाशीं निश्चय केला कीं, शक्य तितक्या लवकर त्याचें लग्न करून द्यायचें व इतःपर संसाराचीं सारीं सूत्रें त्याच्या व त्याच्या बायकोच्या हातीं सोपवायचीं. त्याला खूप खूष करण्याचा तिनें मनाशीं निश्चय केला व त्याप्रमाणें तिनें विशेष उत्साहानें जेवण तयार केलें.

थोड्या वेळानें अंधार पडला व तिचा मोठा मुलगा घरांत आला. तो एकाद्या चोरासारखा घरांत शिरला. कांहीं न बोलतां तो निमूटपणें उभा राहिला. आपल्या भावाला मारल्याबद्दल त्याला पश्चात्ताप झाला होता. त्याच्या तोंडावरून त्याचा राग पार नाहींसा झाला, असें त्याच्या चाणाक्ष आईनें ताडलें. आई आपलें लग्न करून देणार, हें ऐकून त्याला मोठें समाधान वाटलें. त्याला घरांत आलेला पाहून ती त्याच्याजवळ गेली व म्हणाली, "चल धान खाया. आंबटं पण आज बेस करेल हाय्."( जेवायला चल, आमटी आज चांगली केली आहे. )

त्याचा धाकटा भाऊ घरांत चूप बसून होता. दोन भावांची नजरानजर झाली; पण मोठा भाऊ कांहीं बोलला नाहीं. त्याचा राग गेला

होता. तो आईच्या बरोबर जेवायला उठला. त्याचा धाकटा भाऊ पण उठून शेजारीं पानावर जाऊन बसला.

जेवणें आटोपल्यावर मायाची उठली व देराणीच्या घरीं गेली. नेहमींची तिची पद्धति होती कीं, जर तिला कांहीं त्रास झाला तर ती लागलीच उठायची व देराणीकडे जाऊन तिला सर्व गोष्टी सांगायची. देराणी म्हणजे तिचें एक विश्वासस्थान होतें. आजसुद्धां ती उठली व देराणीकडे गेली. तिनें आज घडलेली सर्व हकीकत तिला सांगितली. आपल्या मुलाचें लग्न आतां केलेंच पाहिजे, ही गोष्ट तिला आतां पूर्णपणें पटली होती. मुलाला योग्य अशी नवरी तिच्या पहाण्यांत नव्हती. देराणी आजूबाजूच्या खेड्यांत फिरत होती; व त्यामुळें तिच्या पहाण्यांत पुष्कळ मुली असाव्यात असें मायाचीला वाटत होतें. त्यामुळेंच आज ती देराणीकडे जाऊन बसली होती. ती देराणीजवळ बोलत होती व देराणी आपल्या लहान मुलाला पदराखालीं घालून पाजत होती. शेवटीं मायाची देराणीला म्हणाली, " तुझा बापूस ( बाप ) रंहं, तथं नायका एकाद बेस पोयरी ? कामांत अंमल ( जरा ) हुशार होवी तंय बेस. "

मायाचीची ही विनंती ऐकून देराणी गालांतल्या गालांत हंसली व तिनें आपल्या नवऱ्याकडे चटकन् एक कटाक्ष फेकला. नंतर तिनें मायाचीला विचारिलें, " माझ्यासारखी अशी तशी चालेल तुला ? " त्यावर तिचा नवरा एकदम म्हणाला, " तूं अशी तशी कशी ? तूं तर पकी बेस हायस." आणि मग तीं तिघें एकदम मोठ्यानें हसूं लागलीं. नंतर देराणी म्हणाली, " आमच्या गांवांत आपल्या लोकांचीं फार घरं आहां, मी जाऊन एकदा बेस जशी हेरून येत्यें. "

तिचें हें उत्तर ऐकून मायाचीला फार बरें वाटलें. " नांग फार बेस पोरगी आम्हांला नाय् परवडायची. आमची पदरची ( स्वतःची ) भोय ( जमीन ) नाय्. सावकाराची भोय आम्ही खंडानं करूं, फार बेस

पोरगी होवी तंय ' देज ' ( पोरीबद्दल पैसे ) पण फार दिया पडेल. नवरी बदवायची तंय पैशाची पण सोय कराया पडेल. पण पशे तर मी घेन येईन सावकाराकडशी. तूं पोरगी हेरून ( पाहून ) ये. ''

मायाची बोलत असतांना देराणीचा नवरा निमूटपणें ऐकत होता. तिचें बोलणें थांबल्यावर तो म्हणाला, '' तुझा जेठया का आंधला हाय् का लंगडा ? काय ब्याट आहे तो ? बिजा लोकांची कोठ भोय आहे मोटी ? त्यांच्या पोरांना कशा बेस पोरी मिलत; मगा तुझ्या जेठयाला क्या नाय् मिलाची ? ''

त्याचं बोलणं ऐकून मायाची खूप आनंदली; पण ती कांहीं बोलली नाहीं. देराणी मात्र त्याला म्हणालो, '' तूं सांगशी तंय जाऊन इयाची मी दोन दिस. ''

'' तूं एकलीच क्याला जास ? मी व हारी ( बरोबर ) येत आहे तुझ्या. मला व काय काम नाय्. ''

मायाची म्हणाली, ''तुम्हीं फार तरास घ्या माझ्यासाठीं. माझ्या पोराच तुम्ही बेस लगीन करून द्या. तुमच्या बगर बिजा कोण माझं काम कराचा ?'' ( तुमच्याशिवाय दुसरा कोण माझं काम करणार ? )

दुसऱ्या दिवशींच देराणी, तिचा नवरा व एक दोन लहान मुलं अशी सारी मंडळी देराणीच्या बापाच्या गांवीं जायला निघाली. देराणीचीं इतर मोठीं मुलें तिथंच राहिलीं. कारण त्यांची व्यवस्था करायला देराणीच्या दोन मोठया मुली समर्थ होत्या. त्या मंडळींनीं स्वतःची गाडी काढली व तींत तीं जाऊन बसली. गाडी सुटेपर्यंत मायाची तिथें बसून देराणीजवळ हळू हळू बोलत होती व वरचेवर तिला हातवारे करून कांहीं सांगत होती. अखेर एकदांची गाडी सुटली. मायाची घरीं परत आली व येणाऱ्या सुनेबद्दलचीं कल्पनाचित्रें रंगवीत बसली.

तीन चार दिवस गेले, देराणीचा पत्ता नव्हता. देराणीनें कबूल केल्या-

पेक्षां एक दिवस अधिकच गेला. देराणीच्या कर्तृत्वशक्तीबद्दल व आपल्या-वरच्या प्रेमाबद्दल मायाचीला पूर्ण खात्री होती. वाटेल तो प्रयत्न करून देराणी आपल्यासाठीं सून शोधून आणील, याबद्दल तिला खात्री वाटत होती. पण तिला लागलेली हुरहूर मात्र कमी होत नव्हती.

अखेर एकदांची देराणी आली. तिची गाडी येत असलेली मायाचीनें दुरून ओळखली व ती उठून मोठ्या आशेनें तिच्या गाडीकडे धावत गेली. देराणीच्या तोंडावरचें तें हसूं पाहून मायाचीला फार आनंद झाला.

गाडींतून मुलें उतरलीं. सामान काढावयाचा प्रश्नच नव्हता. कारण, वार्ली लोकांजवळ स्वतःच्या मालकीचें फारसें असें कांहीं नसतेंच. बदलायला कपडा असण्याची जिथें मारामार, तिथें दुसरें सामान बरोबर नेण्यासारखें काय असणार !

ती मंडळी उतरल्यावर देराणी व मायाची तिथेंच झोपडीच्या दारांत बसून बोलूं लागल्या. देराणीचा नवरा गाडी सोडून बैलांना पाणी पाजाव-याला गेला. देराणी म्हणाली, " आमच्या गांवांत पोयऱ्या घण्या (पुष्कळ), पांच दहा अशा पक्या मातेल ( मजबूत—लठ्ठ ), दिसाया बेस जशा होत्या. आपल्याला तर एकूच पोरगी पायजे, माझ्या बासच्या ( बापाच्या ) कुट-बातलीच ( कुटुंबांतील ) एक पोरगी मी नांगेल. तिच्या बापाशीं गोट ( गोष्ट ) जशी करेल. तिचा एक वखतं बोल पाजेल (वाङ्-निश्चय करणें ) होता. पण तो पोरगा टाकला ( मेला ) तंय तिचं लगीन होदेल ( झालं ) नाय्; पण पोरगी जुवान, फक्कड आहे. बिजा पोरी आहां, पण त्यांचे बापूस पसे फार मागत आहां; पण हिचा बापूस पोरगी जेठ्याला देया हेरं ( द्यायला मागतो ), पोरींचे डोले असे बेस आहां; गोट करूं नकोस. मला तर पोरगी फार गमली. जेठ्या जंय नांगेल ( पाहील ) तंय सांगेल, " हेच पोयरीशीं मी लगीन करायचा. बिजी नकोच मला."

"माझ्या पोरगीचे डोले बेस नाय्; माझे व डोले आतां ब्याड झाले. बेस

डोल्यांची पोयरी मला फार गंमत आहे. तुम्ही आतां ही गोट बेस पकी जशी करून टाका '' मायाची म्हणाली.

इतक्यांत जेठ्या पण आला. त्याला कळून चुकलें होतें कीं, आपल्या लग्नाच्या खटपटी चालू आहेत व देराणी त्याच कामासाठीं बाहेर गांवीं गेली होती. तो आला व त्या दोघींजवळ येऊन उभा राहिला. त्याला पहातांच देराणी म्हणाली, " जेठ्या नांग तुझ्यासाठीं अशी बेस पोयरी गवशेल (शोधली) आहे मी. तूं इयाचा का तिला नांगाया ?" (तिला पहायला तूं येणार का ?)

" तो काय येऊन नांगायचा. तुझी पसंत करेल पोरगी व्याट (वाईट) थोडीच रह्याची. तुला पसंत ती त्याला व (सुद्धां) पसंत.'' मायाची बोलली.

जेठ्या कांहीं न बोलतां चूपच राहिला. आपलं लग्न आतां थोड्याच दिवसांत होणार या विचारानं त्याला गुदगुल्या होऊं लागल्या. इतक्यांत देराणीच्या नवऱ्यानें त्याला बोलावल्यावरून तो तिकडे निघून गेला व मायाची आणि देराणी दोघी बसून जेठ्याच्या लग्नाबाबतच्या गोष्टी हळूहळू बोलत बसल्या. घरीं सून आणण्यास मायाची अत्यंत उत्सुक होती व शक्य तितक्या लवकर जेठ्याचें लग्न उरकून टाकण्याचा तिनें बेत केला. मुख्य प्रश्न होता पैशाचा; तो हलकेच देराणीनें तिच्यापुढें टाकला. मुलीच्या बापाला 'देज' (मुलीबद्दलचे पैसे) देण्याची जरूर नाहीं. कारण त्या मुलीचा पूर्वी ठरलेला नवरा मेल्यामुळें तिला मागणीच येत नव्हती व देराणीच्या शिफारशीमुळें त्या मुलीचा बाप जेठ्याला ती मुलगी विशेष आढेवेढे न घेतां द्यायला तयार होता. तरी त्या मुलीचें तें पहिलेंच लग्न असल्यामुळें तीनशें रुपये कमींत कमी लागतील, असा त्या दोघींचा अंदाज होता.

मायाची स्वभावानें फार करारी व मानी बाई होती. आपल्याला ह्या गांवांत प्रतिष्ठा आहे, ह्याची तिला जाणीव होती. त्यामुळें आपल्या मुलाचें

लग्न जरी थाटामाटांत कारितां आलें नाहीं, तरी तें पद्धतशीरपणें झालें पाहिजे, देणें घेणें अगदीं व्यवस्थित झालें पाहिजे, असा तिचा कटाक्ष होता. परंतु मुख्य प्रश्न होता पैशाचा. इतकी रकम कशी उभी करावयाची याचा त्या दोघींनीं कांहीं काळ खल केला व देराणीच्या नवऱ्यानें तिला बोलाविल्यामुळें, तो प्रश्न मायाचीवर सोपवून ती तिथून उठली.

रात्रीं ती व जेठ्या दोघं मिळून लग्नाकरितां पैसे कसे उभे करावयाचे ह्याचा विचार करूं लागलीं. शेवटीं दोघांनीं ठरविलें कीं, जेठ्यानें दुसरे दिवशीं सकाळीं डहाणूला सावकाराकडे जावें व तीनशें रुपये व्याजीं आणावे. बरोबर देराणीच्या नवऱ्याला जामीन म्हणून नेण्याचें नक्की ठरलें. सावकार तरी फुकाफुकी पैसे देणार नाहीं, याबद्दल त्यांची खात्री होती. पण जास्त व्याज देण्याचें कबूल करून व जरूर पडल्यास सावकाराकडे नोकरी करण्याचा करार करून पैसे उभे करावयाचें ठरलें. शिवाय, जरूर पडल्यास पदरचीं एक दोन गुरें काढून टाकण्याचें पण त्यांनीं ठरविलें. मग तीं दोघें झोंपायला गेलीं. रात्रभर मायाची जेठ्याच्या लग्नाचीं स्वप्नें पहाण्यांतच गुंगून गेली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं जेठ्या उठला व आईच्या संमतीनें तो डहाणूला सावकाराकडे गेला. त्याच्याबरोबर मायाचीनें शेजाऱ्याला पाठविलें व जरूर पडल्यास शेठकडे जेठ्यासाठीं जामीन रहाण्याचें कबूल करण्यास त्याला विनविलें. मायाचीच्या वागण्यामुळें देराणी व तिचा नवरा यांच्यावर तिची अशी कांहीं छाप पडली होती कीं, मायाचीनें सांगितलेली कोणतीही गोष्ट करण्यास तीं दोघें सदैव तयार असत.

जेठ्या व त्याचा शेजारी डहाणूला गेले व नंतर देराणी व मायाची दोघी जेठ्याच्या लग्नाबद्दलच्या योजना आंखत बसल्या. सावकारानें पैसे देण्याचें नाकारलें तर पुढें काय करावयाचें, याचाही त्या दोघींनीं विचार केला व तशीच पाळी जर आली, तर वाटेल तें व्याज कबूल करून

दीनाबाई पार्शिणीकडून पैसे काढण्याचें त्या दोघींनीं निश्चित केलें. पैसे आल्यावर दोनतीन दिवसांनीं जाऊन ‘ छोटा बोल ’ ( साखरपुडा ) पाजून लागलीच ‘मोठा बोल’ ( लग्न ) पाजण्याचें त्या दोघींनीं नक्की केलें.

जेठ्या सावकाराकडे आला, तो मुहूर्त बहुधा चांगला असावा. कारण शेठच्या बरोबर फारशी बातचीत न करतां शेठनें त्याला तीनशें रुपये व्याजीं देण्याचें कबूल केलें. व्याजाचा दर शेठनें कांहींतरी सांगितला; पण जेठ्याला त्यांतलें एक अक्षरसुद्धां समजलें नाहीं. पैसे जेठ्याला जर परत करणें शक्य नसेल, तर त्यानें शेठकडे घरकामाला रहावयाचें व दरवर्षी ४० रुपयांप्रमाणें त्याला नोकरीबद्दल पगार द्यावयाचा. हे पगाराचे पैसे त्याला रोख न देतां त्यानें नेलेल्या कर्जापोटीं जमा करावयाचे, असा करार ठरला. त्याप्रमाणें जेठ्यानें पैसे घेण्याचें कबूल केलें. शेठच्या कारकुनानें कांहीं तरी लिहून आणलें व जेठ्याचा आंगठा घेतला. जामीन म्हणून देराणीच्या नवऱ्याचा पण आंगठा घेतला. शेठनें तीनशें रुपये काढून त्याच्या हातावर ठेविले. जेठ्यानें पैसे हातीं घेतले व तो आपल्या शेजाऱ्याला घेऊन घरीं जाण्यास निघाला.

जेठ्या व देराणीच्या नवरा पैसे घेऊन घरीं आले. त्यांची वाट पहात मायाची व देराणी झोंपडीच्या बाहेरच बसल्या होत्या. पैसे मिळाल्याचें वृत्त कळतांच त्या दोघींना खूप आनंद झाला. त्या आनन्दाच्या भरांत कोणत्या अटींवर आपल्या मुलानें पैसे आणले, हें विचारायला पण ती विसरली. जेठ्याचें लग्न शक्य तितक्या लवकर करावयाचें, ह्या विचारानें तिला इतकें भारून टाकलें होतें कीं, दुसरा कसलाही विचार करण्याची तिला शुद्ध राहिली नव्हती.

दुसऱ्या दिवसापासून त्या घराचा रंगच बदलला. जेठ्याच्या आगामी लग्नामुळें घरांत एक निराळेंच वातावरण खेळूं लागलें. मायाची, देराणी

व तिचा नवरा, देराणीच्या माहेरच्या गांवीं जेठ्याचें लग्न देराणीनें पाहिलेल्या मुलीशीं, नक्की करण्याकरितां गेले. तेथें मुलीच्याकडील मंडळींच्या बरोबर बोलणीं झालीं, लग्नाचा दिवस ठरला, ताडी मागविण्यांत आली व पाड्यावरच्या लोकांना व पाटलाला बोलावून 'छोटा बोल' पाजला गेला ( साखरपुडा झाला ). जेठ्याचें लग्न नक्की ठरलें व पुढल्या पाखांत, चांद अर्धा मोठा झाल्यावर लग्न लागायचें ठरलें !

* * *

## : १४ :

लग्नाची तयारी जोरानें चालू झाली. लग्नाची तयारी ती काय करायची ? तसं पाहिलं तर वार्ल्यांचीं लग्नें अगदीं साधीं. फारसा गाजावाजा नाहीं, फारशी तयारी लागत नाहीं. लग्नाला फारशी साधन-सामुग्री लागत नाहीं कीं, जेवणाचा गोंधळ नाहीं. एक जेवण पाहुण्यांना मिळणार. तें सुद्धां अगदीं साधें—भात व कसलं तरी आंबटं (आमटी)—ताडी मात्र खूप लागते. लग्नाच्या एकूण खर्चांपैकीं पाउणपट रक्कम ताडीवर खर्चायची. राहिलेल्यापैकीं थोडे पैसे कापडाकरितां व जेवणाकरितां ठेवायचे.

घेतलींच पाहिजेत म्हणून तीन लुगडीं नवरीला. तीं साधीं जाडीं-भरडीं. एक लुगडें नवरीच्या आईला. नवरीच्या लुगड्याचा रंगसुद्धां ठरलेला. एक हिरवें, एक तांबडें व एक पांढरें. तशाच तीन चोळया. एक हिरवी, एक तांबडी व एक पट्टया पट्टयाची. सासूच्या (मुलीच्या आईच्या) लुगड्याचा रंग ठरलेला नाहीं; पण वार्ल्यांचीं लुगडीं ठराविक रंगाचींच. मुलीच्या आईला लग्नांत मोठा मान. तिला लुगडें मिळालेंच पाहिजे. एक जाडें भरडें धोतराचें पान तें नवरीच्या भावासाठीं. तो एक महत्त्वाचा मानकरी. बाकी कोणालाही ‘ सुडकीं ’ नाहीं.

हीं लुगडीं खरीदण्यासाठीं मायाची व देराणी मल्याणीला ( डहाणू स्टेशनवर ) गेल्या. बरोबर जेठ्याला घेतला. तीन नवरीचीं सुडकीं दुकानदारानें दाखविलीं. पसंतीचा प्रश्नच नाहीं. ठराविक रंग, ठराविक पद्धतीचाच माल. लुगडीं, खणाच्या आयत्या तयार केलेल्या चोळया व एक धोतर इतकी खरेदी झाली. दुकानांतून बाहेर पडायच्या वेळीं जेठ्या घुटमळत राहिला.

लाजत लाजत आईला त्यानें सांगितलें, " मी व एक डगली व पाटलुन घियाचा. " ( मीसुद्धां एक बंडी व पाटलोण–तोकडी विजार–घेणार. )

एरव्हीं मायाचीनें त्याची मागणी धुडकावून लावली असती, पण आज तिनें त्याला ते कपडे घेण्याची परवानगी दिली.

कपडे घेऊन मायाची वगैरे मंडळी परत गांवीं येण्यास निघाली. वाटेंत जे जे लोक भेटले, त्यांनीं सर्वांनीं " मायाची, मल्याणीला क्यावर इधेल ?" (डहाणू स्टेशनवर कशाकरितां आली होतीस ?) असें विचारतांच मोठ्या अभिमानानें थांबून ती ज्याला त्याला जेठ्याच्या लग्नाची गोष्ट सांगत होती. एरव्हीं मायाची स्वभावतः अबोल, पण आज ती सर्वांशीं थांबून बोलत होती. इतकेंच नव्हे तर तिला असं वाटत होतं कीं, जेठ्याच्या लग्नाची हकिकत आपण जास्तींत जास्त लोकांना कळवावी.

मायाची आल्यावर तिला किरकोळ तयारीला दोन तीन दिवस मिळाले. त्यानंतर ज्या दिवशीं लग्नाची रीत सुरू होणार, तो दिवस उजाडला. त्या दिवशींच सकाळीं मायाचीच्या घरासमोर मांडव घालण्यांत आला. त्या दिवशींच संध्याकाळीं घराच्या भिंतीवर पीठ, हळद व कुंकू ह्यांच्या साह्यानें कांहीं तरी आकृति काढण्यांत आल्या. त्या रात्रीं आखी रात्र जागरण करण्यांत आलें, गाणीं बोलण्याचा कार्यक्रम झाला आणि निरनिराळे विधि करण्यांत आले. लग्न लावण्याचें काम एका बाईकडे असतें. तिला ' धवलेरी ' असें म्हणतात. तिला आणण्यांत आलें. ती सागेल त्याप्रमाणें सर्व लोक कामें करूं लागले. पांढरपेशांच्या लग्नांत भटजीला जें स्थान, तेंच वाल्यांच्या लग्नांत धवलेरीला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं वाजंत्री, काहली, ढोल, तिरबड्या घेऊन उंबराची डहाळी आणण्यांत आली. वाजंत्रीवाल्यांना पण खूप मान. आल्याबरोबर त्यांची पूजा करण्यांत आली. उंबराची फांदी वाजत गाजत आणून ती मांडवाजवळ ठेवून तिच्याजवळ बायकांनीं रांगोळ्या काढल्या.

रांगुळी, पीठ, हळद व कुंकू वापरण्यांत आलें. त्यानंतर नवऱ्याला बाशिंग बांधून झेंडूच्या व रुईच्या फुलांच्या मिंडोळया ( मुंडावळया ) बांधल्या. बाशिंगाला गहू, चुरमुरे व रुईचीं फुलें दोऱ्यानें ओंवून बांधलीं. ह्या पण मिंडोळयाच. त्यानंतर नवऱ्याला, नातेवाईक व ओळखीच्या लोकांनीं आहेर दिला. आहेराची रक्कम कमींत कमी चार आणे व जास्तींत जास्त पांच रुपये ( एवढी मोठी रक्कम क्वाचितच देण्यांत येते. ). आहेर देणाऱ्यानें नवऱ्याच्या हातांत तो द्यावयाचा व नंतर त्याला भेटावयाचें, असा रिवाज आहे.

ही सर्व रीत झाल्यावर आलेल्या पाहुण्यांना ' सूर ' ( ताडी ) देण्यांत आली. नंतर त्यांना जेवण पण देण्यांत आलें. जेवण साधेंच. उडदाची डाळ घरीं असल्यास तिचें ' आंबट '( आमटी ) नाहींतर नुसतें चिंचेच्या पाल्याचें आंबट व भात. हें जेवण झाल्यावर नवरीच्या गांवीं जाण्या-करितां सर्व लोक निघाले. ते नवरीच्या गांवीं गेल्यावर तिथें एका प्रशस्त झाडाखालीं त्यांनीं आपला मुक्काम ठेवला.

मायाचीबरोबर फारशी मंडळी नव्हती. तरी आजूबाजूचीं मिळून जवळजवळ पंचवीस माणसें तिच्याबरोबर होतीं. झाडाखालीं सर्व मंडळी बसल्यावर देराणी व तिचा नवरा मुलीच्याकडे वर्दी द्यायला गेलें. मुलीच्या दारांत पण मांडव घातला होता. तिथें जोरानें वाजंत्री वाजत होतीं. खरी लग्नाची गडबड मुलीच्याकडेच दिसत होती. ती सबंध रात्र नवरा व त्याच्याकडील मंडळी झाडाखालींच बसून राहिली. त्यांनीं आपल्या जेवणाचा बंदोबस्त स्वतःच करावयाचा होता. त्याप्रमाणें त्यांनीं केलाही.

नंतर दुसऱ्या दिवशीं नवऱ्याकडील मंडळीला नवरीच्या मांडवांत बोलावण्यांत आलें. नवरीच्या मांडवाजवळ आल्यावर आंत शिरतांना नवऱ्यानें मांडवाचा एक टोकर ( बांबू ) मोडून मग आंत जावयाचें हा रिवाज. नवरा मांडवापाशीं आल्यावर त्याच्याभोंवतीं 'लोथ्यांचा' ( वयांत

आलेल्या अविवाहित मुली ) गराडा पडला. त्या लोठ्या, नवऱ्याला टोकर मोडल्यावांचून मांडवांत येऊं देईनात.

जेठ्या या सर्व सोहळ्यांत उत्साहानें भाग घेत होता. लोठ्यांनीं ( तरुण अविवाहित मुली)त्याची मस्करी केली तरी तो लाजला नाहीं.टोकर मोडून तो आंत गेला. मग घरांतील उखळाजवळ त्याला नेण्यांत आलें. ( वार्ल्यांच्या घरांत उखळ घरांतील जमिनींत पुरलेलेंच असतें. ) तिथें गेल्यावर त्याचा व नवरीचा पदर बांधण्यांत आला. इतक्यांत धवलेरीनें मंत्र म्हणायला सुरवात केली. आतां वाजंत्रीं बंद करण्यांत आलीं. बायकांचीं गाणीं पण बंद झालीं. एक प्रकारचें गंभीर वातावरण निर्माण झालें. धवलेरी कांहीं पुटपुटत होती. मधून मधून ती देवाची विशेषत: नारायणदेवाचीं नांवें घेत होती. नवरा–नवरीनें एकमेकांचा हात धरलेला होता. इतक्यांत धवलेरीची बडबड बंद झाली. नवऱ्यानें नवरीच्या गळ्यांत रुईच्या फुलांची माळ टाकली. नवरीनें नंतर नवऱ्याच्या गळ्यांत तशीच माळ टाकली व ह्याप्रमाणें लग्न लागलें.

मग नवरा–नवरीला नाचविण्याच्या कार्यक्रमाला सुरुवात झाली. नवरीला कडेवर घेऊन व नवऱ्याला खांद्यावर घेऊन खूप नाचविण्यांत आलें. ह्यावेळीं नवऱ्यानें आपल्या सासूला एक सुडकें ( लुगडें ) व मेहुण्याला एक धोतर दिलें. त्यानंतर नवऱ्याकडील मंडळी घरांतून बाहेर पडायला निघाली. त्यांना नवरीकडील मंडळीनें अडविलें व त्यांच्याजवळ पैसे मागितले. (हा पण एक रिवाज त्यांच्यांत आहे. चार दोन पैसे व ताडी दिली कीं, त्यांची सुटका होते. ) हा कार्यक्रम होऊन नवरा उखळाजवळ परत आला. उखळाजवळ आल्यावर त्यानें डाव्या हातानें नवरीला उचललें व उजव्या हातानें उखळांत टाकलेलें भात कुटलें. उखळाच्या दोन्ही बाजूंला दोन सवाष्ण बाया उभ्या होत्या. नवऱ्यानें कुटलेलें तें भात नवरा–नवरीनें एक एक पसा त्या सवाष्णींच्या ओटींत घातलें. ह्याच वेळेला नवरीला काळी गळसरी ( पोत )

घालण्यांत आली. एथेंच मुलीला पदर देण्यांत आला.( लग्नाच्या पूर्वी वार्ली मुली कमरेभोंवतीं पदर गुंडाळतात. वार्लिणीचें लग्न झालें कीं नाहीं, तें तिच्या पदरावरून ओळखतां येतें. संस्कारपूर्ण लग्न झाल्याची खूण म्हणजे बाईच्या खांद्यावरून आलेला पदर. गळसरी घातल्यावर नवरी–मुलीला पदर देण्यांत येतो. )

हा विधि झाल्यावर नवरा–नवरी झोंपडीच्या दारांत कुडाजवळ ओबड धोबड रांगोळी काढलेली असते तिथें आलीं. तिथें कोंबडीचीं दोन साधारण मोठीं अशीं पिलें आणण्यांत आलीं. एका पिलावर नवरा बसला व दुसऱ्यावर नवरी बसली. हा प्रकार चालू असतांना लोठ्या व इतर बायका खूप गाणीं म्हणत होत्या. थोडा वेळ नवरा–नवरीला असें बसविल्यावर मग विडे देण्याच्या कार्यक्रमाला प्रारंभ झाला. ह्या विड्यांना मानाचे विडे म्हणतात. आंब्याचीं दोन पानें व वरतीं एक दिडकी ठेविली कीं, झाला विडा. पहिला विडा गांवच्या पाटलाला. लग्नांत पाटलाला खूप मान देण्यांत येतो. दुसरा विडा काठ्याला–गांवच्या महाराला ( वेसकराला )– ह्याप्रमाणें विडे वांटण्यांत आले. विडे वांटून झाल्यावर नवऱ्यानें हजर असलेल्या सर्व लोकांना ‘ रामराम ’ केले. लग्न न झालेल्या वाल्र्याला ‘ रामराम ’ म्हणण्याचा अधिकार नाहीं. आज जेठयाचें लग्न झालें. आजपासून त्याला सामाजिक दर्जा प्राप्त झाला. आतां उद्यां तो जर सावकाराकडे गेला, तर तो सावकाराला ‘ रामराम ’ म्हणणार.

ज्या कोंबडीच्या पिलावर नवरानवरी बसलीं होतीं, तीं पिलें आतां ठराविक मानकऱ्यांना मिळालीं. वार्ल्यांच्या लग्नांत प्रत्येकाचे मानपान सांभाळलेच पाहिजेत. जर का त्या बाबतींत थोडी आगळीक झाली, तर लग्न राहिलें लग्नाच्या ठिकाणीं व मारामारीला प्रारंभ. ह्या कोंबडीच्या पिलांचीसुद्धां अशी मानकऱ्यांमध्यें वांटणी करण्यांत येते. एक भाग पाटलाचा; दोन सवाष्णींचे दोन भाग; धवलेरीचा एक भाग व ‘ तुरें ’ (वाजंत्रीवाले) यांचा

एक भाग. ह्याप्रमाणें ते ते लोक आपआपले भाग वसूल करून घेतात. त्यानंतर ज्या गांवांत तें लग्न होतें, त्या गांवकऱ्यांना १२ सुके बोंबील द्यावे लागतात. गांवच्या पंचायतीचे लोक हा कर वसूल करून घेतात. बोंबील फार बारीक दिले नाहींत—वाजवी दिले आहेत—याची ते खात्री करून घेतात.

हे सर्व सोहाळे झाले व जमलेल्या लोकांना भरपूर ताडी वांटण्यांत आली. ताडी आधींपासून गोळा करण्यांत येते. ती दोन तीन दिवस एके ठिकाणीं राहिल्यामुळें चांगलीच आंबट होते. बायका, पोरें, पुरुष, सर्वजण ताडी पितात. कोणीही संकोच बाळगत नाहीं. ताडी वांटून झाल्यावर तिथून नवरीला घेऊन नवऱ्याकडील सर्व लोक बाहेर पडले. त्यांची जेवणाची व्यवस्था त्यांनीं स्वतःच करायची होती. त्याच रात्रीं नवरीला घेऊन नवऱ्याकडील सर्व मंडळी आपल्या गांवीं परत येण्यास निघाली. लग्नाच्या नेहमींच्या रीतीला अनुसरूनच जेठ्याच्या लग्नाचे सर्व सोहाळे झाले. मायाचीनें लग्नाच्या वेळीं स्वतः लक्ष पुरविलें व सबंध लग्नांत भांडणाचा एकही प्रसंग येऊं न देतां अगदीं शान्तपणें तें लग्न उरकण्यांत आलें. गांवकऱ्यांना बोंबील दिले, त्यावेळीं थोडी गडबड झाली. पण ती गडबड ताडी प्यालेल्या दोन्हां इसमांची होती. तिचा या व्यवहाराशीं कांहीं संबंध नव्हता. मायाची जायला निघाली, तेव्हां तिच्या सुनेची आई व बाप तिच्याजवळ येऊन बोलत उभे राहिले. तिची आईच बोलत होती. ती मायाचीला म्हणाली, " माझी पोरगी तशी कामाला बेस (चांगली) आहे. तुमच्या हारी ( बरोबर ) नीट रहल. तुम्ही तिला आतां सांभाला. आम्ही पोयरी ( पोरगी ) तुम्हांला दिघेल ( दिली. ) तुम्हांला ती पोयरी समजा. "

"तुम्ही बिलकूल धास ( धास्ति ) नको करूं. जशी माझी चैती तशी

तुमची पोयरी. आम्ही खाऊं तें तिला देऊं'' मायाची म्हणाली व अशाच प्रकारचें थोडें बोलणें झाल्यावर सुनेला घेऊन मायाची वगैरे मंडळी त्या सर्व मंडळींचा निरोप घेऊन आपल्या गांवीं—चिंचल्याला—जायला निघाली. नागझरी व चिंचलें यांत तीन चार मैलांचेंच काय तें अंतर असल्यामुळें ती मंडळी त्याच रात्रीं घरीं चिंचल्यास पोहोंचली व मायाचीच्या झोंपडींत नवी सून आली.

* * *

## : १५ :

मायाचीच्या सुनेचें माहेरचें नांव गिरजी. गिरजी असेल १६–१७ वर्षांची. चांगलीच उफाड्याची होती ती. तिचे डोळे तर फारच चांगले होते. इतरांच्या मानानें जराशी उजलीच ( गोरी ) होती ती. मायाचीला सून खूपच पसंत पडली. मायाचीनें तिचें नांव आपल्या आवडीप्रमाणें माणकी ठेविलें. जेठ्याला पण बायको फार आवडली. जेठ्याच्या नव्या संसाराला सुरुवात झाली. मायाची घर सांभाळूं लागली व माणकी जेठ्याबरोबर शेतांत कामाला जाऊं लागली. तीं दोघें शेतावर गेलीं कीं, त्यांना एकमेकांच्या संगतीचा भरपूर लाभ मिळत असे व दोघंही हंसत खिदळत आपलं काम करीत. जेठ्याचा धाकटा भाऊ रामा अजून घरकामांत लक्ष घालत नव्हता. तो शेतांत कामाला अद्यापि येऊं लागला नव्हता. त्यामुळें आजपर्यंत जेठ्या व मायाची, हींच दोघें शेतांत कामें करीत. आतां मायाचीची जागा माणकीनें घेतली व मायाची घरकाम बघण्यास घरींच राहूं लागली, हें वर आलेंच आहे.

आतां कुठें मायाचीला थोडी विश्रांति मिळूं लागली. मनपसंत सून घरांत आल्यामुळें खूप आनंदांत होती ती. पण इतक्यांत ह्या सर्व प्रसंगांना एकदम कलाटणी देणारी एक घटना घडून आली. ज्या सावकाराचे पैसे जेठ्यानें लग्नासाठीं काढले होते. त्या सावकाराला त्यानें पैसे काढतांना एक करार लिहून दिल्याचें वाचकांना आठवत असेलच. त्याच कराराची अंमलबजावणी करण्याकरितां तो सावकार आपल्या भय्याला घेऊन चिंचल्यास आला होता. सावकार लोक जंगलांत जातांना बरोबर एकादा कारकून, पठाण, भय्या घेऊन जातात. आल्याबरोबर सावकारानें जेठ्याला

बोलाविलें. त्याच्या लग्नाबाबत चार दोन मामुली प्रश्न त्याला विचारल्यावर त्यानें मुद्याला हात घातला. “ काय जेठया, पशे ( पैसे ) कसा भराचा ( भरणार ) तूं ? ”

हा अनपेक्षित प्रश्न ऐकून जेठया अगदीं गोंधळून गेला. लग्नाकरितां आपण दुसऱ्या कोणाचे पैसे आणले आहेत व ते आपणाला अमुक मुदतींत परत करावयाचे आहेत वगैरे गोष्टी त्याच्या स्मरणांतून अजिबात निघून गेल्या होत्या. माणकीच्या संगतीचा आनंद लुटण्यांत तो गढून गेला होता व हा आनंद मिळविण्याकरितां आपण आपली मान किती गुंतवून घेतली आहे, याची त्याला दाद पण नव्हती. जी नवरी मिळविण्यासाठीं तो इतका उत्सुक झाला होता, त्या नवरीपासून लग्नानंतर थोड्याच दिवसांनीं आपल्याला दूर रहावें लागणार आहे, याची त्याला जाणीव पण नव्हती. त्यामुळें सावकाराच्या प्रश्नाला काय उत्तर द्यावें हें त्याला कळेना.

जेठयाकडून लवकर उत्तर येत नाहीं, हें पाहून सावकार पुन्हा एकदां गर्जला—“ काय जेठया, काय विचारत आहें मी ? पशे कय दियाचा ? ( पैसे केव्हां देणार ? )

“ देऊं र देऊं. पळून थोडाच जायाचा मी ? तुझे पशे दिल्याबगर कसं चालेल ? देऊं हळूं हळूं. ” जेठया म्हणाला.

नंतर त्या सावकारानें देराणीच्या नवऱ्याला व मायाचीला बोलावून आणण्यास जेठयाला सांगितलें. तीं दोघें आल्यावर जेठयाच्या लग्नासाठीं आपण कोणत्या अटींवर पैसे दिले, याची त्या तिघांना सावकारानें जाणीव करून दिली. त्या अटींप्रमाणें जेठयानें लग्न झाल्यापासून दोन महिन्यांनीं तीन विसा ( ६० ) रुपये रोख द्यावयाचे व बाकीचे २४० रुपये दरवर्षीं ४० रुपये पगाराप्रमाणें ६ वर्षे सावकाराकडे नोकरी करून फेडायचे. जर सहा वर्षे नोकरी करण्यांत जेठया कोणत्याही

प्रकारचा चुकारपणा करील, तर जेठयानें सावकाराला पांचशें रुपये रोख द्यावयाचे. अशा त्या कराराच्या अटी होत्या. जेठ्याला पैसे घेण्याच्या वेळीं त्या अटी मान्य होत्या. सबब तो कागद सावकारानें सांगितल्याप्रमाणें त्यानें तयार करून दिला होता; पण त्या कागदाची अंमलबजावणी इतक्या लवकर व इतक्या कडकपणें होणार असेल, ह्याची मात्र त्याला मुळींच जाणीव नव्हती.

सावकारानें वाचून दाखविलेल्या त्या अटी मायाचीनें व देराणीच्या नवऱ्यानें ऐकल्या. त्या कागदाबद्दल त्यांना कांहींच सांगावयाचें नव्हतें. ऐन वेळीं सावकारानें आपल्याला पैशाची मदत केली व सावकाराच्या मदतीशिवाय आपल्या घरांत सून आली नसती, याची मायाचीला भरपूर जाणीव होती. म्हणून त्या अटींबाबत कोणताही विरोध न दाखवितां ती शांतपणें सावकाराला म्हणाली,"माझे घरांत कामाला माणसं नाय्, आतां कामाचे दिस ( दिवस ). आतां थोडे दिस तूं थांब. मी जेठयाला तुझ्या घरीं कामाला दवडायची" ( पाठविणार. )

सावकार तिच्या उत्तराचा शेवटचा भाग ऐकून खूष झाला. त्याची खात्री झाली कीं, आज नाहीं उद्यां जेठ्या आपल्या घरीं कामाला येणार. जेठयासारखा चांगला नोकर घरकामाला चोवीस तास मिळाला, तर आपला किती फायदा होईल याची त्याला पूर्ण जाणीव होती. म्हणून ठरलेला हा सौदा संयम बाळगून व बुद्धि वापरून शेवटपर्यंत यशस्वी रीतीनें पुरा करण्याचें त्यानें ठरविलें होतें. मायाचीच्या म्हणण्याप्रमाणें थोडें थांबण्यांत कांहीं गैर नाहीं, असें त्यानें ठरविलें. पण कोणताही सौदा इतक्या स्वस्तांत पटविण्याची त्याला संवय नव्हती. त्याचप्रमाणें डहाणूहून इतका दूर टांगा मारल्यानंतर हात हालवत परत जाण्याची त्याला संवय नव्हती. म्हणून त्यानें मायाचीबरोबर थोडा वेळ अधिक घासाघीस केली.

शेवटीं त्यानें तिच्या म्हणण्याप्रमाणें दोन महिन्यांनीं जेठ्याला नेण्याचें कबूल केलें. पण एक अट घातली कीं, तिनें त्याला कर्जापोटीं कांहीं रक्कम रोख द्यावी. हो ना करतां, मायाचीनें त्याला आपल्याजवळ शिल्लक असलेले 'एक विसा' ( २० रुपये ) द्यायचे कबूल केले. त्यानें ते रुपये तिच्या खातीं जमा न करितां तसेच गडप करायचें ठरविलें होतें. पण मायाचीनें म्हटल्या-वरून त्यानें ते रुपये जमा करण्याचें तिला कबूल केलें. त्या रात्रीं त्या साव-कारानें तिथेंच मुक्काम केला. मायाचीनें त्याला तांदूळ व एक 'वालुक' ( काकडी ) भाजीला दिली. आपल्यावरचें संकट कांहीं काळ तरी दूर गेलें, याची जाणिव होऊन जेठ्यानें सुटकेचा एक श्वास सोडला.

* * *

# : १६ :

जेठ्याची बायको येऊन कामांत मदत करूं लागल्यामुळें मायाचीला आतांशा थोडी फुरसद मिळूं लागली. ती आतां आपल्या वेळापैकीं थोडासा वेळ आपल्या मुलीला देऊं लागली. चैतीचे डोळे धुणें, त्यावर औषधोपचार करणें, तिचे केस नीट विंचरणें इत्यादि कामें ती आस्थापूर्वक करूं लागली. हीं कामें करीत असतां तिच्या डोक्यांत आपल्या मुलीबद्दल विचार एकसारखे येऊं लागले. आपल्या पश्चात् जेठ्या व त्याची बायको आपल्या मुलीचे हाल करतील, असें तिला राहून राहून वाटे. माणकी ( जेठ्याची बायको ) घरांत आल्यापासून तिच्या वागण्याकडे मायाची फार बारकाईनें पहात असे. ती चैतीशीं वागतांना कशी वागते, इकडे तिची सारखी नजर असे. माणकीशीं चैतीचा फारसा संबंध येत नसे. दिवसा माणकीचा सारा वेळ शेतावर जाई व घरीं असल्यावर ती मायाचीच्या हाताखालीं काम करीत असे; त्यामुळें माणकीला चैतीबरोबर बोलायला अथवा फिरायला फारच थोडा वाव मिळे. चैतीसुद्धां स्वतः होऊन तिच्याशीं बोलायला जात नसे. माणकी आल्यापासून ती एकदांसुद्धां चैतीशीं भांडली नव्हती किंवा तिच्याशीं बोलतांना तिचा आवाज कधींसुद्धां मोठा झाला नव्हता. हें जरी खरें असलें, तरी मायाचीला असें वाटत होतें कीं, आपल्या पश्चात् चैतीचे हाल होतील.

एक दिवस मायाची चैतीचे केस विंचरायला बसली असतां देराणी तिच्याकडे आली व तिला म्हणाली, "मायाची, चैतीला नवरा करायचा होवा तर एक पोरगा आहे." तिचें हें वाक्य ऐकून मायाचीला खूपच आश्चर्य वाटलें. चैतीचें लग्न सहजासहजीं जमेल, असें तिला

केव्हांच वाटलें नाहीं. चैतीचें लग्न केव्हांही जमणें शक्य नाहीं, ती जन्मभर आपल्याच घरीं रहाणार, अशी तिची मनोमय खात्री होती. त्यामुळें देराणीच्या ह्या अनपेक्षित प्रश्नानें ती क्षणमात्र गोंधळली व कांहींसुद्धां न बोलतां देराणीकडे पहातच राहिली. तिची ती शांतता पाहून देराणी म्हणाली, " पुंजाळ्याचा पाटील इथेल ( आला ) आहे. त्याच्या पोराचं तो बिजं लगीन कराया हेरत आहे. त्याच्या पोराच्या पहल्या बायकोला पोर होत नाहीं. तशी ती कामाला बेस ( चांगली ) आहे; पण तिला पोर होत नाहीं म्हणून पाटील बिजी सून कराया हेरं, तूं चैतीला देत होवीस, तंय तो कराया तयार आहे. "

मायाची एव्हांना पूर्ण भानावर आली होती. तिनें देराणीला काय उत्तर द्यावयाचें तें मनाशीं नीट ठरवून ठेविलें. देराणीचें बोलणें थांबतांच ती म्हणाली, "तुम्ही दोघं ठरवाल तें मला कबूल. मी काय सांगायची? जेठयाला वाहरून ( बोलावून ) घ्या व त्याला पण विचारा. " मायाचीच्या जवळ बसलेल्या चैतीकडे पाहून देराणीनें तिला विचारिलें, " काय चैती, नवरा कराची का तूं ?" त्यावर मायाची म्हणाली, " तिला काय विचारस ! आपण करूं तें तिच्या बऱ्यासाठींच करूं. " त्याप्रमाणें त्यांचें बोलणें झाल्यावर देराणीनें जेठयाला बोलावून घ्यावें व जेठया आल्याबरोबर नक्की काय तें ठरवावें असें त्या दोघींचें ठरलें.

ठरल्याप्रमाणें जेठया आला. त्याचें व त्याच्या आईचें चैतीच्या लग्नाबाबत बोलणें झालें. चैतीला दिसत नसल्यामुळें सासरीं तिचे हाल होतील अशी भीति जेठयानें प्रदर्शित केली. तेव्हां मायाची म्हणाली, " काम कराया पाटालाच्या बिज्या सुना आहेतच. " असें सांगून जेठयानें काढलेली शंका तिनें दूर केली. पाटलाचा आणि देराणी व तिच्या नवऱ्याचा फार चांगला परिचय असल्यामुळें चैतीचे सासरीं गेल्यावर हाल होणार नाहींत, अशी मायाचीनें जेठयाची खात्री करून दिली.

मायाचीनें खूप खूप विचार केला व शेवटीं चैतीचें लग्न ठरविणें सर्व दृष्टींनीं योग्य असें तिनें ठरविलें. वाल्यांमध्यें मुलीच्या लग्नासाठीं खर्च करावा लागत नाहीं. लग्न ही वार्ली समाजांत एक फार मोठी खर्चाची बाब आहे; पण हा खर्च मुलाचें लग्न करतांना करावा लागतो. मुलीला लग्नामध्यें भाव असतो. चांगली मुलगी पाहिजे असली, तर मोठा 'देज' (पैसे) द्यावा लागतो. त्यामुळें सर्व साधारण वार्ली लोकांना मुलाचें लग्न करतांना कर्ज काढावें लागतें व पुढें जन्मभर तें कर्ज फेडत रहावें लागतें. लग्न झाल्याशिवाय पुरुषांना सामाजिक दर्जा मिळत नाहीं. लग्न होईपर्यंत वार्ली पुरुषाला 'रामराम' म्हणण्याचा अधिकार मिळत नाहीं व वार्ली बायांना खांद्यावरून पदर घेतां येत नाहीं. लग्नाचा खर्च न करतां बायको करण्याचे दोन मार्ग आहेत. एक नवरीच्या घरीं 'घरोर' अथवा 'घरोऱ्या' (घरजांवई) जाणें. 'घरोर' होणें ही बाब वार्ली जात सर्व साधारण कमीपणाचें मानते. घरजांवई हा सासऱ्याच्या घरीं रहाण्यास जातो व तो जें जें कमावतो त्याच्यावर सासऱ्याचा हक्क रहातो. घरजांवई हा आपल्या सासऱ्याचा आश्रित बनतो. फारच अडचणींत असलेले आईबाप आपल्या मुलांना घरजांवई म्हणून पाठवितात. कारण मुलाला जर घरजांवई केला, तर त्याच्या मेहनतीनें मिळणाऱ्या उत्पन्नावर त्याच्या आईबापांचा मुळींच हक्क रहात नाहीं. शिवाय, मुलाला घरजांवई पाठविल्यावर भोंवतालचे लोक नाकें मुरडतात तीं निराळींच !

फार पैसे न खर्चतां नवरी आणण्याचा दुसरा एक मार्ग त्या समाजांत प्रचलित आहे. त्याला 'कोरड्यावर आणणें' असें म्हणतात. मुलीचे आईबाप सहसा या पद्धतीनें आपली मुलगी द्यायला तयार नसतात. ह्या प्रकारामुळें लग्नाचे पूर्ण विधि व पुरा खर्च न करितां कांहीं मामुली संस्कार करून नवरा नवरीला लग्न न करितां घेऊन जातो. त्या मुलीबरोबर तो वैवाहिक जीवन जगतो व पुढें त्याला जेव्हां पैसे मिळतात, तेव्हां तो

यथाविधि आपलें लग्न करून घेतो. हें लग्न अमुक एका मुदतींत झालें पाहिजे, असा निर्बंध नसल्यामुळें तें सावकाशीनें केव्हांही करितां येतें. त्यामुळें पुष्कळदां आपल्या आईबापांच्या लग्नाला हजर रहाण्याची त्यांच्या एक दोन मुलांना संधि मिळते. म्हणजे 'कोरड्यावर' बायको आणून तिला दोन तीन मुलें झाल्यावरसुद्धां त्या मुलीचें लग्न केलें जातें. लग्न हें उशीरां कां होईना, झालें मात्र पाहिजे. त्याशिवाय त्या जोडप्याला सामाजिक दर्जा प्राप्त होत नाहीं. साधारणपणें मुली ह्या मार्गानें लग्न करून घ्यायला तयार होत नाहींत. आपल्या मुलींना 'कोरड्यावर' पाठविणें आईबापांनाही कमीपणाचें वाटतें. परंतु एकादी मुलगी दिसायला बरी नसली किंवा तिचे आईबाप अडचणींत असले, तर ह्या प्रद्धतीनें मुलीचें लग्न लावण्यास ते तयार होतात.

चैतीला जी मागणी आली होती, ती मागणी घालतांना पाटलानें ही बाब अगदीं स्पष्ट केली होती. त्याला मुलासाठीं एक मुलगी पाहिजे होती. पण त्या मुलाच्या पहिल्या लग्नाच्या वेळीं पाटलानें खूप खर्च केला होता. त्यामुळें त्या मुलाकरितां दुसरी बायको शक्य तों स्वस्तांत आणण्याची त्याची इच्छा होती. म्हणून चैतीसाठीं त्यानें ज्या वेळीं मागणी घातली, त्या वेळीं आपण चैतीला 'कोरड्यावर' न्यायला तयार आहोंत. लग्न करून घेतल्याशिवाय जर चैतीची आई चैतीला द्यायला तयार नसेल, तर मात्र हा व्यवहार होणें शक्य नाहीं असें त्यानें देराणीला व तिच्या नवऱ्याला स्पष्टपणें बजावून सांगितलें होतें. मायाचीला हीच बाब नेमकी अगदीं अप्रिय वाटत होती. त्या गांवांत मायाचीला एक प्रकारचें मानाचें स्थान होतें. त्यामुळें आपण आपल्या एकुलत्या एक मुलीचें लग्न ह्या रीतीनें करावें कीं नाहीं, या बाबतींत तिनें खूप विचार केला व देराणीचा सल्ला घेऊन अखेर तिनें आपला होकार पाटलाला कळाविला.

मग चार दोन दिवसांच्या आंतच विशेष गाजावाजा न होतां चैतीला तिच्या सासरच्या लोकांबरोबर पाठविण्यांत आलें. चैती जाईपर्यंत मायाचीनें आपलें मन खूपच घट्ट केलें होतें. पण चैतीचीं पाउलें घराबाहेर पडल्यावर आवरून धरलेल्या मायाचीच्या अश्रूंनीं सर्व बंध तोडले व ती खूप खूप रडली. त्या रात्रीं एकच विचार सारखा तिच्या डोक्यांत नाचत होता— "माझ्या चैतीला सासरीं सुख मिळेल का ?"

* * *

## : १७ :

चैतीचें लग्न झालें. जेठ्याची बायको घरकामांत मदत करूं लागली. मायाचीला आतां थोडी फुरसद मिळूं लागली. तिची काळजी बरीचशी दूर झाली होती. जेठ्या मजेंत होता. जेठ्याची बायको पण खुषींत होती. त्या दोघांना सुखासमाधानांत रहातांना पाहून मायाची पण आनंदांत दिवस काढत होती; पण दैवाला त्यांचं सुख पहावेना !

एके दिवशीं मायाची आपल्या दारांत बसून आंबाडीच्या वाकाचा दोर बनवीत होती. इतक्यांत बैलाच्या गळ्यांतील धुंगुर वाजूं लागले. ह्या वेळीं कुणाची गाडी आली हें पहाण्यासाठीं मायाची उठून उभी राहिली व दुरून दिसणारी ती गाडी तिनें पटकन् ओळखली. आपल्या सावकाराची गाडी आज कां बरें आली असेल, याचा ती विचार करूं लागली. इतक्यांत ती गाडी तिच्यासमोर येऊन उभी राहिली. त्या गाडींतून सावकाराचा मुनीम उतरला. मायाचीनें त्याला पाहिल्यावर ती झटकन् आंत गेली व आंतून एक चटई व तांब्याभर पाणी घेऊन ती बाहेर आली. तिनें चटई पसरली व पाण्याचा तांब्या ठेवून शेजारच्या एका मुलाला हांक मारून जेठ्याला बोलावण्यास सांगितलें. मग जेठ्या आतां येईल असें सांगून, ती आपल्या झोपडींत शिरली.

थोड्याच वेळांत जेठया आला. त्याचें व सावकाराच्या मुनिमाचें बोलणें सुरू झालें. सावकाराचा मुनीम आल्याचें कळल्यामुळें एकामागून एक सावकाराचीं कुळें हळू हळू जेठयाच्या झोंपडीकडे येऊं लागलीं. पहिल्यानें देराणीचा नवरा आला. त्याला पाहिल्यावर तो मुनीम म्हणाला,

" काय रं,जेठयाच्या लग्नाला पांचशें काढेल ते कंई ( केव्हां ) भरायचे ? तूं तर जामीन ! तुला पहली खबर होवी."

त्यानें कांहीं न बोलतां जेठयाकडे नजर वळविली. जेठया मान खालीं घालून बसला होता. नंतर त्या कारकुनानें आपली पिशवी उघडली व ज्या कागदामध्यें त्यानें जेठयाला दिलेल्या पैशाबाबतचा करार लिहिला होता, तो कागद बाहेर काढला. तो उघडून त्यांतील हकीकत तो जेठयाला वाचून दाखवूं लागला. जेठयानें ठराविक मुदतींत उचल केलेल्या पैशाची फेड न केली, तर त्यानें सावकाराच्या घरीं काम करण्याकरितां गडी म्हणून रहाण्याचें कबूल केलें होतें. करारा प्रमाणें पैशाची आजतागायत फेड न झाल्यामुळें, जेठयाला सावकाराकडे काम करण्यासाठीं नेण्यास तो मुनीम आला होता, ही गोष्ट आतां त्यानें जाहीर केली व जेठयाला त्याच्यावर ओढवलेल्या संकटाची पूर्णपणें जाणीव झाली.

वार्ली लोक लग्नाच्या वेळीं कर्ज काढतांना सावकारांनीं घातलेल्या सर्व अटी पाळून कर्ज काढण्यास तयार होतात व लग्नाच्या वेळीं आपली जी मान अडकवून घेतात, ती सोडविणें पुढें कित्येक वर्षें त्यांना जमत नाहीं. लग्नासाठीं कर्ज काढावयाचे व तें फेडण्यासाठीं पाच दहा वर्षे सावकाराच्या घरीं राबावयाचें, ह्यांत सर्व साधारण वार्ल्यांना कांहींच चमत्कारिक वाटत नसतें. हा व्यवहार त्यांच्या अगदीं आंगवळणीं पडलेला असतो. मोठ्या आशेनें आणि आनंदानें कर्ज काढून वार्ली लग्न करितात व त्या लग्नांत काढलेल्या कर्जाची परतफेड करण्यासाठीं, त्या बायकोला सोडून दूरगांवीं रहाणाऱ्या सावकाराच्या घरीं चोवीस तास राबत रहातात.

वर्षाचे ३६५ दिवस व दिवसाचे २४ तास हा घरगडी सावकाराकडे रहातो. सावकाराची मेहेरबानी झाली, तर सणावारीं घरीं जायला त्याला परवानगी मिळते. अशी सहजासहजीं परवानगी न मिळाली, तर तो पोटांत दुखतें म्हणून आजारी पडल्याचें ढोंग करून दोन तीन दिवस

अन्नाला शिवत नाहीं व मग घरांतील बायकांच्या मध्यस्थीनें भगताला दाणे दाखवायच्या निमित्तानें तो चार दिवस आपली सुटका करून घेत असतो. एरव्हीं सावकाराच्या घरीं राबून आपल्या संसाराचीं चित्रें स्वप्नांत पाहूनच तो आपला वेळ घालवीत असतो.

जेठ्याला तो कागद वाचून दाखविण्यांत आला, तेव्हां आपल्या-पुढें आतां कसलें ताट वाढून ठेवलें आहे याची त्याला जाणीव झाली. तो तिथून उठला व त्यानें आपल्या आईस हांक मारली. मायाची तेथें आली व तिला पहातांच कारकुनानें सांगितलें कीं, जेठ्याच्या लग्नाच्या वेळीं काढ-लेल्या पैशाची परतफेड जेठ्यानें नोकरी करून करण्याचें कबूल केलें आहे; त्याप्रमाणें जेठ्याला नेण्याकरितां मीं आलों आहें व उद्यां सकाळीं सावकारानें जेठ्याला घेऊन येण्यास मला सांगितलें आहे. सबब जेठ्याला माझ्याबरोबर उद्यां पाठव. जेठ्या जर उद्यां माझ्याबरोबर न आला तर सावकार स्वतः फौजदाराला घेऊन येणार आहे, वगैरे गोष्टी त्यानें पटापट तिला सुनावल्या.

मायाचीनें पाहिलें कीं, जेठ्याला सावकाराकडे गेल्यावांचून गत्यंतर नाहीं. ती त्याला म्हणाली, "जेठ्या कामाला इयाला तयार आहे, पण जरा दोन दिस शेतांत काम आहे तें आपोटलं ( आटोपलें ) मगां तो येईल." नंतर ती त्या मुनिमाला म्हणाली कीं, जेठ्या जर गेला तर आपलं शेत 'ओस' पडेल. आपल्या धाकट्या मुलाचं कामांत लक्ष नाहीं, तो घरीं नसतोच. एकटा जेठ्या काय तो पुरुष माणूस, तो गेला तर दोन बायांना शेतीचें काम कसें जमणार ?

तेव्हां जेठ्या जरी सावकाराकडे कामाला गेला, तरी सावकारानें शेतीचा ज्या वेळीं ' मोसम येईल, त्यावेळीं त्याला थोडे दिवस घरीं पाठ-वावा. तो जर न आला तर शेतीचें काम बिघडेल व सावकाराला खंड भरणें कठीण होईल. मायाची इतर वार्ली बायांच्या मानानें खूप हुषार होती व तिनें मुद्देसूद बोलून त्या मुनिमाला आपलें म्हणणें पटवून

दिलें. त्यानेंही जेठ्याला वर्षांतून दोन तीन महिने शेतीच्या कामासाठीं घरीं पाठविण्याचें कबूल केलें. कारण त्याला हें पटलें होतें कीं, जर जेठ्या शेतावर खपला नाहीं, तर शेत ' ओस ' जाईल व खंडाला आपणास मुकावें लागेल. त्यानें तिच्या म्हणण्याप्रमाणें जेठ्याला शेतावरचें काम आटोपण्यासाठीं दोनचार दिवसांची मुदत पण देण्याचें कबूल केलें. मात्र कबूल केल्याप्रमाणें जेठ्या जर न आला, तर पोलीसला आणून जेठ्याला ठाण्याच्या जेलांत खडी फोडायला पाठविण्याची त्यानें धमकी दिली. जेठ्या ठरविल्याप्रमाणें नक्की कामावर येईल, अशी खात्री मायाचीनें, जेठ्यानें व देराणीच्या नवऱ्यानें दिल्यावर तो कारकून तिथून निघाला व शेजारच्या खेड्यावर कामासाठीं निघून गेला.

* * *

## : १८ :

चैती गेल्यापासून मायाचीला तिची हकीकत कळली नव्हती; म्हणून ती जेठ्याच्या मागें लागली कीं, 'तूं तरी जाऊन तिला एकदां बघून ये' पण जेठ्या घरचें काम टाकून जाऊं शकत नव्हता. त्याच्या शेतांत खपणारीं माणसें फक्त दोन. तो व त्याची बायको. आतां मायाची फारसें शेताकडे लक्ष देत नव्हती. बसल्या बसल्या ती घरकाम तेवढें पहात असे. तिचा धाकटा मुलगा चांगला मोठा झाला होता; धडधाकट होता; पण तो शेताकडे ढुंकूनसुद्धां पहात नसे. तो फारसा घरीं नसेच. कुठें तरी शेजारच्या गांवीं तो नोकरी करीत असे. तो तोडीवर ( जंगल कापणी ) 'खटपट्या' असे किंवा मुकादमाचें काम करी व स्वतःचें पोट स्वतः भरी. तो घरीं पैसे देत नसे. तसेंच घरून पण पैसे मागत नसे. कधीं घरीं आला तर मात्र तो चार दोन रुपये खर्च करी, पण घरच्या कोणत्याही गोष्टींत तो लक्ष घालीत नसे अथवा कसलीही विचारपूस करीत नसे.

त्यामुळें चैतीची विचारपूस करण्याकरितां जेठ्याला जाणें भाग पडलें. कामाचे दिवस संपत आले होते; इतक्यांत एके दिवशीं मायाचीनें खूप तगादा लावल्यामुळें, जेठ्या सकाळींच उठून चैतीच्या गांवीं जाण्यास निघाला. रस्त्याला खाण्यासाठीं त्यानें भाकर बांधून घेतली व चैतीला भेट म्हणून दोन मुठी चवळ्या व एक 'वाळुक' ( मोठी काकडी ) त्यानें बरोबर घेतली. रस्त्यानें जात असतां त्याला वाटेंत एका ठिकाणीं मुक्काम करावा लागला. त्या ठिकाणीं त्याची कांहीं गाडीवाल्यांशीं गांठ पडली. ज्या गांवांत चैती दिली, त्या गांवचेच ते गाडीवाले असल्याचें बोलतां बोलतां त्याला कळलें. त्यांना चैतीबद्दलची माहिती त्यानें विचारली

तेव्हां त्याला कळून आलें कीं, चैतीला तिच्या सासरच्या मंडळीकडून खूप त्रास होतो.

ती बातमी ऐकून तो फार अस्वस्थ झाला. आपण गेल्यावर चैतीला भेटून सर्व तपास करूं. जर तिला खरोखर त्रास होत असला, तर तिला बरोबर घेऊन जाऊं व इतःपर आपल्या घरींच तिला ठेवूं, असा त्यानें विचार केला.

चैतीच्या घरीं पोहोंचल्यावर पाटलानें त्याचें नीट आगत स्वागत केलें. त्यानें चैतीला पण हाक मारली व तिला पहातांच रस्त्यांत गाडीवाल्यानें सांगितलेली बातमी खरी असावी असा त्याला संशय आला. पण तिच्या सासरच्या मंडळीसमोर तिला उघडपणें विचारण्याचें त्याला धैर्य झालें नाहीं. त्यानें तिच्या सासऱ्याजवळ तिला चार दिवस माहेरीं पाठविण्या-बद्दल विनंति केली. खूपच आढेवेढे घेतल्यावर चैतीला माहेरीं पाठविण्यास तो कबूल झाला.

जेठ्या चैतीला घेऊन मोठ्या उत्साहानें घरीं आला. घरीं आल्यावर त्यानें आपल्या आईला वाटेंत ऐकलेली सर्व हकीकत सांगितली. ती हकीकत ऐकत असतां मायाचीला एकदम रडूं कोसळलें. आपल्या आईला रडतांना पाहून जेठ्याचे पण डोळे भरून आले.

तो तिला म्हणाला, " आया, तूं धास ( धास्ती ) नको करूं. आतां मी चैतीला अथच ( इथेंच ) ठेवाचा. आतां कोण तिला तथ ( तिथें ) धाडाया बशेल ? " ( पाठवायला बसला आहे. ) जेठ्याच्या या उत्तरानें मायाचीचें समाधान झालें.

पण जेठ्याला जरी आपली बहीण हवी असली, तरी त्याच्या बायकोला चैतीचें तिथें येणें आवडत नसल्याचें हळू हळू धूर्त व चाणाक्ष असलेल्या मायाचीला दिसून येऊं लागलें. कांहींतरी कारण काढून जेठ्याची बायको

थोडासा आरडाओरडा करी व दर वेळीं बोलतांना, घरांत सर्वजण बसून आरामांत खातात, आपणाला व आपल्या नवऱ्याला मात्र खूप काम करावें लागतें, अशी तिची सारखी तक्रार चाले. नवऱ्याच्या नात्याची मंडळी घरीं आलेली पांढरपेशा बायकांना जशी आवडत नाहींत त्याप्रमाणेंच आदिवासी बायांनासुद्धां सासरचीं माणसें फारशीं आवडत नाहींत.

आपली सूनबाई आपल्या मुलीच्या येण्यामुळें अशी आदळ आपट करते, ही गोष्ट मायाचीच्या लक्षांत आल्यावर, तिला एक निराळीच काळजी वाटूं लागली. आपल्या पश्चात् चैतीचे खूप हाल होणार, हें तिला स्पष्ट दिसूं लागलें. एक तर ती डोळयानें खूप अधू, सासरीं तिला खूप जाच आणि माहेरीं पण सुख लाभण्याची आशा नाहीं. कारण जेठयाच्या बायकोला तिचें माहेरीं येणें आवडत नव्हतें. असा माहेरीं पण सर्व अंधार. आज आपण असल्यामुळें जेठया तितकासा बायकोच्या मुठींत गेलेला नाहीं. पण उद्यां आपल्या मागें तो पूर्ण बायकोच्याच तंत्रानें चालणार व तसें झालें म्हणजे चैतीला तो पुरा विसरणार ! धाकट्या मुलाची तर गोष्टच बोलायला नको. एक नंबरचा उडाणटप्पू तो. त्याला नाहीं आईचें प्रेम, नाहीं भावाबहिणीचें प्रेम ! अशा प्रकारें विचार करीत मायाची बसली कीं, रात्रभर तिला झोंप लागत नसे.

चैतीला आपल्या असहाय परिस्थितीची पूर्ण जाणीव होती. सर्व त्रास ती शांतपणें सहन करीत होती. एकादे वेळीं कांहीं कारणामुळें मायाची सुनेला कांहीं बोलली, तर चैती वहिनीची बाजू घेऊन आईलाच चूप बसवीत असे. ती आपल्या वहिनीबद्दल चुकूनसुद्धां एकही वाईट शब्द काढीत नसे. आपल्या नशिबांत सुख मुळींच नाहीं, अशी जणूं तिनें आपल्या मनाची पूर्ण खात्री करून घेतली व येणाऱ्या आपत्तींना अगदीं शांतपणें तोंड देण्याची आपल्या मनाची पूर्ण तयारी केली. त्यामुळें तिची वहिनी जरी रागावली, तरी ती तिच्या तोंडाला तोंड देत नसे व

कधीं बायकोची बडबड ऐकून जेठया जर बायकोवरच ओरडला, तर चैती जेठयालाच चूप बसवी.

ह्याप्रमाणें दिवस जात होते. परंतु एके दिवशीं चैतीचा सासरा त्यांच्याकडे आला व त्यांच्या रोजच्या वातावरणांत एकदम बदल झाला. तो चैतीला नेण्यासाठीं आला होता. प्रारंभीं जेठ्यानें मनाशीं ठरवून ठेविलें होतें कीं, कांहीं झालें तरी चैतीला पुन्हा सासरच्या लोकांकडे पाठवायचें नाहीं. पण तो त्याचा निश्चय हळूहळू वितळूं लागला होता. त्याच्या बायकोचें चैतीशीं वागणें पाहून म्हणा अथवा तिच्याकडून वरचेवर टोचणी मिळाल्यामुळें म्हणा, चैतीला सासरीं न पाठविण्याचा त्याचा निश्चय आतां तितकासा भक्कम राहिला नव्हता. जेवणें आटोपल्यावर रात्रींच्या वेळीं मंडळी जमल्यावर जेठ्यानें चैतीला तूर्त कांहीं दिवस पाठविण्यास आपण तयार नसल्याचें सांगितलें. तेव्हां तिचा सासरा म्हणाला कीं, जर ती आतां येत असेल तर मी नेईन; नाहींतर पुन्हा तिचें तोंड पण मी पहाणार नाहीं.

हे त्याचे शब्द ऐकल्यावर आंतून चैती शांतपणें म्हणाली, "मी तुमच्या हारी ( बरोबर ) इया ( यायला ) तयार आहें." मायाचीनें पण चैतीच्या जाण्याला पुष्टि दिली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं चैती सासऱ्याबरोबर जाण्यास निघाली. तेव्हां डोळ्यांत आसूं आणून मायाचीनें तिला विचारिलें, "आता कई इयाची ?" ( केव्हां येणार ? )

'देव आणील तंय्' ( तेव्हां ) गंभीरपणें चैती म्हणाली व सासऱ्याबरोबर चालूं लागली.

* * *

## : १९ :

ठरल्याप्रमाणें शेताचें काम आटोपल्यावर जेठ्याला नेण्यासाठीं सावकाराचा भय्या एके दिवशीं आला. तेव्हां जेठ्याला त्याच्याबरोबर शेठच्या घरीं जाणें भाग पडलें. शहरांत सावकाराच्या घरीं गेलेल्या जेठ्याला निरनिराळ्या प्रकारचीं कामें करावीं लागत. सकाळीं सावकाराची मंडळी उठण्याच्या आंत त्यांच्याकरितां पाणी तापवून ठेवायचें, नंतर गुरांचा गोठा साफ करायचा, मग म्हशीचें दूध काढायचें; आणि हीं कामें आटोपल्यावर एक मैल लांब असलेल्या विहिरीवरून पिण्याच्या पाण्याच्या एक दोन खेपा आणायच्या, नंतर भांडीं घासायचीं इत्यादि कामांचें रहाटगाडगें रात्रीं १०–११ वाजेपर्यंत चालत असावयाचें.

दिवसामागून दिवस जात होते व ह्या कामाची जेठ्याला संवय होत होती. शहरांत आल्यापासून त्याच्यामध्यें अंतर्बाह्य फेरबदल होऊं लागला. आतां तो एक अर्धी विजार व एक शर्ट घालून फिरत असे. कांहीं दिवसांनीं थोडे पैसे हातीं आल्यावर त्यानें एक लाल रंगाचा रुमाल, एक फणी व दोनचार पांढऱ्या रंगाच्या पिना ( क्लिप्स् नेकटायला लावण्याच्या असतात त्या ) विकत घेतल्या होत्या. रात्रीं कधीं मधीं तो शेजारच्या इतर बंड्यांबरोबर ( तरुणांबरोबर ) ‘ नक्कल ’ ( सिनेमा ) पहायला जाऊं लागला होता. अशा प्रकारें त्याचें आयुष्य चाललें असतां, मध्येंच एकाद्या दिवशीं तो अगदीं बेचैन होत असे. त्या वेळीं त्याचें कामाकडे पूर्ण दुर्लक्ष होत असे. सावकाराकडील माणसांनीं खूप शिव्या दिल्या, तरी त्याचें कामाकडे लक्ष लागत नसे. त्याला घरीं जाण्याची ओढ लागे. मग कांहीं तरी निमित्त शोधून तो घरीं पळे. एकदां घरीं गेला

कीं, त्याची माणकी त्याला सोडत नसे. माणकीच्या सहवासांत जितका अधिक वेळ घालवायला मिळेल, तितका घालविण्यासाठीं तो उत्सुक असे. पण सावकाराला केलेला वायदा व तो चुकला तर मिळणारा मार, यांची आठवण व भीतित्याच्या डोळ्यांसमोर उभी रहात असे. तरीसुद्धां माणकीला सोडून जाणें त्याच्या अगदीं जिवावर येई. व त्यामुळें ठरविल्यापेक्षां एक दोन दिवस त्याचें अधिक रहाणें होईच.

वाल्यांचें वैवाहिक जिणें मोठें चमत्कारिक असतें. खूप हौसेनें ते लग्न करतात. लग्नाचा खर्च केव्हांही वाल्यांना झेपत नाहीं. लग्न म्हटलें कीं, कर्जाचा बोजा डोक्यावर आलाच. कर्ज काढून लग्न करावयाचें व इतक्या हौसेनें आणलेली बायको दूर ठेवून काढलेलें कर्ज फेडण्यासाठीं सावकाराच्या दारांत दिवस काढायचे. ह्या नियमाला जेळ्या कुठून अपवाद रहाणार ? त्यानें पण सावकाराकडून कर्ज काढलें होतें व माणकीच्या सहवासाची त्याला ओढ लागली असतांना सुद्धां, सावकाराचें कर्ज फेडण्यासाठीं, माणकीला सोडून त्याला दूर रहाणें भाग पडत होतेंच.

दिवसामागून दिवस चालले होते. सावकाराच्या घरच्या कामाचा रहाट–गाडगा उपसण्यांत जेळ्या गुंतला होता. कामाच्या गर्दीमुळें त्याला माणकीची आठवण आली, तरी तिच्याबद्दल फारसा विचार करायला त्याला वेळ मिळत नसे. पण त्याच्यापेक्षां माणकीचा वेळ मात्र निराळ्या रीतीनें चालला होता. माणकीला दिवसां शेतांत काम करावें लागे व शिवाय घरचें पण तीच पहात असे. जेळ्याचा भाऊ रामा केव्हां तरी घरीं येई व एक दोन दिवस राहून तो परत जाई. मायाचीबरोबर फारसें बोलत बसणें माणकीला जमत नव्हतें. मायाचीच्या स्वभावाशीं तिचा स्वभाव जमत नसे. मायाची पण संसार आतां आपला राहिला नाहीं, तो माणकीचाच आहे; ह्या भावनेनें वागत असल्यामुळें तीसुद्धां घरकामांत फारसें लक्ष घालीत नसे. पुढें येईल तेवढें काम करावें, परसांत भाजीपाला लावण्याचा प्रयत्न

करावा, रिकामा वेळ असला तर जंगलांतून कांहीं काटक्या, लांकडें आपल्या संसारासाठीं गोळा करावींत व देराणी आली तर तिच्याजवळ बसून दोन गोष्टी बोलाव्यात हा तिचा कार्यक्रम बनला होता. एका घरांत माणकी व ती रहात असली तरी माणकीजवळ गप्पा गोष्टी बोलत बसण्याचें तिला जमत नव्हतें. माणकीला पण तें जमत नव्हतें. त्यामुळें जेठ्या गेल्यापासून त्या दोघींच्या आयुष्यांत एक प्रकारची पोकळी निर्माण झाली होती. त्या दोघींना हल्लीं कामाचे दिवस नसल्यामुळें थोडी फुरसद मिळे. पण ह्या फुरसदीच्या वेळांत दोघींना उदास वाटत असे. देराणी घरीं आली व मायाचीबरोबर बोलत बसली कीं, माणकी त्यांच्या गोष्टी ऐकत बसे; पण सुनेची मर्यादा सांभाळून ती त्यांच्या संभाषणांत फारसा भाग घेऊं शकत नसे.

आतां अखेरीचे ( उन्हाळ्याचे–वर्ष संपल्याचे ) दिवस आले होते. ह्या दिवसांत घरचे दाणे संपत आल्यामुळें व कांहीं तरी हालचाल केल्यावांचून पोट भरणें शक्य नसल्यामुळें कांहीं तरी धडपड प्रत्येक वाल्याला करावीच लागे. सकाळीं उठून जंगलांत जाऊन लांकडाचे एक दोन भारे गोळा करावे लागत. वार्ली लोकांना ते जंगलासंबधींचीं कांहीं कामें करीत असल्या-मुळें, जंगलांतील ‘ डोईभार ’ ( डोक्यावर नेतां येतील इतकीं ) इजायली ( रायवळ, हलक्या प्रतीचीं जळणाला उपयोगी पडतील अशीं ) लांकडें नेण्याची परवानगी असते. त्याप्रमाणें लांकडाच्या मोळ्या बांधून वार्लिणी १० ते १५ मैल अंतर चालून ह्या मोळ्या विकायला नेतात. त्या मोळ्या विकून, आलेल्या पैशांतून तंबाखू व इतर कांहीं जीवनोपयोगी वस्तु घेऊन त्या परत जातात.

माणकी पण आतां मधून मधून इतर बायांच्या बरोबर लांकडांच्या मोळ्या घेऊन डहाणूला त्या विकण्यासाठीं येई. ती ज्या वेळीं शहरांत येई, त्या वेळीं जेठ्याला भेटण्याचा प्रयत्न करी; पण जेठ्या हमखास तिला भेटेलच अशी खात्री नसे.कारण,मोळ्या विकणाऱ्या बायका सकाळीं

शहरांत येतां येईल अशा बेतानें आपल्या गांवांतून निघत. सकाळच्या वेळीं मोळी विकली गेली तर भाव बरा येई. दुपारीं तीच मोळी आणा दोन आणे कमी किंमतीस विकावी लागे. पण मोळी विकायला ज्या वेळीं ती येई, तीच वेळ जेठयाची फार कामाची असे; म्हणून इतक्या लांबून आलेल्या आपल्या बायकोजवळ बसून दोन सुखदुःखाचे बोल बोलायला त्याला फुरसद मिळत नसे. इच्छा असूनसुद्धां आपल्या बायकोजवळ खुशालीचे चार शब्द बोलायला त्याला सवडच नसे. सावकाराच्या घरीं जाऊन जेठयाची भेट घेणें तिला शक्य नसे. कारण, सकाळच्या कामाच्या वेळीं जर तो गोष्टी बोलत बसला, तर पाठींत लाथच बसायची त्याच्या. माणकी त्याची नेहमीं भेट घेत असे, ती त्या गांवांतील एका विहिरीवर. ही विहीर गांवांतील मुन्सफकोर्टाच्या आवारांत होती. शहरांतील सर्व सावकारांचे घरगडी एथें पाणी भरण्याच्या निमित्तानें एके ठिकाणीं येऊन गप्पा मारीत बसत. ह्या विहिरीवर झालेल्या जेठयाच्या भेटीनें माणकीला खरेंखुरें समाधान मात्र होत नसे व त्याला भेटून जेव्हां ती परत जाई तेव्हां तर अधिकच बेचैन होत असे.

पावसाळ्यांत जेठया दोन महिने शेताचें काम करण्यासाठीं घरीं आला. ह्या खेपेला माणकीनें त्याला घरीं रहाण्यासाठीं खूप आग्रह केला. जेठयाला पण सावकाराकडे रहाणें आवडत नव्हतें. त्याला तिचें म्हणणें पटत होतें; पण सावकाराचें कर्ज फेडण्याची व्यवस्था कशी करावी, तें त्याला सुचत नव्हतें. त्यानें माणकीच्या म्हणण्याप्रमाणें वागावयाचें ठरविलें व सावकाराच्या पाशांतून सुटका कशी करवून घ्यावी याचा तो दिवसेंदिवस विचार करूं लागला.

पण त्याला ह्या कोंडींतून सुटण्याचा मार्ग मिळाला नाहीं. सावकारानें दिलेली रजा संपली व एके दिवशीं पुन्हा सावकाराचा भय्या जेठयाला नेण्यासाठीं दारांत आला. मोठया मिनतवारीनें दोन दिवसांनीं मागाहून

येण्याचें कबूल करून जेठ्यानें त्याला वाटेला लावलें. ह्या खेपेला माणकीच्या डोक्यांत काय आलें होतें कुणास कळे! त्या रात्रीं जेठ्यानें जाण्याची गोष्ट काढल्यावर ती त्याच्यावर खूप संतापली. सावकाराचे पैसे फेडल्याशिवाय गत्यंतर नाहीं, हें जेठ्यानें तिला निरनिराळ्या रीतीनें पटविण्याचा प्रयत्न केला; पण तिचें आपलें एक पालुपद, "मी तुला जाऊन दियाची नाय्"

आज जेठ्या मोठ्या पेचांत पडला. माणकीला जसा तो हवा होता, तशी त्याला पण माणकी हवी होती. गेले ६०–६५ दिवस, दिवसांतील चोवीस तास, माणकीच्या संगतींत घालविल्यामुळें, तिच्या सहवासाची अवीट गोडी त्याला कळूं लागली. माणकी तर आतां ऐन जवानींत असल्यामुळें त्याला अधिकच आकर्षक वाटत होती. माणकीचा सहवास सोडण्याची त्याच्या मनाची जरा पण तयारी नव्हती, तरी तो तिला सोडून जायला निघाला होता. त्याचें एकच कारण म्हणजे सावकाराची दहशत. आपण सावकाराचें कर्ज काढलें आहे, तें कर्ज फिटेपर्यंत आपणाला त्याच्या दारांत राबल्यावांचून गत्यंतर नाहीं. सुखासमाधानानें आपण गेलों नाहीं, तर सावकार मारहाण करून आपणाला नेईल, ह्याची त्याला जाणीव होती. म्हणून माणकीच्या विनविण्याला न जुमानतां जाण्याचा निश्चय करणें त्याला भाग पडत होतें.

माणकी दुसऱ्या दिवशीं रागांतच होती व सबंध दिवस एके ठिकाणीं तीं दोघें बसून होतीं. तरी ती जेठ्याबरोबर बोलायला तयार होईना. खूप वेळां त्यानें प्रयत्न केला, पण तिनें त्याला दाद दिली नाहीं. पुन्हा रात्र झाली व ती खूप रडली. रात्रीं एकत्र आल्यावर रडत रडतच तिनें त्याला न जाण्याविषयीं आर्जवून सांगितलें. ती त्याला म्हणाली, " आपण दोघं पळून जाऊं!" त्यावर जेठ्या म्हणाला, "पलशी कोठ ? ( पळणार कुठं ? ) जथं जाईन तथंशी सावकार मला धरून आणील." असें म्हणून, "आपला जोडीदार एकदां पळाला होता, तेव्हां सावकारानें पोलीस पाठवून

त्याला कसा पकडून आणविला, त्याच्यावर कपडे चोरल्याच्या आरोपाखालीं खटला कसा भरला, पुढें त्याला दंडाची शिक्षा कशी झाली व सावकारानें स्वतःच दंड भरून त्याला कसा सोडवून आणला,'' ही हकीकत त्यानें माणकीला सांगितली.

जेठ्याचें हें बोलणें मात्र माणकीला भ्याडपणाचें वाटलें. पळून जाण्याची आपली कल्पना त्याला आवडेल, अशी वेडी आशा उराशीं बाळगून ती रात्रीं त्याच्याजवळ आली; पण ती एकमेव आशा सफळ होण्याचा आतां मुळींच संभव न दिसल्यामुळें ती खूप चिडली—संतापली—कातावली व जेठ्याला जोरानें बाजूला लोटून देऊन त्याच्याच शेजारीं ती रडत पडली. त्यानें तिला जवळ घेण्याचा जेव्हां जेव्हां यत्न केला, तेव्हां तेव्हां तिनें त्याला ढकालिलें व रागांत ती तशीच रात्रभर पडून राहिली.

* * *

: २० :

अखेर एकदांचा तो दिवस उगवला व जेठ्या सावकाराकडे निघून गेला. जातांना पण माणकी त्याच्याशीं नीट बोलली नाहीं. जेठ्याच्या मनांत असतें तर तो सावकाराकडे जाणें टाळूं शकला असता, असें तिच्या मनानें घेतल्यामुळें ती त्याच्यावर अधिकच चिडली.

जेठ्या परत जाऊन कामाच्या रहाटगाडग्याला जुंपला गेला, त्या दिवशीं माणकी दुपारीं शेताच्या बाजूनें एकटीच येत होती. ती विषण्ण मनानें हळू हळू पावलें टाकीत होती. ऐन तारुण्यानें मुसमुसलेली असल्यामुळें माणकी चांगलीच आकर्षक दिसत होती. त्या गांवांतील इतर तरुण बायांमध्यें ती चांगली चउठून दिसत होती. तिच्याकडे त्या गांवांतील भंडाऱ्याच्या ताडीच्या दुकानावर काम करणाऱ्या एका माणसाचें लक्ष होतें. मधून मधून तो थांबून तिच्याशीं बोलत पण असे. आज माणकीला एकटीच येतांना पाहून त्यानें तिला हांक मारण्याचें ठरविलें व ती जवळ येतांच " काय गो माणके एकलीशी आज ? जेठ्या कोठ जाधेल "( गेला ) असें त्यानें तिला विचारलें. त्यावर " जाधेल तो सावकाराशीं, " असें ती म्हणाली. मग त्यानें तिला बळेंच थांबवून घेतलें व बोलतां बोलतां "इतक्या चांगल्या बायकोला टाकून तो गेला तरी कसा ? आपण आपल्या बायकोला टाकून असें कधींच गेलों नसतों," इत्यादि गोष्टी तो अगदीं लघळपणें बोलला. माणकी त्याच्याशीं बोलत असतांना जेव्हां रडूं लागली, तेव्हां त्यानें तिच्याबद्दल खूप सहानुभूति दाखविली व तो थोडा तिच्याजवळ पण आला. इतक्यांत कोणाचीशीं चाहूल लागल्यामुळें तो पुन्हा दूर झाला. माणकी पण उठून आपल्या घराच्या मार्गाला लागली.

पण ह्या भेटीचा व त्या माणसाच्या बोलण्याचा तिच्यावर निराळाच परिणाम झाला. तिला त्या रात्रीं बरेंच बेचैन वाटूं लागलें. जेठ्या घरांतून दूर गेलेला, सासूशीं फारसें बोलण्याची सोय नाहीं व जिवाला हुरहूर लागलेली; अशा स्थितींत ती रात्र तिनें कशीबशी काढली.

दुसरे दिवशीं कामावर जातांना तिचे पाय त्या भंडाऱ्याच्या दुकानाच्या बाजूला वळले. पूर्वीच्या ठिकाणींच तो त्याचा नोकर तिच्या पुन्हा नजरेस पडला. तिला पहातांच तो हातांतलें काम ठेवून तिच्याजवळ बोलायला आला. हा माणूस जव्हार संस्थानांतला होता. तो जातीनें कोकण्या होता. कोकणे लोक जरी आदिवासी असले, तरी इतर आदिवासींच्या मानानें हे बरेच हुशार असतात. हा माणूस तर विशेषच हुषार होता. ताडीच्या दुकानदाराकडे व त्याच्या आधीं आशागडच्या एका मारवाड्याच्या दुकानावर काम केल्यामुळें तो खूपच बनलेला होता.

माणकीशीं बोलतांना आतां त्याच्या एक गोष्ट नीट लक्षांत आली होती कीं, ही तिच्या नवऱ्यावर खूपच चिडलेली आहे व तिच्या घरीं आतां सासूजवळ कोणी नाहीं. त्याचबरोबर तिला थोडीबहुत मदतीची पण गरज आहे, हेंही त्यानें हेरलें. त्यानें त्याप्रमाणें तिला आपल्या जाळ्यांत अडकविण्याचे प्रयत्न सुरू केले.

दोन चार दिवस तो तिच्या कामाच्या वेळीं तिला भेटला व हळूहळू त्यानें तिला असें पटवून दिलें कीं, जेठ्यासारखा निर्बुद्ध माणूस सावकाराच्या पाशांतून आपली सुटका कशी करवून घेणार ? त्यानें तिला हळूहळू आपल्या वैभवाची जाणीव करून दिली. माणकी ह्या वेळीं एका विशेष मनःस्थितींत होती. तिला जेठ्याच्या सहवासाची–पतीच्या सहवासाची--पुरुषाच्या सहवासाची–ओढ लागली होती. ती तिची इच्छा जेठ्या गेल्यामुळें अतृप्त राहिली होती. तिच्या भावना तिला स्वस्थ राहूं देत नव्हत्या. नेमका त्याच वेळीं वरील इसम तिच्या सहवासांत आला व

त्याच्या सहानुभूतिपूर्ण बोलण्यानें ती त्याच्याकडे खेंचली गेली. त्याच्या मोहक बोलण्याला फसून एके दिवशीं सकाळीं कोणालाही न कळवितां ती त्याच्याबरोबर पळून गेली.

माणकी वेळेवर घरीं न आल्यामुळें ठराविक वेळेपर्यंत तिची वाट पाहून मायाचीनें तिचा तपास करायला प्रारंभ केला. देराणी व तिचा नवरा ह्यांना बोलावून आणून तिनें त्यांना ती हकीकत कळविली. शेवटीं सर्वांच्या मतानें असें ठरलें कीं, देराणीनें दुसऱ्या दिवशीं सकाळीं तिच्या माहेरच्या गांवीं जाऊन तिचा तपास करावयाचा व तिच्या नवऱ्यानें शहरांत जाऊन जेठ्याला ही बातमी सांगून तिथें ती गेली असल्यास तपास करावयाचा अथवा सावकाराच्या सल्ल्याप्रमाणें पुढली व्यवस्था करावयाची.

दुसऱ्या दिवशीं ठरल्याप्रमाणें देराणी व तिचा नवरा माणकीच्या शोधाला बाहेर पडले. देराणीचा नवरा शहरांत गेला व त्यानें जेठ्याला माणकीबाबत विचारलें. तेव्हां माणकी तिथें आली नसल्याचें त्यानें सांगितलें व पहिल्यांदाच त्याला कल्पना आली कीं, माणकी आपणाला सोडून कुठेंतरी गेली. देराणीच्या नवऱ्याच्या सांगण्यावरून त्यानें मोठ्या हिंमतीनें शेठला ती गोष्ट सांगण्याचा धीर केला. शेटनें पण त्याची हकीकत शांतपणें ऐकून घेतली आणि आपल्या कारकुनाला त्याच्याबरोबर देऊन त्याची बायको पळाल्याची फिर्याद पोलीसस्टेशनवर नोंदवण्याचा सल्ला दिला.

फौजदार साहेब सुदैवानें कचेरींत होतेच. सावकाराच्या कारकुनाचा व फौजदार साहेबांचा वेळोवेळीं संबंध येत असल्यामुळें त्यांनीं त्या कारकुनाची विचारपूस केली व मग दोनचार शेलक्या शिव्या मोजून जेठ्याची हकीकत जाणून घेण्यास प्रारंभ केला. “ तूं बायकोशीं भांडला असशील; तूं तिला मारहाण केली असशील; तूंच तिचा खून केला असशील; खरं बोल ” असा दम देत व शिव्या देत त्यांनीं त्याची फिर्याद लिहून घेतली. बिचारा

जेठ्या, एक तर बायको हरवल्याच्या दु:खानें खचून गेला होता आणि तशांत फौजदाराची दमदाटी व शिवीगाळ ऐकून तर तो अगदींच गलित-धैर्य झाला !

शेवटीं फौजदार साहेबाचें काम आटोपलें व "आपण बोलावूं तेव्हां हजर राहिलेंच पाहिजे, नाहीं तर तुरुंगांत डांबून ठेवूं," इत्यादि प्रकारचा दम देऊन त्यांनीं त्याला जाण्यास परवानगी दिली.

पिंजऱ्यांतून सुटलेल्या पांखराप्रमाणें फौजदाराच्या सरबत्तींतून सुटलेल्या जेठ्याला बाहेर आल्यावर जरा मोकळें वाटलें. सावकाराकडून दोन दिवसांची रजा त्यानें मोठ्या मिनतवारीनें मिळविली व तो देराणीच्या नवऱ्याबरोबर घरीं जाण्यासाठीं निघाला. वाटेंत रात्र पडल्यामुळें एके ठिकाणीं त्या दोघांनीं मुक्काम केला. माणकी कुठें गेली असेल, ह्याचा त्या दोघांना अंदाज लागेना.

दुसऱ्या दिवशीं ते दोघे गांवीं येऊन पोहोंचले व त्याच सुमारास देराणी पण तिथें येऊन पोहोंचली आणि माणकी शहरांत पण गेली नाहीं व माहेरीं पण गेली नाहीं, ही बातमी मायाचीला त्या दोघांकडून एकाच वेळीं कळली. मग ती गेली तरी कुठें ?

जी बायको मिळविण्याकरितां जेठ्यानें इतकें कर्ज काढलें व आपला स्वतंत्र जीव सावकाराच्या दारांत बांधून दिला, त्याच्या घरचें शिळेंपाकें खाऊन रात्रंदिवस काबाडकष्ट उपसले, ती बायको आतां कुठें गेली ? बायकोसाठीं कर्ज काढलें, कर्ज फेडण्याकरितां नोकरी पत्करली व त्या नोकरीमुळेंच बायको गेली ! बायकोपरी बायको पळाली व कर्जाचा डोंगर मात्र माथ्यावर राहिला. हेंच तें आदिवासींचें जीवन !

* * *

: २१ :

जेठ्या घरीं आला, तों दुसऱ्याच दिवशीं त्याच्यापुढें दुसरें एक ताट वाढून ठेवलेलें होतें. सकाळीं उठून तो बाहेर बसला, इतक्यांत, ज्या गांवाला चैतीला दिलें होतें, त्या गांवचे दोन लोक त्याच्या घराच्या बाजूनें येतांना त्याला दिसले. ह्या लोकांकडून आपल्याला चैतीची हकीकत कळेल व आपण पण त्यांना माणकीची हकीकत कळवूं, अशा विचारांत तो होता. तोंच ते लोक येऊन त्याच्या समोर उभे राहिले.

त्यांना बसवून तो त्यांची विचारपूस करूं लागणार, इतक्यांत त्यांच्या-पैकीं एकानें त्याला बाजूला घेतलें व हलक्या आवाजांत चैती वारल्याची बातमी त्याला सांगितली. चैतीनें स्वतः एका झाडाला टांगून घेतलें होतें, ही गोष्ट त्यानें थोड्या उशिरानें त्याला सांगितली. जेठ्या ही बातमी ऐकून खूप गोंधळला. त्याला एकदम रडूं कोसळलें. तसाच तो घरांत शिरला व मोठयानें ओरडला. "आया ! चैती टाकली" (मेली).

मायाचीनें ते शब्द ऐकतांच मोठयानें हंबरडा फोडला. जेठ्या धावत जाऊन देराणीला व तिच्या नवऱ्याला घेऊन आला. त्या दोघांनीं येऊन मायाचीचें सांत्वन करण्यास प्रारंभ केला. मग देराणीला मायाचीजवळ बसवून देराणीचा नवरा त्या बातमी सांगणाऱ्यांजवळ येऊन बसला. त्या दोघांना त्यांनीं थोडी 'तुंबाख्' (तंबाखू) व विडीचीं पानें दिलीं. त्यांनीं विडी करून ओढण्यास प्रारंभ केल्यावर ते हळू हळू बोलायला लागले.

त्यांच्या बोलण्यावरून जेठयाला व देराणीच्या नवऱ्याला कळून चुकलें कीं, चैतीला सासरीं खूप छळ सहन करावा लागे, वरचेवर मारहाण सोसावी

लागे. ह्या त्रासाला कंटाळून तिनें जीव दिला असावा अथवा एकादा फटका जादा बसल्यामुळें ती मेली असावी. मग घाबरून घरच्या मंडळींनेंच तिच्या गळ्याला फास बांधून तिला टांगून ठेवलें असावें; म्हणजे तिनें जीव दिला असें पोलिसांना वाटावें, अशी त्यांनीं कल्पना केली. ही कानीं पडलेली हकीकत ऐकून जेठ्या व देराणीचा नवरा तर आश्चर्यचकितच झाले. त्यांनीं आंत जाऊन ही सर्व हकीकत मायाचीला सांगितली. मग ती आणखी रडूं लागली व चैतीच्या सासरच्या माणसांना शिव्यांची लाखोली वाहूं लागली.

त्यानंतर असें ठरलें कीं, जेठ्यानें व देराणीच्या नवऱ्यानें त्या इसमांबरोबर जावें व प्रत्यक्ष गोष्ट काय घडली, त्याचा तपास करावा.

त्याप्रमाणें ती सर्व मंडळी चैतीच्या सासरच्या गांवीं रवाना झाली. ते तिथें जाईपर्यंत पोलीस अंमलदार तिथें आलेच होते. चैतीचा सासरा ज्या सावकाराचें शेत करीत होता, त्या सावकाराचें पोलिसांत फार वजन होतें! सासऱ्यानें आपल्या सावकारामार्फत फौजदाराला 'खूष' केलें होतें. इतर आदिवासींच्या मानानें चैतीच्या सासऱ्याची परिस्थिति चांगली होती. जंगलांत तपासाला येणारा अधिकारी नेहमीं त्याच्याच घरीं उतरून त्याच्याच कोंबडीचा स्वाद घेत असल्यामुळें, चैतीनें आंधळेपणाला कंटाळून जीव दिला, असा निकाल जाहीर होण्याला फारसा वेळ लागला नाहीं.

जेठ्याला साऱ्या तपासणींत कोणीं कांहीं विचारलें नाहीं. फौजदाराबद्दल त्याच्या मनांत कायमची भीति असल्यामुळें तोही त्याच्यापासून दूर राहिला. रीतसर पंचनामा झाला व चैतीला मूठमाती देऊन जेठ्या घरीं परत यायला निघाला.

जेठ्या घरीं आल्यावर दुसऱ्या दिवशीं आपल्या सावकाराकडे जायला निघणार होता; पण दुसऱ्या दिवशीं कांसें एथें असणाऱ्या हवालदाराला भेटून त्याच्याजवळ माणकीचा तपास करण्याची त्याला इच्छा झाली, म्हणून तो कांशाला जायला निघाला. निघण्यापूर्वीं त्यानें देराणीला व

तिच्या नवऱ्याला आपल्या आईकडे लक्ष देण्यास सांगितलें. आतां मायाची एकटीच रहाणार होती. कारण त्याचा धाकटा भाऊ रामा कुठें भटकत राही, त्याचा नेम नव्हता. जेठ्यानें रामाला पण निरोप पाठविला होता कीं, इतःपर त्यानें शक्य तों आईच्याजवळ रहावें. काशाला जाण्यांत हाही त्याचा एक हेतु होता. काशापासून जवळच एके ठिकाणीं रामा काम करीत असल्याची त्याला बातमी मिळाली होती. त्यामुळें तो काशाला आल्याबरोबर त्यानें रामाला भेटण्याचा प्रयत्न केला.

त्याला रामा भेटला व त्यानें रामाला घरची सर्व हकीकत सांगितली. आपल्यावर आलेल्या संकटाची त्याला पूर्ण कल्पना देऊन घरीं आई एकटी असल्यामुळें इतःपर आईकडे व शेताकडे लक्ष देण्यास जेठ्यानें त्याला सांगितलें. रामानें त्याचें बोलणें ऐकून घेऊन, घरीं जाण्याचें त्याच्या-जवळ कबूल केलें. पण तो जेठ्याला म्हणाला, तूं आतां सावकाराकडून तुझी सुटका करवून घे. ' हें सांगतांना त्यानें जेठ्याला आदिवासी विभागांत नव्यानेंच लोकांना मदत करायला आलेल्या बोर्डीच्या भिसे मास्तरांची गोष्ट सांगितली. भिसे मास्तरांनीं दोनचार घरगड्यांची सावकारांकडून सुटका केली असून, तूं जर त्यांना भेटलास, तर ते तुला पण मदत करतील वगैरे हकीकत त्यानें त्याला सांगितली.

त्यानें सांगितलेल्या हकीकतीवर जेठ्याचा विश्वास बसेना. सावकारा-कडून काढलेलें कर्ज फेडल्यावांचून कोणाची कधीं सुटका होऊं शकेल, ही गोष्ट पिढ्यान् पिढ्यांच्या अनुभवामुळें त्याला खरीच वाटेना; पण रामानें त्याला शपथा घेऊन, आपण सांगितलेली हकीकत खरी असल्याचें जेव्हां सांगितलें, तेव्हां तर त्याला खूपच आश्चर्य वाटलें. हा भिसे मास्तर आहे तरी कोण व सावकार त्याचें ऐकतील तरी कसें, ह्या प्रश्नाचें उत्तर त्याला कांहीं मिळेना. शेवटीं रामानेंच त्या भिसे मास्तरांना भेटावें व जेठ्याची हकीकत त्यांच्या कानांवर घालावी असें ठरलें. जेठ्यानें

हवालदाराची गांठ घेऊन माणकीचा तपास केला; पण त्या बाबतींत निराशाच त्याच्या पदरांत पडली.

जेठ्या तिथून जो निघाला, तो सावकाराच्या घरीं येऊन पोहोंचला. वाटेंत त्याच्या डोक्यांत त्या कार्यकर्त्यांच्याच गोष्टी घोळत होत्या. आपण सावकाराकडे किती महिने काम केलें, त्याचे किती पैसे आपणाकडून भरले गेले व किती भरावयाचे राहिले याचा हिशेब करण्याचा त्यानें खूप प्रयत्न केला; पण त्यांत त्याला यश आलें नाहीं. शेवटीं सावकाराच्या मुनिमाला गाठून हा हिशेब करवून घेण्याचा त्यानें विचार केला.

आज जेठ्या खूपच विषण्ण मनःस्थितींत होता. त्याची आवडती बायको पळून गेली होती, बहीण चैती त्याला सोडून गेली होती, आई एकटी घरीं शेतावर कष्ट करीत होती व हा सावकाराच्या घरीं गुलामाप्रमाणें राबत होता! लग्नाकरितां काढलेलें कर्जहि होतेंच डोक्यावर. एका लग्नाचें कर्ज फिटण्याची आशा नाहीं, तर दुसरें लग्न कसें होणार? एकट्या आईच्या हातून जमिनीची व्यवस्था कशी होणार? आणि केवळ नोकरीच्या पैशांतून सावकाराचें कर्ज कसें फिटणार? असे शेंकडों प्रश्न त्याच्या डोळ्यांसमोर उभे रहात व ह्या सर्वांतून सुटण्यासाठीं एकच आशेचा किरण त्याच्या डोळ्यांसमोर दिसे आणि तो म्हणजे रामानें सांगितलेल्या त्या कार्यकर्त्यांच्या मदतीचा. त्याला वाटे, खरंच कोणी असा कार्यकर्ता असेल व तो जर सावकाराच्या तडाक्यातून घरगड्यांची सुटका करण्यास मदत करीत असेल, तर तो देवच असला पाहिजे.

ह्याप्रमाणें दिवसामागून दिवस जात होते. शहरांत तो काम करीत असतां अनेक बऱ्या वाईट गोष्टी त्याच्या कानावर येत होत्या. त्यानें एके दिवशीं ऐकलें कीं, तो कार्यकर्ता ( त्याला सर्व लोक नाना म्हणत. ), काकासाहेब नांवाचा एक मुंबईचा कोणी मनुष्य व दुसरे कांहीं लोक ह्यांनीं महालक्ष्मीला एक सभा घेतली. त्या सभेंत त्यांनीं सावकारांना

घरगडयांची सुटका करण्यास सांगितलें. ज्या घरगडयांचे हाल होतात, त्यांची सुटका करण्यासाठीं ती मंडळी ह्या भागांत फिरणार असल्याचेंही त्यानें ऐकिलें. पण हे लोक कोण आहेत, सावकार लोक त्यांचें ऐकतील कसें, हें त्याला समजेना.

इतक्यांत एके दिवशीं त्यानें ऐकलें कीं, काकासाहेब, नाना वगैरे मंडळी त्याच्या गांवांत आज येणार असून ते एका वडाच्या पारावर 'सुभा' (सभा) बसविणार आहेत. त्या सुभेला गांवांतील सर्व लोकांना बोलाविलें असून त्यांच्याबरोबर विहिरीवर पाणी भरायला येणारे बरेच गडी त्या सुभेला हजर रहाणार आहेत.

जेठ्यानें पण त्या गड्यांबरोबर जाण्याचा विचार केला व कोणाला थांगपत्ता न लागूं देतां रात्रीं तो त्या पारावर गेला. तो जाण्यापूर्वींच सभेचें काम सुरू झालें होतें. तो सभेंत जाऊन बसला. त्या लोकांनीं सांगितलेलें सारें जरी त्याला समजलें नाहीं; तरी पण—"हे लोक आपल्या सावकारापेक्षां निराळ्या जातीचे आहेत व ते आपणाला मदत करायला आले आहेत. त्यांच्या मदतीची ज्याला गरज असेल, त्यांनीं बोर्डीला जाऊन त्यांना भेटावें. लवकरच हे लोक काशाला एक जागा घेऊन रहाणार आहेत" इत्यादि गोष्टी त्याला समजल्या. ह्या सभेंत त्यानें वार्ली हा शब्द मुळींच ऐकला नाहीं. ते लोक सारखे "तुम्ही आदिवासी लोक" असें म्हणत होते. आपणाला हे वार्ली कां म्हणत नाहींत व हें नवीन नांव त्यांनीं कां दिलें, तें त्याला समजलें नाहीं. सभा संपल्यावर त्यांच्यापैकीं एकाला त्यानें आपली शंका विचारली. त्यानें सांगितलें कीं, वार्ली लोक हे आदिवासी म्हणजे पाहिल्यापासून येथें रहाणारे—जंगलचे खरे राजे—असें काकासाहेब म्हणतात. आतां आपणांस कोणी 'वार्ली' 'वार्लटें' 'भुसाटें' असें न म्हणतां, आदिवासी म्हटलें पाहिजे, असें काकासाहेब म्हणाल्याचें पण त्यानें त्याला सांगितलें.

सभेला हजर रहाण्याचा तो त्याच्या आयुष्यांतील पहिला प्रसंग होता. रात्रीं त्याला सारखीं सभेचींच स्वप्नें पडलीं. एक स्वप्न त्याला अगदीं सकाळच्या प्रहरीं पडलें. त्यानें स्वप्नांत पाहिलें कीं, काकासाहेब, नाना इत्यादि सारी मंडळी आपल्या सावकाराकडे आली असून आपणाला सोडून देण्यास त्यांनीं आपल्या सावकाराला सांगितलें आहे व सावकारानें खूष होऊन आपणाला सोडून दिलें आहे आणि नाना आपल्या पाठीवर थाप मारून आपल्याला सांगत आहेत कीं, "तूं आतां मोकळा झालास, तुला वाटेल तिथें जा." त्या थापेमुळें तो जागा झाला व त्याला कळलें कीं, ती थाप नानांची नसून त्याच्या सावकाराची होती व तो त्याला कामासाठीं उठवीत होता.

* * *

: २२ :

जेठ्याचे इतर नातेवाईक जंगल तोडण्याचीं व जंगलांतील लाकडांची वहातूक करण्याचीं कामें करीत होते. जेठ्याही सावकाराकडे पूर्वीप्रमाणेंच काम करीत होता. पण बाहेर मात्र झपाट्यानें निरनिराळ्या घटना घडत होत्या. सरकारनें मागासलेल्या लोकांचे हितसंबंध पहाण्यासाठीं नेमलेले एक अधिकारी ठिकठिकाणीं जाऊन वार्ली, काथोडी वगैरे लोकांना केलेल्या कामाचें मोल बरोबर दिलें जातें कीं नाहीं, ह्याची पहाणी करीत होते.

ठाणें जिल्ह्यांतील आदिवासी लोकांची जंगल कंत्राटदारांकडून जी पिळवणूक होत होती, तिचीं खूप भडक वर्णनें सरकारच्या कानीं जात होतीं. वार्ल्यांना जंगलतोडीचे हिशेब नीट दिले जात नव्हते. त्यांना रोख मजुरी न देतां अंगावर पैसे दिले जात होते व त्या पैशांचें भरपूर व्याज घेतलें जात होतें. पैसे एकदां त्या माणसानें घेतले कीं, तो सावकाराचा अक्षरशः गुलाम बनत असे. त्याला पठाण, भय्या अशांच्या मार्फत कामावर खेचून आणण्यांत येत असे. काथोड्यांचें सर्व कुटुंबच्या कुटुंब कोळसे करण्याच्या कामीं उपयोगांत आणलें जाई. पैसे जे दिले जात, ते दर व्यक्तीला त्याच्या मजुरीच्या मानानें न देतां सबंध कुटुंबाला कांहीं ठराविक रक्कम देण्यांत येई. पुरेसें खायला न मिळाल्यामुळें हीं माणसें सावकाराकडून पळून जात. त्यांना शोधून पकडून आणण्यांत येई व त्यांना खूप मारहाण करण्यांत येई. त्यांना कायम धाकांत ठेवण्यासाठीं त्यांची व त्यांच्या बायकामुलांची ताटातूट करण्यांत येई. अशा अनेक प्रकारच्या हालअपेष्टा निमूटपणें सहन करीत ही जंगलची जनता आपलें नित्याचें जीवन जगत होती. त्यांना कोणी वाली नव्हता. ना घरदार,

ना शिक्षण, ना पोटभर अन्न, ना कपडालत्ता; अशा भयंकर हलाखीचें जीवन जगत सर्व आदिवासी ठाणें जिल्ह्यांत रहात होते. जंगलकंत्राटदारांच्या अनन्वित जुलमाचीं भडक वर्णनें एथील लोकांच्या कानांवर येत होतीं. पण सर्वसाधारण जनता ह्या बाबतींत अगदींच उदासीन होती. आदिवासी लोक ह्या अन्यायाविरुद्ध प्रतिकार करण्याच्या परिस्थितींत नव्हते. एकट्या दुकट्यानें काढलेला आवाज सावकारी पैशाच्या व अधिकाऱ्यांच्या सत्तेच्या जोरावर दाबून टाकण्यांत येई. त्यामुळें नशिबानें आपल्यासाठीं हेंच ताट कायमचें वाढून ठेविलें आहे; अशा प्रामाणिक समजुतीनें ते लोक देव ठेवील त्या स्थितींत रहात होते.

इतक्यांत दुसरें महायुद्ध सुरू झालें. इमारती लाकडांना भरपूर भाव येण्याची आशा दिसूं लागली. जंगलाचे कंत्राटदार खूप फायदा मिळविण्याच्या खटपटींत होते. पण हा फायदा मिळवून देणारांच्या पोटांत दोन घांस अधिक घालण्याची त्यांना जरूर वाटत नव्हती. सरकारनें नेमलेल्या अधिकाऱ्यानें प्रामाणिकपणें काम करायला सुरुवात केली होती. आदिवासी देखील आपलीं गाऱ्हाणीं आतां भीतभीत अधिकाऱ्यापुढें मांडायला अधूनमधून पुढें येत होते.

जेठ्याचा धाकटा भाऊ आतां खूप हुशार झाला होता. तो जरी घरीं राहून मायाचीला शेताच्या कामांत मदत करीत नव्हता, तरी आतां तो मधून मधून घरीं येत असे. त्याला घरच्या परिस्थितीची हळुहळू जाणीव होत होती .त्याची मनोवृत्ति स्वतंत्र होती. जेठ्याला पैशासाठीं सावकाराच्या दारांत 'घरगडी' म्हणून राबावें लागत होतें, ही गोष्ट त्याला फार जाचक वाटत होती. मायाची त्याला अनेक वेळां सांगे कीं, तूं एकतर शेतीकडे तरी पहा, नाहींतर एकाद्या सावकाराकडे नोकरीला तरी रहा. पण रामाला ह्यांपैकीं कोणतेंच काम पसंत नसे. त्याला एवढें पटलें कीं, आपल्या पोटासाठीं आपण कांहींतरी कमाविलें पाहिजे. तसें त्यानें स्वतःच्या आवडी-

प्रमाणें काम शोधून काढलें. त्यानें ह्या चार दोन वर्षांत थोडें बहुत लिहिणें वाचणें साध्य करून घेतलें. त्याच्या गांवापासून जवळच चार इयत्ता शिकलेला एक लंगडा मास्तर रहात होता. त्याला सर्व लोक ' लंगडा मास्तर ' या नांवानें ओळखत. तो पांच पंचवीस पोरें गोळा करून एक व्हॉलंटरी ( स्वयंस्फूर्त ) शाळा चालवीत असे. आदिवासी भागांत कित्येक गांवीं शाळा नव्हत्या. पहिल्या कॉंग्रेस सरकारच्या अमदानींत जरी ह्या असल्या शाळांना इतरत्र खूप भरती आली होती, तरी डहाणू तालुक्यांत अशा शाळा नव्हत्या. पण ह्या 'लंगडया मास्तर'ची शाळा मात्र जीव धरून होती. ह्याच शाळेंत जेव्याचा धाकटा भाऊ रामा थोडेंबहुत 'र' 'ट' 'फ' करायला शिकला होता. हें जें थोडेंबहुत तो शिकला, त्यामुळें त्याला थोडी वाचण्याची संवय लागली. पण त्याहीपेक्षां एक मोठी गोष्ट तो शिकला, ती म्हणजे तो विचार करूं लागला ही होय. इतर आदिवासीं-मध्यें व त्याच्यामध्यें हाच मोठा फरक घडून आला होता.

तो ह्या लढाईच्या काळांत एका सावकाराकडे नोकरीला लागला.त्याची हुशारी विशेष असल्यामुळें त्याला मुकादमाचें काम मिळालें. रामा जरी सावकाराकडे नोकर म्हणून राहिला होता,तरी त्याच्या डोक्यांत वार्ली लोकांना त्यांच्या अडचणींतून सुटका करण्याचे विचार थैमान घालत होते. त्यानें वरचेवर बोर्डीला जाऊन तेथील कार्यकर्त्यांच्या मार्फत आदिवासी लोकांच्या तक्रारींना वाचा फोडण्याचें काम सुरू केलें. कोणाचीही मजुरीबाबत अथवा शेतीबाबत कांहीं तक्रार असली कीं, रामा त्याला बोर्डीला पाठवी. तेथील कार्यकर्ते आपल्या वरिष्ठांच्या मार्फत त्याला दाद मिळवून देण्याचा प्रयत्न करीत. ह्या काळांतच आदिवासी–सेवा–मंडळाची स्थापना झाली होती. ह्या मंडळानें ठाणें जिल्ह्यांत दोन तीन ठिकाणीं आश्रम सुरू केले होते. त्या ठिकाणीं नेमलेल्या कार्यकर्त्यांकडे आदिवासींचीं गाऱ्हाणीं दूर करण्याचें काम दिलें होतें. ह्या संस्थेला अर्थात् सावकारांचें साह्य नव्हतें.

इतकेंच नव्हे, तर ही उपद्व्यापी मंडळी एथें आली; त्यामुळें आतां वार्ली लोकांना भलतीच चिथावणी मिळणार व त्यांचे आणि आपले आजपर्यंतचे जे संबंध आहेत, त्यांत ‘ बिघाड ’ होणार; ह्या भावनेनें सावकार मंडळींचा ह्या आदिवासी—सेवामंडळाच्या कार्यकर्त्यांना कांहीं ठिकाणीं प्रच्छन्न, तर कांहीं ठिकाणीं उघड विरोध होता. ह्या मंडळाकडे आपलें एकादें कूळ अथवा नोकर गेल्याचें एकाद्या सावकाराला समजलें, तर तो त्याला खूप ‘ समज ’ देत असे. त्यामुळें सर्वसाधारण माणसें ह्या आश्रमापासून दोन हात दूरच रहात. ह्या आश्रमाचें काम सुरू होतें न होतें, तोंच आश्रमाचे कांहीं कार्यकर्ते वैयक्तिक सत्याग्रहाच्या चळवळींत भाग घेऊन तुरुंगांत गेले. त्यामुळें त्यांनीं सुरू केलेलें काम साहजिकच मंदावलें.

रामानें मात्र ह्या माणसांच्या मदतीचा फायदा लोकांना देतां येईल, तितका देण्याचा प्रयत्न करायचें ठरविलें. त्याप्रमाणें त्याच्याकडे कोणी तक्रार घेऊन आला व तो मनुष्य खंबीर आहे, असें त्याला दिसलें, तर तो त्याला ह्या मंडळाच्या सेवकाकडे पाठवी व ही मंडळी आपलें सर्व वजन खर्च करून त्याला दाद मिळवून देण्याचा प्रयत्न करीत.

पण ह्या कार्यकर्त्यांचे वजनदार पुढारीच तुरुंगांत पडल्यामुळें त्यांनीं सुरू केलेल्या कामाचें दृश्य फल कोठें दिसून येईना. इतकेंच नव्हे तर सावकारांना व कंत्राटदारांना आतां मोकळें मैदान मिळाल्यामुळें व व्यापाराला तेजी येत चालल्यामुळें त्यांनीं आपल्याविरुद्ध वार्ल्यांना तयार करण्याची जी चळवळ सुरू होऊं पहात होती, तिचा बीमोड करण्याचा चंग बांधला. जर एकादा दुसरा वार्ली आपल्या नियंत्रणाविरुद्ध प्रतिकार करण्याचा प्रयत्न करतांना सावकारांना दिसला, तर त्याला ते अशा प्रकारें समज देत कीं, भोंवतालच्या लोकांना पुरी दहशत बसून पुन्हा कोणी वर डोकें काढण्याचा प्रयत्न करीत नसे.

पुढें हे पुढारी तुरुंगांतून सुटून आले. त्याबरोबर रामा जाऊन त्या

नानांना भेटला. त्यानें जेठ्याची सर्व हकीगत त्यांच्या कानां-वर घातली. त्यांनीं ती काळजीपूर्वक ऐकून घेतली. नंतर त्यांची खात्री झाली कीं, जेठ्यानें जे पैसे सावकाराकडून काढले, त्या मानानें त्याची सावकाराकडे बरीच नोकरी झालेली आहे. आतां त्याला त्या पैशांसाठीं राबवून घेणें, केव्हांही अन्यायाचेंच होईल. पण त्यांनीं रामाला असा सल्ला दिला कीं, त्यानें कोणताही आततायीपणा करूं नये. त्या सावकाराची व नानांची ओळख असल्यामुळें सावकाराला समक्ष भेटून त्याचेशीं चर्चा करून ह्या प्रश्नाचा निकाल लावण्याचा आपण जरूर प्रयत्न करूं, असें त्यांनीं रामाला आश्वासन दिलें. नंतर रामा निघून गेला.

त्यानंतर नानांनीं डहाणूला जाऊन त्या सावकाराची गांठ घेतली. त्याच्याबरोबर जेठयाबाबत बातचीत केल्यावर फारसे आढेवेढे न घेतां ह्या महिनाअखेर आपण त्याला मोकळें करूं, असें सावकारानें आश्वासन दिलें. थोडे दिवस आपणाकडे पाहुणे असल्यामुळें आपणाला जेठयाची गरज आहे, असें सावकारानें सांगितलें व नानांनीं पण सावकाराचें म्हणणें वाजवी असल्याचें कबूल केलें.

महिनाअखेर सावकार खरोखरीच आपल्या शब्दाला जागला. त्यानें जेठयाला बोलावून घेतलें व त्याला आपण उद्यांपासून मोकळे करणार असल्याचें सांगितलें. हें सांगतांना त्यांनीं त्याला हेंही पण सांगितलें कीं, “ आजपर्यंत मी तुला पोराप्रमाणें वाढविला. तुला जर सूट पाहिजे होती,तर तूं तसें माझ्याजवळच बोलायचें.तिऱ्हाइताची मदत घेऊन तूं सुटका करून घेतलीस, हें कांहीं आपणाला आवडलें नाहीं. पण ठीक. तूं राजी हो. उद्यां तूं तुझ्या घरीं परत जा. ”

जेठयाला काय बोलावें हें सुचेना. त्यानें सावकाराचे पाय धरले. दुसऱ्या दिवशीं तो सकाळीं उठल्यावर सावकारानें त्याच्या हातावर एक रुपाया ठेवला व त्याला दोनतीन कपडे देऊन त्याची बोळवण केली. पुन्हा एकदां

जेठ्यानें सावकाराचे पाय धरले व तो त्या घरांतून बाहेर पडला. एकदां सावकाराचे पैसे काढल्यावर मनुष्य मोकळा होऊं शकतो हें त्याला खरेंच वाटेना; पण तो स्टेशनच्या मार्गानें चालूं लागला, त्या वेळीं त्यानें असें ठरविलें कीं, ज्या नानांच्यामुळें आपली सुटका झाली त्यांना ही बातमी कळवावी व मग घरीं जावें.

त्याप्रमाणें तो नानांच्या गांवीं गेला व त्यानें झटकन् त्यांचे पाय धरले. त्याची सुटका झाल्याचें ऐकून नानांनींही आनंद व्यक्त केला. त्यांनीं त्याला आग्रहानें जेवायला ठेवून घेतलें व त्याला आपल्या शेजारच्या पाटावर बसवून जेवण्याचा आग्रह केला. जेठ्याला हा अनुभव अगदींच नवा होता. पाटावर बसण्याचा अधिकार सावकाराच्या वाल्यांचा नव्हे, अशी लहानपणापासून जाणतेपणीं अगर अजाणतेपणीं त्याला शिकवण मिळाली होती. सावकारापासून आपण खूप दूर आहोंत ह्याची त्याला जाणीव असल्यामुळें नानांच्या शेजारच्या पाटावर बसून जेवायला तो तयार होईना. पण शेवटीं त्याचा नाइलाज झाला. कारण नानांनीं आग्रहानें त्याला आपल्या शेजारीं बसविलें.

आजचा दिवस जेठ्याच्या आयुष्यांत अगदीं अपूर्व होता. त्याची सावकारी पाशांतून आज सुटका झाली होती. शिवाय, एका मोठ्या माणसाच्या पाटाला पाट लावून तो जेवायला बसला होता. असलें सुख त्याला आयुष्यांत मिळालें नव्हतें. त्यामुळें हें सुख खरोखरीच टिकेल का व आपल्याला तें पचेल का, ह्याचाच जणूं काय तो विचार करीत बसला होता. कारण जेवणांत त्याचें फारसें लक्ष नव्हतें. तो अगदींच भांबावून गेला होता. आज तो खूप खूप आनंदांत होता; पण खरोखरीच जेठ्याच्या नशिबांतलें दुःख संपलें होतें का ?

* * *

# : २३ :

जेठ्या बोर्डीहून निघाला व घरीं आला. घरीं आल्यावर त्यानें मायाचीला घडलेली सर्व हकीगत सांगितली. ती ऐकून मायाची कांहीं फारशी आनंदित झालेली त्याला दिसली नाहीं, तेव्हां त्याला फारच आश्चर्य वाटलें! त्यानें तिला विचारलें, “ आया, मी अजुनं सांगत आहे पण तूं काय बोलस व नाय्? अवढा क्याचा विचार करंस?” त्यावर ती म्हणाली, “ सावकारानं निक्कां तुला सोडेल काय? दिले पशे फिटल्याबगर, सावकार कंदी पण माणसाला सोडायचा नाय्.” त्यावर जेठ्या तिला म्हणाला, “ आया, तूं धास नको करूं. अजुनं बेस होदेल आतां. आपण बेस भोय करूं (चांगली जमीन करूं) व सुखानं रहूं, ” त्यावर मायाची कांहीं बोलली नाहीं.

पण अखेर तिचीच शंका खरी ठरली. आपली सुटका झाल्याचा जेठयाचा आनंद फार वेळ टिकला नाहीं. त्या सावकारानें जेठ्याची जी सुटका केली होती, ती केवळ भिडेमुळें. नानांसारखा मोठा माणूस आपणांला कांहीं करायला सांगतो, तें आपण न करणें व एवढ्या मोठ्या माणसाला दुखविणें आपल्या हिताचें होणार नाहीं, अशी जाणीव असल्या-मुळें त्यानें नानांचें म्हणणें मान्य करून जेठयाची सुटका केली. पण मनांतून मात्र त्याला जेठ्याचा खूप संताप आला होता. आपल्या एका कुळानें तिऱ्हाइताची मदत घेऊन आपल्या पाशांतून स्वतःची सुटका करून घेतली, हें त्याला एक मोठें दुश्चिन्ह वाटलें. या गोष्टीला जर वेळींच आळा घातला नाहीं, तर सर्वच कुळें आपल्या डोक्यावर बसतील व मग आप-णांस कांहीं स्थानच उरणार नाहीं, असें त्याला वाटूं लागलें. सबब जेठयाच्या

बाबतींत आपण असें कांहीं केलें पाहिजे कीं, इतर सर्व कुळांना चांगलीच दहशत बसली पाहिजे व त्यांची खात्री झाली पाहिजे कीं, सावकाराच्या विरुद्ध कारवाया करायला गेलों, तर आपलेच हात भाजतील. आपलें बरें वाईट करूं शकणारा जगांत एकच प्राणी आहे व तो म्हणजे आपला सावकार, अशी जाणीव सर्व कुळांना एकदां चांगली करून दिली कीं, मग ते ह्या नानांच्या नादाला लागणार नाहींत, ही त्याची अहंमन्यता होती. म्हणूनच जेठयाची सुटका केल्यानंतर चार दिवसांनीं तो जेठ्याच्या गांवीं आला व आपल्या शेतावरून आपलें घर मोडून टाकून दुसरीकडे जाण्याचा त्यानें जेठ्याला हुकूम केला; इतकेंच नाहीं, तर त्याच्याकडे खंडानें असलेली जमीन काढून घेतल्याचें व इतःपर ती तो स्वतः लावणार असल्याचें त्यानें त्याला बजावून सांगितलें.

जेठ्यानें, मायाचीनें व आजूबाजूच्या लोकांनीं सावकाराची परोपरीनें विनवणी केली, पण सावकारानें त्या सर्व विनवण्या धुडकावून लावल्या. आपल्या डोळ्यांदेखत त्यानें निघून गेलें पाहिजे, नाहींतर पठाणांकडून त्याला हाकलून देण्यांत येईल, अशा प्रकारची सावकारानें खूप जोराची तंबी दिली डोळ्यांत पाणी आणून केलेल्या विनंत्यांचा पण कांहींच परिणाम झाला नाहीं. शेवटीं मायाची व जेठ्या यांना आपल्याजवळची सर्व चीजवस्तु घेऊन घराबाहेर पडावें लागलें. जातांना त्यांनीं आपलें घर पण पाडून न्यावें, असें सावकारानें त्यांना सांगितलें. तेंही एक दोन दिवसांतच घेऊन जाण्याचें कबूल करून तीं दोघें रस्त्याला लागलीं. पण आतां जायचें कुठें, हा दोघांच्याहिपुढें प्रश्न उभा राहिला. त्या दोघांनीं ती रात्र देराणीच्या बापाच्याकडे–पुंजाळ्याला–काढावी, असें सावकाराचा डोळा चुकवून त्यांच्यामागें धावत येणाऱ्या देराणीनें त्यांना सुचविलें. त्या दोघांनीं तिची सूचना मान्य केली व त्याप्रमाणें पुंजाळ्याच्या रस्त्यानें तीं चालू लागलीं. रस्त्यानें कोणीही बोलत नव्हतें. अखेर तीं दोघें पुंजाळ्याला येऊन पोंचलीं.

आज ते खरे निर्वासित झाले होते ! मायाचीच्या डोळ्याचें पाणी ठरत नव्हतें. ती रात्र त्यांनीं तेथेंच काढली. उद्यां आणखी आपल्यापुढें कोणतें ताट वाढून ठेविलें आहे, याचा विचार करीत सबंध रात्र तीं दोघें तळमळत पथारीवर पडून राहिलीं. दुःखांत सुख एवढेंच होतें कीं, देराणीच्या बापानें त्यांचें आपल्यापरीनें जेवढें चांगलें स्वागत करतां येईल, तेवढें केलें; पण पाहुण्यांचें स्वागत करितांना पाहुण्याला देण्यासारखें वाल्यांजवळ असतें तरी काय ! एकादशीच्या घरीं शिवरात्रच. पण वाल्यांजवळ जिव्हाळ्याचा मात्र तोटा नसतो.

* * *

# : २४ :

दुसऱ्या दिवशीं जेठ्या ही सारी हकीगत पुन्हा नानांना सांगायला निघाला, पण मायाचीनें त्याला विरोध केला. ती म्हणाली कीं, आपलें दुःख आपणच सहन केलें पाहिजे. तिला भीति वाटत होती कीं, आपण जर पुन्हा त्यांची मदत घ्यायला गेलों, तर आपणांला त्या सावकाराकडून अधिक त्रास होईल. ही भीति जेठ्यापुढें तिनें व्यक्त मात्र केली नाहीं. तिनें केलेला विरोध लक्षांत न घेतां जेठ्या बोर्डीला गेला. त्यानें नानांची गांठ घेतली व सर्व हकीकत त्यांना सांगितली. ती ऐकून त्यांना खूप वाईट वाटलें. नंतर त्यांनीं जेठ्याचें सांत्वन केलें व त्याला मदत करण्याचें आश्वासन दिलें. जेठ्याचें दुःख ऐकून नानांना जो विषाद वाटला, तो त्यांनीं एक पत्र लिहून त्या सावकाराला कळविला. मग जेठ्याला त्यांनीं रमेश नांवाच्या एका डहाणूंतील विद्यार्थ्याला भेटायला सांगितलें. रमेशला देण्याकरितां त्यांनीं एक पत्रही दिलें. त्या पत्रांत जेठ्याची सर्व हकीगत लिहून, तुमच्या वेती नांवाच्या गांवीं ह्याला झोंपडें बांधण्यास जागा द्या व शक्य असल्यास खंडानें थोडी जमीनही द्या, असें त्यांनीं लिहिलें होतें.

जेठ्यानें त्या रमेश नांवाच्या गृहस्थाची भेट तात्काळतोब घेऊन त्यास तें पत्र दिलें. त्या गृहस्थानें जेठ्याला सर्व मदत करण्याचें कबूल केलें. कारण ह्या गृहस्थास नानांबद्दल नितांत आदर वाटत होता. त्याला स्वतःला सुद्धां सार्वजनिक कार्याबद्दल आस्था वाटत असल्यामुळें व दलितांबद्दल पण प्रेम वाटत असल्यामुळें ( हें सारें शिक्षण त्याला नानांनींच दिलें होतें. ) त्यानें दुसऱ्या दिवशीं जेठ्याला आपल्या-

बरोबर वेतीला नेऊन झोपडें कुठें बांधावें तें सांगितलें. तसेंच आपल्या कुळांना व तेथील कारभाऱ्याला (पुढाऱ्याला) जेठ्याला हरएक प्रकारची मदत देण्यास सांगितलें. जुनें घर तिथून आणण्यासाठीं व नवें घर बांधण्यासाठीं खर्चाला म्हणून त्यानें जेठ्याला पटकन् दहा रुपये काढून दिले. तसेंच पुढच्या खेपेला पुन्हा येऊन जमिनीची व्यवस्था करण्याचें त्यानें जेठ्याला आश्वासन दिलें.

जेठ्या तिथून त्यांना रामराम करून निघाला. त्यानें मायाचीकडे जाऊन सर्व हकीगत सांगितली. ती सर्व हकीकत ऐकून जरी तिला समाधान वाटलें; तरी आपली संकटपरंपरा संपली, इथून आपले दिवस सुधारले अशी तिची खात्री होईना. आयुष्याचा फारच कटु अनुभव आल्यामुळें आपणांला ह्या हयातींत तरी चांगले दिवस येतील, असें तिला वाटलें नाहीं. जेठ्याची हकीगत तिनें ऐकून घेतली. त्या रात्रीं देराणी पण तिथें तिला भेटायला आली होती. जेठ्याची सर्व हकीगत ऐकून घेतल्यावर तिनें मायाचीला धीर दिला व दुसऱ्या दिवशीं पहाटेस उठून सर्वांनीं आपल्या गांवीं जाऊन तें घर मोडून वेतीला न्यावें असें ठरलें. देराणीनें व तिच्या नवऱ्यानें ह्या कामीं सर्व मदत करावी व घर नेण्याकरितां देराणीचीच गाडीजोडी वापरावी, वगैरे गोष्टी देराणीच्या अनुमतीनें ठरल्या.

दुसऱ्या दिवशीं तीं दोघें व देराणी आपल्या गांवीं जाण्याकरितां पहाटेसच निघाली. मायाची गांव सोडून गेल्यानंतर पहिल्यांदाच गांवीं परत आल्यामुळें व तिच्याबद्दल सर्वांना आपुलकी वाटत असल्यामुळें ती आल्याबरोबर तेथील सर्व मंडळी तिच्याजवळ जमली. तिच्याबद्दल त्यांना खूपच सहानुभूति वाटत होती. पण ह्या अन्यायाचा प्रतिकार करितां येतो, ह्याची त्यांना जाणीव झाली नव्हती. जें नशिबांत असेल, तें सहन करावें लागतें, हीच जणूं त्यांची वृत्ति होती. मायाचीवर आलेल्या आपत्तीबद्दल

आपणांला कांहीं करतां येईल,याची जाणीव त्यांना नव्हती. जो तो मायाचीला एकच वाक्य सुनवीत होता, "पका सांगून हटलं सावकाराला; पण मानतच नाय् तो" सावकार आपलें बोलणें ऐकायलाच तयार नाहीं. आपण पदोपदीं त्याची कशी विनवणी केली, ह्याची मायाचीला सर्वांनीं पूर्ण कल्पना दिली. नंतर आतां हें घर कमींत कमी वेळांत कसें मोडतां येईल, ह्याबद्दल जो तो तिला सल्ला देऊं लागला. इतकेंच नव्हे,तर 'चला रे अज्गे कामाला लागूं' म्हणून सर्वजण तिला मदत करूं लागले. त्यांनीं थोड्याच वेळांत तें घर मोडलें व तो सर्व माल त्यांनीं देराणीच्या गाडींत भरला.

ह्या सर्व भानगडी एथें चालू असतांना मायाचीचा धाकटा मुलगा रामा कुठें दिसत नव्हता. मायाचीला पण त्याची खूप आठवण झाली. तेथील एक दोन लोकांनीं पण त्याची विचारपूस केली. लढाई सुरू असल्यामुळें जंगलच्या मालाला तेजी येत चालली होती. अर्थात् रामासारख्या हुशार व चलाख कामगाराचा पण भाव वाढला होता. रामा धाडशी असल्यामुळें तो जिथें जास्त पैसे मिळतील, तिथें कामावर जायला तयार असे. चालू सालीं ह्या तालुक्यांतील एका व्यापाऱ्यानें मुंबईजवळ बोरीवलीला जंगल घेतल्यामुळें व हा व्यापारी इतरांच्या मानानें सढळ हातानें पैसा देणारा असल्यामुळें, रामा बोरीवलीला त्याच्या जंगलांत काम करायला गेला होता. त्यामुळेंच तो आज एथें दिसत नव्हता.

ती रात्र त्या दोघांनीं तिथेंच काढली. दुसऱ्या दिवशीं वेतीला जाण्याकरितां त्यांची गाडी निघाली. तेथील सर्व बायकांनीं खूप आपुलकीनें मायाचीला निरोप दिला. त्या सर्वांच्या सदिच्छा व स्वतःचें नशीब घेऊन मायाची निघाली. वेतीला जाऊन ती नवें घर उभें करणार होती, पण ह्या नव्या घराबद्दल तिला मुळींच आस्था वाटत नव्हती. केवळ जगायला

पाहिजे म्हणून जगत आहोंत आणि जगत आहोंत म्हणून डोक्यावर छप्पर उभें पाहिजे, असें तिला वाटत होतें. आतां आपल्या आयुष्यांत जगण्या-सारखें राहिलें तरी आहे काय ? असें ती स्वतःला विचारूं लागली. सोन्यासारखा नवरा आज इतके दिवस बेपत्ता, सासू मेली, सून पळाली, मुलीचा खून झाला, घर मोडलें, शेत गेलें. आतां राहिलें आहे तरी काय आपणासाठीं ! असा विचार करीत ती रात्रीं आडवी झाली. हें दुःख एवढ्यावरच थांबणार, कीं आणखी कांहीं भोगणें शिल्लक राहिलें आहे, ह्याचाच विचार करीत ती रात्रभर तळमळत पडली होती.

* * *

# : २५ :

४२च्या ऑगस्ट महिन्याची ९ तारीख उजाडली. डहाणूंतील एक मोठे वकील, त्यांची बायको, तो रमेश व इंग्रजी शाळेतील एक शिक्षक ह्या चौघांना पकडल्याची बातमी तालुक्याच्या कानाकोपऱ्यांत पसरली. रमेशच्या जमिनीवर मायाचींचें घर तयार होऊन तिनें रहायला सुरुवातही केली होती. रमेश आल्यावर आपणाला खंडानें जमीन मिळेल. तूर्त थोडें काम ते देतील व मग आपला जीवनाचा प्रश्न सुटेल, अशा आशेंत जेव्या व मायाची होती. पण रमेशला पकडल्याची बातमी ऐकल्यानें त्यांना जोराचा धक्काच बसला.

रमेशला व इतर लोकांना कां पकडलें ? ते तर चांगले होते; पकडायला ते कांहीं चोर, दरोडेखोर नव्हते. मग त्यांना पकडलें कां ? हें मायाचींला व जेव्याला समजलें नाहीं. त्याचप्रमाणें तेथील पुष्कळांना तें समजलें नाहीं. पण त्या शेठकडे नेहमीं जा ये करणारा एक हिऱ्या नांवाचा वार्ली होता, त्याला ह्या साऱ्या गोष्टी थोड्या थोड्या माहीत होत्या. त्यानें ही मंडळी गांधीबाबाचें काम करीत असल्यामुळें सरकारनें त्यांना पकडलें आहे, असें सांगितलें. हा गांधीबाबा कोण व त्याचें काम करणाऱ्यांना सरकार कां पकडतें, हें गौडबंगाल त्यांना समजेना !

चार आठ दिवस गेले. त्यांना पुन्हा एक बातमी कळली कीं, बोर्डीच्या पण कांहीं लोकांना पकडलें. त्यांत शामराव पाटील व तो नाना हीं दोन नांवें त्यांच्या ओळखीचीं होतीं. नानाला पकडलें व त्याला ठाण्याला घेऊन जात असतांना लोकांनीं आगगाडी अडवून धरली, वगैरे हकीगत पण ह्यांना कळली. नानाला पकडल्याचें

ऐकून तर मायाचीला व जेठ्याला खूपच वाईट वाटलें ! त्यांनीं आपणांला केवढी मदत केली ! ते जर नसते, तर आज आपले किती हाल झाले असते ! ह्याचा तीं दोघें विचार करूं लागलीं. एवढ्या चांगल्या माणसाला सरकार कां बरें पकडतें हें त्याच्या लक्षांत येईना ! पण ही हकीगत ऐकून मायाची अगदीं विव्हल झाली. त्या दोघांना कळून चुकलें कीं, आपणांला मदत करणारीं माणसें म्हणजे रमेश व नाना हीं दोघेंही आतां तुरुंगांत गेलीं. आतां आपला वाली कोण ? आतां जर सावकारानें पुन्हा कांहीं भानगड निर्माण केली तर आपणाला मदत कोण करणार ? अशा प्रकारचे विचार रात्रंदिवस त्या दोघांच्या मनांत सारखे थैमान घालीत होते. अजून त्या सावकाराची त्यांना भीति वाटत होती आणि त्यांची ती भीति खरी ठरली. एके दिवशीं मायाची व जेठ्या हे दोघेजण आपल्या अंगणांत बसले असतां, जंगल खात्याचे कांहीं शिपाई व अधिकारी तेथें आले. त्यांनीं जेठ्याला बाहेर बोलावून तूं जंगलचीं लाकडें चोरलींस, अशी आमच्याकडे तक्रार आली आहे असें त्याला सांगितलें. ह्या अकल्पित आरोपानें व त्या सरबत्तीनें जेठ्या अगदीं भेदरून गेला. त्याची आई मायाची हें बोलणें ऐकत होती. एव्हांना आजूबाजूचे लोक पण गोळा झाले होते. मायाचीनें आरोपाचा इन्कार केला व घरांत येऊन प्रत्येक लाकूड पाहून घेण्यास तिनें त्यांना सांगितलें. ते लोक घरांत आले व ज्या शिक्क्याचीं लाकडें चोरीला गेलीं आहेत अशी फिर्याद त्यांच्याकडे आली होती, तेच शिक्के त्या लाकडांवर आहेत असें त्यांनीं ओळखलें. पंचांना बोलावून त्यांनीं पंचनामा करायला प्रारंभ केला. जेठ्याची तर भीतीनें बोबडीच वळली होती; पण मायाची मात्र धिटाईनें आपण तीं लाकडें कुठून व कशीं आणलीं, हें त्या साहेबांना समजावून सांगत होती. तें तिचें सर्व बोलणें तो अधिकारी शांतपणें ऐकून घेत होता.

त्यानें तिला "कोर्टापुढें तूं आपली बाजू मांड. आज चोरीचा मुद्देमाल तुझ्या घरीं सांपडला आहे, म्हणून मी तुम्हां दोघांना पकडायला पाहिजे; पण तूं बाई माणूस म्हणून तुला पकडत नाहीं; मात्र जेठ्याला आतां पकडून आम्हीं त्याला महालांत घेऊन जाणार," असें त्यानें अगदीं निर्विकारपणें सांगितलें. त्याचें बोलणें ऐकून मायाचीला एकदम रडूं कोसळलें. पण अधिकाऱ्याला असलीं दृश्यें पाहण्याची संवय होती. पंचनामा पुरा झाला व जेठ्याला हातकड्या व दोऱ्या बांधून ते लोक घेऊन जाऊं लागले, तेव्हां मायाचीनें रडून आकांत मांडला. बाकीचे सर्व लोक बावळटासारखे पहात उभे होते. एकाची हिंमत नव्हती कीं, पुढें होऊन कांहींतरी करावें. वाल्यांना पोलिसांची खूप भीति वाटायची. जेलचें नांव काढलें कीं वालीं खूप घाबरून जात. एथें तर पोलीस हातांत बेड्या घेऊन आले होते व त्यांनीं जेठ्याला पकडलें होतें. हें दृश्य पाहून सर्व वालीं फार भेदरून गेले.

त्या लोकांनीं शिव्या देत देत जेठ्याला बाहेर नेला. त्याला नेत असतां मायाची त्याच्यामागें धावत होती. ती सारखी रडत होती; पण तिच्या रडण्याकडे कोणी लक्ष देत नव्हता. बाजूच्या दोन बायका आल्या व त्यांनीं मायाचीला हाताला धरून झोंपडींत आणलें.

जेठ्याला घेऊन ते लोक गेले. मायाचीला आतां कोणाचा आधार राहिला नाहीं. तिचा लहान मुलगा जिवंत होता; पण तो सावकाराबरोबर कोणत्या गांवीं कामाला गेला, हें तिला माहीत नव्हतें. त्याला पत्र वगैरे लिहून बोलावयाला ती कांहीं एकादी शिकलेली बाई नव्हती. नवरा केव्हांच नाहींसा झाला होता. सासू मेली, सून पळाली, मुलीचा खून झाला, धाकटा मुलगा बाहेर गांवीं गेला, मोठा मुलगा पकडला गेला, सावकारानें घरांतून काढून लावलें, आजपावेतों जेथें राहिलों होतों तो गांव सोडावा लागला, ह्या नव्या ठिकाणीं मदत करणारीं जीं दोन माणसें होतीं तींही तुरुंगांत जाऊन पडलीं. आतां आपला वाली कोण! ह्या विचारानें मायाची अगदीं गोंधळून गेली.

शेजारच्या बायांनीं तिचें खूप सांत्वन करण्याचा प्रयत्न केला. पहिली भरती ओसरली; नंतर ती एकदम शांत झाली. तेव्हां त्या बाया घरीं गेल्या. त्या सबंध पाड्यावर एक प्रकारचें भीतिचें साम्राज्य पसरलें होतें. शेजारच्या बायांनीं मायाचीला भाकरी आणून दिली.

रात्र झाली जिकडे तिकडे सामसूम झाली. मायाची तळमळत पडली; दुःखानें तिचें डोकें जणूं फूटून जात होतें. खूप हताश झाली होती ती. एवढी धीराची बाई; पण संकटाच्या माऱ्याखालीं ठेंचून निघाली होती ती.

दुसऱ्या दिवशीं सकाळींच सर्व पाड्याभर बातमी पसरली कीं, मायाचीनें गळफास घेतला. शेवटीं साऱ्या हालअपेष्टांशीं झगडून थकलेल्या त्या वाडगिणीनें आत्महत्त्या केली !

हें ४२–४३ सालपर्यंतचें आदिवासींचें जीवन ! दारिद्र्य, हाल, उपासमार व जुल्म यांना किती तरी आदिवासी गेल्या कित्येक वर्षांत बळी पडले असतील, हें एक परमेश्वर जाणे !

अशा प्रकारें शहरापासून दूर खेड्यांत अज्ञान, रोगराई, उपासमार व जुल्म बिनतक्रार सहन करीत ठाणें जिल्ह्यांतील आदिवासी मरत नव्हते म्हणून जगत होते. त्यांपैकींच मायाची नांवाच्या वाडगिणीनें संकटाच्या परंपरेशीं झगडतां झगडतां हतबल होऊन आज मृत्यूला कवटाळलें होतें.

संकटाशीं झगडतां झगडतां थकल्यामुळें मृत्यूच्या कुशींत अशी शांत झोप किती आदिवासांनीं आजपावेतों घेतली असेल तें एक परमेश्वरालाच माहीत !

* * *